# भारतीय राजवंश एकसत्य संशोधन

खंड १

प्रा. रा. आ. कदम
'कदम्ब'





# प्रकाशकीय

## बा. ग. पवार

*''भारतीय राजवंश एकसत्य संशोधन''*, खंड १ हा - **प्रा. रा. आ. कदम** यांनी संशोधनात्मक लिहिलेला ग्रंथ खऱ्या अर्थी सत्यसंशोधन ग्रंथ म्हणावा लागेल. **मातृभूमी प्रकाशन** मार्फत हा ग्रंथ प्रकाशित करीत असताना एक आगळा आनंद वाटतो, समाधान वाटते.

या ग्रंथामध्ये **कदंब राजकुल, वाकाटक राजवंश, सम्राट सातवाहन राजवंश, महापद्म नंद** चक्रवर्ती, अशा चार शककर्त्या राजवंशांबद्दल संशोधनात्मक शोध निबंध आहेत. लेखक प्रा. रा. आ. कदम यांच्या लेखनाचा मूळ पिंड संशोधनाचा आहे.

या ग्रंथातील भारतीय राजवंशांचे शोध निबंध कोल्हापूरहून प्रकाशित होणाऱ्या **'पैलतीर'** या दिवाळी अंकांतून प्रथम प्रकाशित झाले. प्रतिवर्षी प्रकाशित होणारा हा 'पैलतीर' दिवाळी अंक दर्जेदार साहित्याला वाहिलेला असून, **प्रा. कृष्णा गुरव** या ध्येयवेड्या संपादकत्वाखाली प्रकाशित होतो. प्रतिवर्षाचा अंक देखणा, कलात्मक व संशोधन मूल्यामुळेही संग्राह्य असतो.

**प्रा. रा. आ. कदम** यांच्या सत्याभिलाषी, समन्वयकारी संशोधन लेखन कार्यास प्रा. गुरव सर यांनी 'पैलतीर' च्या रूपाने पीठासन प्राप्त व प्रारंभित करून दिले. त्याबद्दल धन्यवाद दिले पाहिजेत.

२३ ऑक्टोबर १९९४ रोजी कोल्हापूर येथे ऐतिहासिक न्यू पॅलेस मध्ये अखिल भारतीय इतिहास परिषदेचे अधिवेशन संपन्न झाले. या अधिवेशनात प्रा. रा. आ. कदम यांचे, शोध निबंध वाचले गेले. या परिषदेचे उद्घाटन **महाराष्ट्र राज्याचे** तत्कालीन **उच्च व तंत्र शिक्षण मंत्री, डॉ.पतंगराव कदम (कुलपती, भारती विद्यापीठ)** यांनी केले. परिषदेचे **अध्यक्ष छत्रपती शाहूराजे** होते. स्वागताध्यक्ष 'करवीर रियासत' ग्रंथांचे संपादक , **स. मा. गर्गे** हे होते. परिषदेचे निमंत्रक प्रसिद्ध इतिहास तज्ज्ञ व लेखक **डॉ. जयसिंगराव पवार** हे होते. परिषदेस अनेक नामवंत इतिहास तज्ज्ञ, लेखक, ग्रंथकार, संशोधक उपस्थित होते. प्रा. कदम यांच्या शोध निबंध वाचनास अनुकूल-उत्तम असा प्रतिसाद मिळाला.

अनेक तज्ज्ञांनी प्रश्न विचारले. विचारलेल्या प्रश्नांना प्रा. कदम यांनी साधार-समर्पक उत्तरे दिली. परंपरागत संकल्पनांचे यथायोग्य स्पष्टीकरण केले. निबंधास उत्तम प्रतिसाद मिळाला. पर्यायाने परिषदेचा ऐतिहासिक पाठिंबा शोध निबंधांस मिळाला असे म्हणावे लागेल.

संशोधकांनी मनाशी प्रामाणिक राहून इतिहास संशोधन केले पाहिजे. शिलालेख, ताम्रपट, बखरी ही इतिहास संशोधनाची साधने आहेत. ही साधने प्रमाणभूत मानून साधार लेखन झाले पाहिजे हे अपेक्षित आहे. परंतु ताम्रपट, शिलालेखांचे चुकीचे वाचन, लेखन व अर्थनिर्धारण करून काहींनी चुकीचे इतिहासलेखन केले आहे. तेच चुकीचे विपर्यस्त

-असे हे महापद्मजसे प्रमादपूर्ण प्रवाद प्रियदर्शी सम्राट अशोकासही अजगरी विळखा घालतातच. भारतीय इतिहास- लेखनाची इतिकर्तव्यतापूर्ण शोकात्मिकता अन्यत्र दुर्मिळ व म्हणूनच एकमेवाद्वितीय ठरणारी होय !

**३. सहा पुराणांविषयी विवेचन :**

**(१) पुराणांचे मूल्यमापन :**

(द. प्रा. इ. /डॉ. रा. गो. भांडारकर; पृ. ६५ व ६६; ७४)

**१. संभवनीयता:** कोणातरी कवीने सांगितलेली कथानके, वृत्तान्त प्रारंभतः मौखिक, लोककथात्मक असावेत, व तेच लिखित स्वरूपात 'पुराणे' बनले असावेत.

**२. कालभिन्नता :** सर्व पुराणे, एकाच काळी उत्पन्न झालेली दिसत नाहीत.

**३. काल ज्येष्ठता व कालकनिष्ठता :** काही पुराणे इतरांहून 'कालज्येष्ठ' :(तुलनात्मकदृष्टच्या अधिक पूर्वकालीन आहेत). कालक्रमाने: १. वायु, २. मत्स्य, ३. ब्रह्मांड. आणि काही पुराणे 'कालकनिष्ठ' (तुलनात्मकदृष्टच्या बरीचशी उत्तरकालीन) आहेत. कालक्रमाने: ५ विष्णु., भागवत., ७. भविष्य.

**४. उद्देश-पीठिका :** 'कालकनिष्ठ' त्या उत्तरकालीन पुराणांचा, उदा. **विष्णु.** व **भाग.** यांचा उद्देश;-

''कोणत्याही एका विशिष्ट दैवताचे माहात्म्य वाढविणे;'' तसेच-

''एखाद्या विशिष्ट 'धर्म-मता' विषयी मनात बिंबे (ल) असा बोध करणे'' हा असतो.

५. **'विष्णु'.-पुराणाची 'सत्यार्थपात्रता'** : (पृष्ठ ७४):

१)'विष्णु.' हे 'वायु.' इतके 'कालज्येष्ठ/प्राचीन' नाही. तसेच ते **'भरंवशास योग्य नाही!'** ते 'वायु.'हून 'कालनिष्ठ व उत्तरकालीन' आहे.

२) विष्णुपुराणकर्त्याचा उद्देश -''एकदेशीय धर्ममताची प्रवृत्ती करावी,'' असा असल्यामुळे तपशीलवार वृत्तान्त सांगताना त्यात **'तहकीकपणा'** कडे त्याने फारसे लक्ष दिलेले नसावे, असे दिसते.

६.**' भागवत'पुराणाची 'सत्यार्थ-योग्यता':** (पृ. ७४)'भाग.' मध्ये तर 'विष्णु.' हूनही जास्तच हेळसांड आहे. (ते 'विष्णु.'चे अनुगामित्व/अवलंबन) आहे.

**७. 'भविष्य '-पुराणाची 'अदखल-पात्रता:' (!)**

यात नंदांविषयी विशेष माहिती नाही. मात्र हे एकच पुराण, नंदाच्या आठही पुत्रांची नांवे नमूद करते. त्यांतले एकही नाव इतर पुराणांत आलेले नाही. किंवा इतर पुराणांनी एक-एक तीही वेगवेगळी नांवे दिलीत, त्यांतील एकही नांव

इतिहासलेखन कसे केले गेले आहे हे प्रा. कदम यांनी आपल्या या शोध निबंधांत दाखवून दिलेले आहे.

इतिहासतज्ज्ञ समजल्या जाणाऱ्या सर्वोच्च विद्याविभूषित प्रकांड पंडितांनीही चुकीचे इतिहास लेखन केल्यामुळे यांचे लेखन प्रमाण मानून पुढचे इतिहास लेखन चुकीचे केले जाते, विपर्यस्त होते, हे इतिहास लेखनास क्षम्य नाही. प्रा. कदम यांनी आपल्या व्यासंगी-चिकित्सक अभ्यासांनी, साक्षेपी कुवतींनी प्राचीन इतिहास संशोधनावर नवा प्रकाश पाडला आहे. विद्यमान इतिहासकारांनी प्रा. कदम यांच्या संशोधनपर लेखनावर दिलेले ३२ अभिप्राय या प्रस्तुत ऐतिहासिक ग्रंथात घेतलेले आहेत. यांमध्ये डॉ. वि. त्र्यं. गुणे, डॉ. प्र. ग. लाळे, डॉ. म. श्री. माटे, डॉ. ग. वा. कवीश्वर (इंदूर), डॉ. वि. भि. कोलते (भूतपूर्व कुलगुरु, नागपूर विद्यापीठ), डॉ. अ. रा. कुलकर्णी (कुलगुरु, टि. म. विद्यापीठ, पुणे), डॉ. म. प. पेठे असे दिग्गज नामवंत इतिहासतज्ज्ञ असून सर्व अभिप्राय अनुकूल व गौरवपूर्ण असे आहेत. डॉ. पेठे म्हणतात, **''आजपर्यंतची व विरोधातील सर्व मते व त्यांचे अन्वयार्थ खोडूनच नव्हे तर भाषाशास्त्रदृष्ट्या अभिलेखांद्वारे साधार निर्मूल ठरविण्याचे यशस्वी कार्य भारतीय इतिहास संशोधन लेखनाच्या क्षेत्रात सर्व प्रथम वैयक्तिक पातळीवर व जोखमीवर पूर्ण जबाबदारीने श्री. रा. आ. कदम यांनी केलेले आहे, हे अद्वितीयच मानावे लागेल. शतकभराची इतिहास संशोधन लेखन परंपराच फुटणाऱ्या कांचे जशी खळकन् निखळून पडते. श्री. कदम यांचे महत्त्वपूर्ण लेखन मराठीमधूनच नव्हे तर हिंदी, इंग्रजी अन्य भाषांतूनहि रूपांतरित केले जाऊन हे संशोधन सर्वांपुढे आणणे अत्यंत आवश्यक आहे; तरच या संशोधनास पूर्ण न्याय मिळेल.''** यावरून प्रा. कदम यांचे शोध निबंध किती तोलामोलाचे आहेत, उच्च कोटीचे आहेत हे दिसून येते.

तसेच डॉ. गुणे हे सत्य संशोधनाचे प्रामाणिक प्रांजळ चाहते. डॉ. गुणे यांनी गोवा प्रशासनाच्या वतीने **'गोवा गॅझेटियर खंड १ ते ३'** संपादित केलेले आहेत. डॉ. गुणे यांनी प्रा. कदम यांचे जवळ प्रांजळ कबुली दिली की, **'' मी कदंब राजवंशाचे मूळ ताम्रपट, शिलालेख पाहिलेच नाहीत. इंग्रजीतील उपलब्ध ग्रंथांधारेच कदंबांचा इतिहास संपादित केला होता. तुम्ही सादर केलेल्या अभ्यासपूर्ण प्रमाणांधारे कदंब राजकुल हे संपूर्णतः व मूलतः क्षत्रियच होते हे निर्विवाद सत्य आहे, मी ते मान्य करतो.''** पुढे डॉ. गुणे म्हणतात, **'' तुमच्या लेखावरील अनुकूल प्रतिक्रिया मला दाखविल्या नाहीत तरी चालेल, मात्र चुकून कुणाची एखादी जरी प्रतिक्रिया विरोधी सुराची असेल तर ती माझ्याकडे द्या, तिचे निराकरण मी करेन.''**

इंग्रजांनी केलेले संशोधन किती चुकीचे ठरतेय हे डॉ. गुणे यांच्या उद्‌गारांवरून दिसून येते. इंग्रजांचे सर्व काही बरोबर अशी धारणा बहुतेक भारतीयांची आहे.

भारतीय राजवंश परंपरेने स्वयंसिद्ध क्षत्रिय असूनहि त्यांस कलंकित लेखण्याचे,

त्यांचे क्षत्रियत्वच नाकारण्याचे कार्य इतिहास लेखनाच्या प्रारंभ कालापासून या देशात चालू आहे. या प्रवृत्तीचा परामर्श ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांनी **'प्राचीन महाराष्ट्र भा. १', या ग्रंथात घेतला आहे.**

सत्य संशोधनाच्या निकषावर प्रा. कदम यांच्या **''भारतीय राजवंश : एक सत्य संशोधन''**: खंड : १ या ग्रंथ प्रकाशनाचे महत्त्व अनन्यसाधारण म्हणावे लागेल. इतिहास संशोधन हेही एक राष्ट्रीय जीवनाचे प्रमुख अंग आहे. प्रा. कदम यांचे इतिहासावर सातत्याने लेखन चालू असते. त्यांच्या शोधलेखनाने दाखवून दिल्यावरून आजपर्यंत भारतीय इतिहासात ऐतिहासिक सत्याचे किती विपर्यस्त संशोधन लेखन, प्रतिपादन, प्रकाशन, ज्ञानधारण झाले आहे हे पाहून अचंबा वाटतो.

प्रा. कदम यांनी परिश्रमपूर्वक केलेले सत्य शोधन म्हणजे मौलिक असा ऐतिहासिक ठेवा आहे. त्याचे जतन संवर्धन झाले पाहिजे, कायम स्वरूपी अभ्यासकांना त्याचा लाभ झाला पाहिजे, म्हणून ग्रंथरूपाने त्यांचे लेख प्रकाशित करावे असे नेहमी वाटे. याकरिता आर्थिक बळ लागते. त्यांचे सर्व संशोधनपर लेख एका वेळी प्रकाशित करणे मर्यादे बाहेरचे असलेने हा चार शोध निबंधांचा ''खंड १ ला'' प्रकाशित केलेला आहे. याचा आनंद वाटतो.

राजनीतिज्ञ व अर्थनीतितज्ज्ञ कौटिल्य अर्थात विष्णुगुप्त, चंदगुप्त मौर्य, गोपालदारक आर्यक राजवंश, यांवरील शोध निबंध खंड २ च्या प्रकाशनाचा योग लवकर यावा अशी प्रतीक्षा आहे. छत्रपती शिवाजी महाराजांचा भोसले राजवंश, पूर्वपीठिका, व छत्रपती शिवाजी महाराजांची खरी जन्मतिथीच वादग्रस्त कशामुळे बनली? यांवरील प्रा. कदम यांचे निर्णायक शोध निबंधही ग्रंथरूपाने प्रकाशित होणे अगत्याचे आहे. प्रा. रा. आ. कदम यांचा सत्य संशोधनाचा हा ग्रंथ अभ्यासकांना निश्चितच उपयुक्त होईल यात शंका नाही. हिंदीचे गाढे अभ्यासक श्री. ब. का. विप्रदास, हे प्रा. कदम यांच्या सत्य संशोधनाबद्दल म्हणतात, **''कदम यांचे संशोधन हे सत्यशोधन असून शिवाय ते 'स्वर्ण-संशोधन'ही आहे.''** (तप्त मुशीतून बाहेर पडलेल्या सुवर्णा सारखे). या ग्रंथाच्या प्रकाशन कार्मी ज्यांचे सहकार्य लाभले त्या सर्वांचे मनःपूर्वक आभार.

संशोधक / वाचक यांच्या दृष्टींतून प्रस्तुत ग्रंथाची उपयुक्तता अधिकांशांनी सिद्ध होणारी आहे. ती म्हणजे, राजवंशांच्या उपयुक्त व कालक्रमबद्ध सर्वविध वंशावळींचे तक्ते, त्यांच्या राजसत्ते खालील भौगोलिक मानचित्रे (एकूण ७), तथा सर्वसमावेशक विस्तृत व परिश्रमपूर्वक केलेली ''विषय सूची'' यांचे अनन्य साधारण महत्त्व जिज्ञासूंच्या ध्यानीं आल्या वांचून राहणार नाही.

विजयादशमी, १९९८,
वंदे मातरम्, भारतीनगर, पुणे -२९

**बा. ग. पवार**
**प्रकाशक**

●●

## संशोधकीय दृष्टिकोन :

**डॉ. म. श्री. माटे, पुणे.**

प्रस्तुत ग्रंथात श्री. रा. आ. कदम यांचे चार दीर्घ शोध निबंध एकत्र करण्यात आलेले आहेत. नदीचे मूळ आणि ऋषीचे कूळ शोधू नये असा वाक्प्रचार आहे. मात्र इतिहासाच्या अभ्यासकांनी ऋषींचे नसले तरी राजर्षींचे कूळ शोधण्याचा उद्योग सतत चालविलेला आहे. भारतातील निरनिराळ्या राजवंशांचे काळ, स्थळ आणि कुळकथा यांविषयी विस्तृत लेखन झालेले आहे. श्री. कदम यांनी याच क्षेत्रात संशोधन करण्याचे ठरवून आज कित्येक वर्षे सतत अध्ययन चालू ठेवले आहे. या त्यांच्या परिश्रमाचे फलित म्हणजे हा ग्रंथ. यात कदंब, सातवाहन, नंद आणि वाकाटक या घराण्यांविषयीचे त्यांचे निबंध वाचावयास मिळतील. लेखकाने अभिलेखांतील आणि संस्कृत वाङ्मयातील वचनांवर, त्यांचा अन्वयार्थ लावण्यावर आपले विवेचन आधारलेले आहे.

प्रत्यक्षात, परिचय करून घेण्याचे काम फारसे सोपे नाही, हे प्रत्येक निबंधच काय पण प्रत्येक पान वाचताना जाणवू लागते. या ग्रंथात ज्यांच्यांविषयी विवेचन आहे त्या राजवंशांसंबंधी, त्यांच्या अभिलेखांविषयी डॉ. भांडारकर, ब्यूहलर येथपासून मिराशी, सरकार यांच्यांपर्यंत जवळपास शंभर वर्षे संशोधकांनी अध्ययन व लेखन केलेले आहे. या प्रत्येकाचे एका एका विषयासंबंधीचे विधान श्री. कदम यांनी समीक्षेसाठी घेतले असून त्यांचे खंडनमंडन केलेले आहे. हे करताना शब्दार्थ, शब्दार्थांच्या अर्थच्छटा, व्याकरणात होणारे त्यांचे विकार या सगळ्यांचा खोलवर विचार केलेला आहे. पुराणांमध्ये नंद व सातवाहन (आंध्र) वंशांची माहिती आलेली आहे. तसेच वाकाटक व कदंब यांच्यांविषयी माहिती मुख्यत: शिलालेख व ताम्रपत्रे यांत आलेली आहे. या सगळ्यांचा तपशीलवार परामर्श लेखकाने घेतलेला आहे.द्विज, विप्र, बम्हण असे शब्द कोठे कोठे आढळल्यामुळे हे वंश ब्राह्मण होते असे निष्कर्ष बहुतेकांनी काढले. याला अपवाद फक्त इतिहासाचार्य चिंतामणराव वैद्य यांचा ! अशा अनेक शब्दांचे पर्यायी अर्थ होऊ शकतात. इतकेच नव्हे तर ते कोणते असावेत याची चर्चा श्री. कदम यांनी अत्यंत कल्पकतेन व परिश्रमपूर्वक केलेली आहे. श्री. रा. आ. कदम यांचा मूलत: मन:पिंड हा संशोधकाचा, सत्य शोधनाचा आहे. त्यासाठी त्यांनी स्वेच्छेने, स्वानंदाने, संस्कृत साहित्य, अभिलेख, त्यांवरील आधुनिक संशोधन यांचे अत्यंत सखोल अवगाहन केलेले आहे. अंगची जिज्ञासा, चिकाटी आणि शोधदृष्टी यांच्या बळावर हा प्रस्तुतचा ग्रंथ त्यांनी सिद्ध केला आहे. प्राचीन इतिहासविषयक साहित्यात ही अत्यंत मोलाची भर आहे. यापुढेही संशोधनकार्यात मग्न राहण्यासाठी त्यांना दीर्घ आयुरारोग्य लाभो ही प्रार्थना करून ही छोटीशी प्रस्तावना संपवितो.

●●

# ज्यूरर्स व्ह्यू !

* प्रो. डॉ. ना. कृ. भिडे, एम्. डी., पुणे.

श्री. रा. आ. कदम सरांच्या प्रस्तुत लेखांविषयी माझा अभिप्राय ज्यूरर्सच्या मतासारखा आहे.

: प्रत्येक क्षेत्रात तज्ज्ञ अभ्यासू व्यक्ती एकमेकांच्या अभ्यासांतील गुण-दोष-उणिवा दाखवितात पण तज्ज्ञांच्या एकाच विषयावरील विविध परस्परविरुद्ध निर्णयांवर तटस्थ ज्यूरर्सच्या मताचा अंकुश राहिला तर फायदाच होईल. कारण तज्ज्ञ व्यक्ती कितीही अभ्यासू, बुद्धिमान, दीर्घोद्योगी असल्या तरी त्यांच्या विचारात व निर्णयात अनेक कारणांनी मानवी प्रमाद राहतातच. तज्ज्ञ व्यक्ती आपल्या व्यासंगाच्या अभिनिवेशामुळे किंवा अहंकार स्वार्थ यांच्या दडपणामुळे कधी कधी अव्यवहारी, एकदेशी, तामसी तर्कटीपणा करतात. परंपरागत माहितीला (आप्तवाक्य) अप्रमाण उचलून धरतात, किंवा तिचा अप्रमाण अवमान करतात. कधी कधी पुरावा पुरेसा असला तरी त्याविरुद्ध निर्णय देतात, किंवा काहीच निर्णय न घेता घोंगडे भिजत ठेवतात. तसेच काही तज्ज्ञ तपश्चर्येच्या आणि धूर्त व्यवहारचातुर्याच्या बळावर राज्ययंत्र, प्रचारतंत्र व राष्ट्रीय,आंतरराष्ट्रीय विद्वत्समूह यांच्यांमध्ये प्रतिष्ठा मिळवून आपले वर्चस्व कायम राखण्यासठी नवागत तज्ज्ञांच्या प्रतिभावान् अध्ययनांना व निर्णयांना कपटाने व उर्मटपणे तडकाफडकी दाबून ठेवतात. म्हणून प्रसिद्ध विनोदी नाटककार व तत्त्वज्ञ बर्नार्ड शॉ यांनी, प्रत्येक तज्ज्ञसत्ता ही समाजाच्या विरुद्धचे मोठे कटकारस्थान असते, असे लिहिले आहे. थट्टा व अतिशयोक्ती वगळली तरी त्यात सत्याचा मोठा भाग आहे हे स्पष्ट आहे. इतिहासातल्या व इतर सर्व क्षेत्रांतल्या तज्ज्ञ सत्तेच्या दोषांवर अंकुश ठेवण्यास ज्यूरर्सची मते अत्यंत उपयोगी पडतात. त्यातही अशी ज्यूरर व्यक्ती बुद्धिमान, सत्प्रवृत्त, अभ्यासू व स्वच्छ प्रतिभेची असली तर तिच्या निर्णयांमुळे समाजाचे प्रबोधन व त्या त्या शास्त्रांची प्रगती यांना मोठाच हातभार लागतो. कै. प्रो. नरहर कुरुंदकरांनी उदार, सहृदय प्रतिभेने व प्रकांड विद्वत्तेने ज्यूररच्या भूमिकेतून इतिहास-तज्ज्ञांचे दोष व उणीवा मोठ्या भारदस्तपणे अनेक वेळा दाखवून देऊन इतिहासाची मोठीच सेवा केली आहे. श्री. रा. आ. कदम सर याच दिशेने प्रयत्न करीत आहेत; हेच त्यांचे इतिहासाच्या क्षेत्रातील स्थान दिसते.

: गेली पांच वर्षे माझा श्री. कदम सरांशी परिचय आहे. सत्य व न्याय यांविषयी उत्कट तळमळ, चिकाटी, दीर्घोद्योग, अखंड वाचन, मनन व शुद्ध शास्त्रीय वृत्ती हे त्यांच्या व्यासंगाचे वैशिष्ट्य दिसते. तज्ज्ञांच्या नांवलौकिकाच्या दडपणाला अभ्यासक बळी पडला तर पाहता पाहता तो भोळेपणाच्या आहारीं जातो. सत्यनिष्ठेमुळे रा. कदम सर अशी चूक करीत नाहीत. त्यामुळे त्यांचे लेख वाचणे व त्यांच्यांशी चर्चा करणे बोधाचे व आनंदाचे वाटते.

लेख लिहिताना इतिहासाचार्य वि. का. राजवाडे किंवा प्रो. म. वा. धोंड यांची उत्कृष्ट व सुबोध शैली रा. कदम सरांनी वापरावी म्हणजे मजसारख्या वाचकांना त्यांच्या अभ्यासाचा लाभ विनाकष्ट मिळेल अशी त्यांना प्रेमळ विनंती आहे.

---

* Retired Professor of Pharmacology. All India Institute of Medical Sciences. New Delhi-29.

●●

## कदंब पुष्पार्चन :

: **(ऋणाभिव्यक्ती)** - *रामकृष्ण आनंदराव कदम.*

*M. A. 'कदम्ब'.*

: या सर्व शोध-लेखनाचे उद्दिष्ट विशिष्टत्वाने सीमित आहे. या शोधलेखांचे सार तथा प्राप्त अभिप्रायांमधील निरपवाद स्वीकृती जाणीवपूर्वक ध्यानात घेऊन, योग्य तो बोध घेऊन, या पुढील काळात भारतीय राजवंशांच्या कुलमूलत्वाविषयी लिहिणाऱ्यांनी, विद्यापीठांनी, प्रकाशकांनी, आवर्जून इतिहास-संस्थांनी, संघटनांनी, परिषदांनी सर्वप्रथम या ग्रंथातील विवेचनांचा, या व इतर अशा सर्व, प्रत्येक राजवंशावर **'क्षत्रियेतरत्व'** लादण्यापूर्वी शांतपणे अनेकवार विवेकशीलतेने विचार करावा ! आजवरचे निर्मूल व कलंककारी उल्लेख,उच्चारणे पूर्णतः नाकारावेत. सत्येतिहासाची प्रतिष्ठा टिकून राहण्यास सक्रिय सहभागी राहावे. जुने ग्रंथ (आज अखेरचे) वाचताना, पुन्हा छापताना (मराठी, हिंदी, इंग्रजी व अन्यही सर्व, देशी विदेशी भाषांतील), **भारतीय राजवंशांच्या 'क्षत्रियकुलमूलत्वा' विषयी अनाठायी अनुदार राहण्याचे सोडून द्यावे !** जागतिक/भारतीय पातळीवर भारतीय इतिहासाचे पुनर्लेखन करणाऱ्या व्रतधारी लेखक/प्रकाशक/संस्थांनी, भीष्म-प्रकल्पकांनी आवर्जून अंतर्मुख होऊन, या राजवंशांच्या निर्बाध क्षत्रियत्वाच्या अधिष्ठानावर आपले ग्रंथ प्रकाशित करण्याचा विवेक बाळगावा. आजवर संशोधनाचे विद्वत्तापूर्ण सुशोभन झाले,ते खूपच झाले ! हे थांबलेच पाहिजे ! विनासंकोच, अविलंब ! डॉ. गुणे, डॉ. साठे, डॉ. पेठे, डॉ. कोलते यांच्या पवित्र स्मृतीस विनम्र अभिवादन !

: प्रस्तुत, **'भारतीय राजवंश एक सत्य संशोधन'** च्या निर्मितीस, प्रकाशनास, मुद्रणप्र[illegible], सजावटीस जे जे कारणभूत व सहाय्यक सिद्ध झाले त्या सर्वांच्या ऋण[illegible]षयी मी कृतज्ञ आहे. मा. रा. शं. नगरकर, प्रा. कृष्ण सदाशिव गुरव सर, मा. बा. ग. पवार साहेब (प्रकाशक, मातृभूमि प्रकाशन, पुणे व संघटक, भारती विद्यापीठ, पुणे) डॉ. म. श्री. माटे, डॉ. ना. कृ. भिडे, वंदनीय प्रा. श्रीधर गणेश दाढे सर; ॐकार प्रोसेसचे श्री. संजय देशपांडे, सौ. छाया टोणपे, चित्रसंग्रहकार श्री. माधवराव शेवाळे; लेखांचे विषयी अभिप्राय लिहून देणारे सर्व विद्वद्वर, या सर्वां विषयी मी पूर्णतः ऋणी आहे. निजमातृपितृ-ऋणे माझ्याच्याने न फिटणारी आहेत.

●●

# : अनुक्रम :

---

**अभिप्राय :** **१८४-२३९**



---



---

# १. कदंब-
# क्षात्र-राजकुलाच्या वंश वर्णाविषयी ऐतिहासिक सत्याचा विपर्यास !

" 'कदंब' हे 'ब्राह्मण' वर्णाचे होते, या मताचे खंडण साधार करून 'कदंब' हे 'क्षत्रिय' होते, हे सिद्ध केले आहे." त्या दृष्टीने कदंब राजे 'द्विज' होते म्हणजे 'ब्राह्मण' होते, असे म्हणण्यापेक्षा ते 'क्षत्रियच' होते व 'द्विज' शब्दाचा अर्थ 'क्षत्रिय' असाही आहे. ओरिसातील उपलब्ध हस्तलिखितातील मुख्य-मुख्य श्लोकांचा उल्लेख करून सिद्धच विधानांस पुष्टी मिळवून दिली आहे. अशा रीतीने सर्व प्रमाणे तपासून कदंब राजवंशाचे क्षत्रियत्व सिद्ध करून येथे प्राचीन राजवंशाच्या इतिहासाच्या संशोधनात टाकलेली ही एक नवी भर ठरू शकते. अगोदरचे संशोधन हे कसे पूर्वग्रह-दूषित होते हे येथे वाचकांच्या नजरेस वारंवार आणून दिले आहे. 'द्विज' या शब्दाचा अर्थ 'क्षत्रियही' होतो, या आधाराने अभूतपूर्व सिद्धी निर्णायकतेने मिळाली आहे.

●●●

## (१) पार्श्वभूमी :

**'कदंब'** : हा संस्कृत भाषेतील शब्द संस्कृत साहित्यात विपुलतेने वापरलेला आढळतो. त्या शब्दापासून बनणारे 'कादंब', 'कादंबिनी, 'कादंबरी' हे शब्दही विपुल प्रमाणात साहित्यात आढळतात.

**'कदंब'** : या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. १. एक वृक्ष, २. समूह, ३. एक राजकुलनाम, अशा अर्थांनी या शब्दाचा विहार आपले अस्तित्व चिरंतन टिकवून आहे. भारतातील सर्वविध प्राचीन-अर्वाचीन भाषांतून 'कदंब' शब्दाचा अथवा त्याच्या पर्यायी अर्थाच्या शब्दांचा वापर आढळतो. मराठीत 'कळंब' हा शब्द 'कदंब' शब्दाचा पर्यायी शब्द आहे. तो वृक्षवाची व ग्रामवाचीही आहे. 'नीप' (= कदंब) म्हणजे 'नीव', 'न्हीव'. (कोंकण).

**'कळंब'** : हे महाराष्ट्रातील शेकडो कुलांचे 'देवक' आहे; 'कुल-वंश-निर्देशक चिन्ह' आहे.

इ.स.चा प्रारंभ ते इ.स. १५०० या काल-खंडात पश्चिम-उत्तर कर्नाटक, दक्षिण महाराष्ट्र, गोवे, कोंकण, विदर्भ, कलिंग (ओरिसा), मराठवाडा अशा विविध प्रदेशांत वेळोवेळी विविध स्थानीं 'कदंब' कुलनाम सांगणाऱ्या राजवंशांची 'अधिराजसत्ता' असल्याचे जे पुरातत्त्वीय पुरावे (ताम्रपट, शिलालेख, स्तंभ-लेख, नाणी, वास्तू, मंदिरे, तलाव इ.) गेल्या १५० वर्षांत उपलब्ध झाले, ते वेळोवेळी इंग्रज व भारतीय संशोधकांनी प्रकाशित केले आहेत.

इ.स. १८८९ मध्ये 'कदंब' राजवंशाचे १० अभिलेख प्रथम प्रकाशित झाले. त्यांच्या आधारें संशोधकांनी आपले संशोधनपूर्ण लेख प्रकाशित करण्यास प्रारंभ केला. कदंबांची वेगवेगळी व स्वतंत्र अशी ६-७ ठिकाणी राज्ये होती. उदा. वैजयंती (बनवासी), हळसी (पलाशिका), हानगळ, गोवे, या प्रमुख महत्त्वाच्या राज्यसत्ता तसेच बयाळनाड, बेलूर, बंकापूर, उच्छंगी, नागरखंड, कलिंग इ. ठिकाणी मर्यादित राज्यसत्ता कदंब-राजवंशांनी उपभोगली आहे. गोवे व कलिंग वगळता अन्य सर्व राजधान्यांची ठिकाणे उत्तर कर्नाटकात मोडतात.

अशा या राजवंशाला 'कदंब' हे कुलनाम कसे मिळाले ? याविषयाच्या कथा अनेक संशोधकांनी वेळोवेळी संकलित करून प्रकाशित केल्या आहेत, त्या मनोरंजक व प्रबोधकही आहेत. शिवाय कदंब-नृपतींनी जी दानपत्रे दिली ती ताम्रपटांवर, पाषाण-तलांवर कोरलेली आहेत. त्यांतूनही याविषयीच्या काही कथा अंकित आहेत. त्यावरून 'कदंब' वृक्ष, 'कदंब-पुष्पमाला' यांच्यांशी संबंध, संपर्क, सान्निध्य, आश्रय लाभल्याने त्या कुलाच्या मूळ पुरुषाच्या कुलास 'कदंब' हे कुलनाम लाभल्याचे स्पष्ट होते.

श्रीकृष्ण-बलराम हे जरासंधाचा ससेमिरा टाळण्यासाठी गोमंतपर्वतावर 'कदंब-वृक्षतळी' विसावले होते. बलराम त्यावेळी 'कादंबरी, (कदंब-मद्य) प्राशन करून उत्तेजित झाला, अशी कथाही अस्तित्वात आहे.

'कदंब' -कुलाचा मूळ पुरुष 'मयूरवर्मन्'मानण्यात आला आहे.वस्तुत: त्याचा पिता'बंधुषेण'कदंब,बंधुषेणाचा पिता'वीरवर्मन्', त्याचा कुणी पूर्वज'शिवस्कंदवर्मन्' यांचीही नावे, कर्तबगारी इतिहासात नमूद आहे.

वर्षाकालीन प्रथमच्या मेघदर्शनाने कदंबवृक्ष रोमांचित होतो, फुलू लागतो-फुलताफुलता सर्व वृक्ष एकाच वेळी पूर्णांशाने डंवरून फुलतो, आपला मत्त-मादक सुगंध सर्वत्र दरवळवितो.

त्याच्याच बरोबरीने इंद्रधनुष्यी रंगांनी विनटून उठणारा 'मत्तमयूर' हा राजविलासी डौलदार पक्षी उन्मादित, आनंदित होऊन आपला भव्य व विविधरंगी, डौलदार, सहस्रडोळ्यांचा स्पर्शमुलायम पिसारा राजसिंहासनामागील पटलाप्रमाणे पसरून घेतो आणि संथगती, मंदगती पदन्यासांसह नाचू लागतो,आपला नृत्यसोहळा साजरा करतो. कितीतरी विलक्षण गंमत ही! नयनमनोहर दृष्य हे !

एकाच वेळी - आकाशात पर्जन्यकालीन मेघ जमा झालेले असताना सर्व कदंब वृक्ष निसर्ग साम्राज्यात गोलाकार केशरी फुलांनी फुलून येतात. त्याचवेळी ठिकठिकाणी सर्व मोरही आपले पिसारे फुलवून नृत्यांत रममाण होतात; आणि अशाच वेळी कालिदासाच्या यक्षाला रामगिरीच्या विजनवासात विरहक्लान्त निज प्रेयसीची स्मृती व्याकुळ बनविते; आणि त्याच क्षणी तो त्या मेघाजवळ सांत्वनापर व शृंगाररस परिपूर्ण संदेश आपल्या प्रेयसीकडे पाठवितो.

योगायोग चिंतनीयच खरा. हाच कालिदास आपल्या नृपतीचा, विवाहसंबंध जुळविण्यासाठीचा, राजकन्येच्या मागणीचा संदेश घेऊन 'कुंतलेश्वरदूत'बनून दक्षिणेत राजदरबारी आला होता, असे इतिहास सांगतो. पण तो कदंब-नृपतीच्याच दरबारी की राष्ट्रकूट मानांकाच्या दरबारी की आणखी कुणाच्या दरबारी आला होता, की आलाच नव्हता याचा निर्णय संशोधकांना करता आलेला नाही.विवाहाचे 'प्रपोजल'निजपरिवार-संबंधित आप्त,रक्तनात्याचा वयोज्येष्ठ कुलवंशीय अशांच्यावर सोपविण्यात येते, अन्य इतरेजनांच्या नव्हे! हा मुद्दा या संदर्भात गृहीत धरून संशोधक शोध घेतील तर काही निर्णयाच्या आशेचा किरण सर्वांनाच जरूर लाभेल असे सुचवून ठेवावेसे वाटते.

तर असा हा 'मयूरवर्मन्' नृपती आपले साम्राज्य स्व-पराक्रमाने उभे करतो 'वैजयंती' प्रदेशात, तोच बनवासी प्रदेश. पश्चिम कर्नाटकात शरावती (सरस्वती) नदीच्या खोऱ्यांत, वरदा (सरस्वती ?) नदीच्या काठावर बनवासी राजधानी वसलेली होती.

या प्रदेशावर तत्पूर्वी सातवाहन, चुटुकुल सातकर्णी व पल्लव इत्यादी राजवंशांची सत्ता असल्याचे पुरावे, साधने उपलब्ध आहेत.

**(२) कदंब-वर्णाविषयी विभिन्न मते :** 'मयूरवर्मन'कदंब याचे 'मूळ' कोणते ? हा कोण,कोठला, कसा आला ? याचा 'वर्ण' काय? याचा 'वंश' कोणता? याबाबतींत

विभिन्न मते आहेत, ती अशी :

१. कदंब हे **'जैन'** होते. (महाराष्ट्रीय ज्ञानकोश).
२. कदंब हे **'ब्राह्मण'** होते.(इंग्रज संशोधक).
३. कदंब हे 'एतद्देशीय द्रवीड वंशीय' होते.(कदंबकुल:मोरेस).
४. कदंब हे **'कुरुंब'**या रानटी जमातीचे होते. (डॉ. गुस्ताव ऑपर्ट), (कुरुंब=कुणबी), (गोमंतक : सातो. पृ॰-२१४).
५. कदंब हे **द्रवीड ब्राह्मण, कानडी भाषिक** होते; ते **आर्यवंशी नव्हते !** (गोमंतक-२ : सातोस्कर, पृ॰ २१४).
६. कदंब हे **'बेरड'** होते. (??): (सह्याद्रि-जोगळेकर).
७. कदंब हे **'नागवंशी'** होते. (कदंबकुल -मोरेस).
८. कदंब हे **'उत्तरभारतीय'** होते. (कदंब - ताम्रपट).
९. कदंब हे **नंद - वंशसंबंधित** होते. (कदंब - ताम्रपट).
१०. कदंब हे **'इक्ष्वाकुवंश'** संबंधित अथवा **'सूर्यवंशी'** होते. (जैन शिलालेखसंग्रह - पं. विजयमूर्ती; भा. २, पृ॰६८-६९).
११. कदंब हे **'आर्य-क्षत्रिय-मराठे'** होते. (मध्ययुगीन भारत, भा-२, चिं. वि. वैद्य).
१२. **'कार्दंब'** हे **'कदंबां'**चे'औरसपुत्र' नसावेत! (महाराष्ट्रीय ज्ञानकोश (क) २९. श्री.व्यं. केतकर).

या सर्व संशोधनाला मूळ कारणीभूत झाला आहे, 'ताल-गुंड'! हा 'ताल-गुंड' कोण ? जर तो 'ताल' आहे, तर संशोधक चकले कसे?

तालगुंड हे उत्तर कर्नाटक (जि. शिमोगा) मधील एक ऐतिहासिक ठिकाण आहे. तेथे एक 'शिलास्तंभ-लेख' सापडला इ. स. १८९३ मध्ये. तो लेख आहे 'कदंब' राजवंशाविषयीचा.त्यात मयूरवर्माची हकीकत आहे-त्याच्या दारात 'कदंब-वृक्ष' वाढला होता; म्हणून त्याचे कुल 'कदंब' कुल बनले.

**(३) तालगुंड :** (स्थाणु - कुंदूर) (स्थाणु=शिव) **लेख** : = शिवतीर्थ. या लेखात :-

१. **मयूरशर्मन्** (कदंब) शर्मन्-नामान्त आहे. म्हणून तो 'ब्राह्मण',
२. तो **'द्विज-कुली'**न होता, म्हणून तो 'ब्राह्मण' होता;
३. तो **'द्विजोत्तम'**होता; म्हणून तो 'ब्राह्मण' होता;
४. तो **'मानव्यगोत्री'** होता; म्हणून तो 'ब्राह्मण' होता.
५. तो **'हारीतीपुत्र'** होता; म्हणून तो **मातृगोत्र**-नाम सांगणारा द्रवीड वंशीय 'ब्राह्मण' होता.
६. तो **मातृगण-भक्त** होता.

७. तो **मातृगण-आशीर्वच-अभिषिक्त** होता.

८. तो **स्कंद-(कार्तिकेय)- भक्त** होता.

९. विविधयज्ञपूर्तिकारणें त्याचे **शिरोकेश** सतत आर्द्र असत; म्हणून तो **'ब्राह्मण!'**

१०. त्याने ब्राह्मणत्वाचा (?) त्याग करून क्षत्रियत्व पत्करले,आणि 'मयूरशर्मन ऐवजी 'मयूरवर्मन्' हे नामाभिधान धारण केले.म्हणून तो 'ब्राह्मण' वर्णीय होता! व म्हणून गेली २,००० वर्षे भारतीय इतिहासात कीर्तिवंत असणारे 'कदंब'हे राजघराणे 'ब्राह्मण' होते ! असा अभ्यास विश्वविख्यात बनून नित्याचा निनादतो आहे; किंबहुना तसा तो हेतुतः निनादत ठेवला गेला आहे.

वाचक म्हणतील यात बिघडले कुठे ? यात वावगे काय?

पण प्रश्न असा आहे की वरील नमुन्यादाखल प्रातिनिधिक क्र. १ ते १० ही विधाने 'ब्राह्मणत्व' हे 'कदंबां'वर लादण्यास समर्थ आहेत काय ? उत्तरे क्रमानेच पाहायची आहेत.

**१) शर्मन्ः**

'शर्म', 'वर्म' हे काही निर्णायक 'वर्ण-मर्म'नव्हे; की 'परतत्त्व-प्रेषित' सनातन सत्य-धर्मही नव्हे ! 'शर्मा' ही नामान्त उपाधी केवळ 'ब्राह्मणत्व' सुचविते, असे नाही. 'शर्मा' उपाधियुक्त सूर्यवंशी,चंद्रवंशी कित्येक राजे-महाराजे 'क्षत्रिय' वंशांतही होऊन गेले आहेत. (प्राचीन भारतीय चरित्रकोष : (हिंदी)
: (संपा. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव).

दुसरे असे की त्या तालगुंड शिलालेखाचे वाचन डॉ. बी. आर. गोपाल यांनी इ. स. १९८५ च्या दरम्यान स्वतः केले. तेव्हा त्यांना 'शर्मा' नव्हे तर 'वर्मा' नामान्त 'मयूरवर्मा' हे नाव आढळून आले, अगदी ठामपणे !

शिवाय त्याचा पिता हा देखील **'बंधुषेण'** आहे. तो 'शर्मा'-नामान्त नाही; व पितामह हा देखील **'वीरवर्मा'** आहे; तो 'वीरशर्मा'नाही; याविषयीचे अनेक अभिलेखीय पुरावे उपलब्ध आहेत. कांचीस 'मयूरवर्मन्' याच्याबरोबर गेलेला 'गुरु' अन्य कुणीही नसून हा त्याचा आजोबा 'वीरवर्मा' होता( जो'शर्मा' -नामान्त वाचण्याची चूक केली गेली आहे किंवा कोरक्याची ती चूक).

'वीरवर्मा' याचा पूर्वज 'शिवस्कंदवर्मा' हाही 'शर्मा'- नामान्त नाही, शिवाय पुढील पिढ्यांतील सर्वच्या सर्व, वैजयंतीचे 'कदंब-नृपती','वर्मा'-नामान्तच आहेत; 'शर्मा'- नामान्त एकही नाही, येथेच 'ब्राह्मणत्वा'चा आभास पुसला जाणे उचित होते.

इ. स. १८९६ मध्ये एका इंग्रज संशोधकांनी 'तालगुंड लेख' प्रसिद्ध होण्यापूर्वीच आपली प्राथमिक टिप्पणी व्हिएन्नाहून 'अर्केदमी' च्या अंकात प्रसिद्ध केली.त्यात ते म्हणतात,'मयूर' या'ब्राह्मणाने'कोणातरी 'क्षत्रिय' राजकन्येशी 'विवाह' केला असावा, म्हणून 'मयूरवर्मा' सह त्याच्या पुढच्या सर्व पिढ्यांनी 'वर्मा'- नामान्त

अभिधाने धारण केली असावीत!'' आईचा 'वर्ण' 'संतती'ला देऊन मोकळे! आधार? 'मनूसारख्या कुठल्यातरी स्मृतीचा ! तिला नाव नाहीच ! 'मनू' म्हणतो ब्राह्मण-पुरुष व क्षत्रिय-स्त्री यांच्या संततीला दोहोंच्या मधली 'जात' बहाल करावी ! आता तिला नांव ? तेही नाही ! ते 'मनू' सांगतच नाही.मनूलाही ते माहीत नाही! संशोधक तर'मधली'नव्हेच, तर मातेचीच'जात'संततीला अध्याहृतपणे देऊन मोकळे ! शब्दात नाही, मौन पाळून ! रट मात्र, 'कदंबवंशीय राजे 'ब्राह्मण'होते !

पण मग ते झाडून सारे 'वर्मा' नामान्त कसे? तर ते जन्माने 'ब्राह्मण' पण व्यवसायाने 'क्षत्रिय' म्हणून ! पण तरीही ते कदंबनृपती 'ब्राह्मण' होते ! अशी ही शक्कल ! भार्गव-रामाची पितृमाता क्षत्रियाणी, स्वमाता क्षत्रियाणी ! त्याला कोणती 'जात' संशोधक देऊ शकतात? तरीही ते क्षात्रान्तक ब्राह्मणच ठेवले गणले गेलेत ना ? की हेही असत्य ?

ज्ञानकोश, संस्कृति-कोश, विश्व कोश-कारांची दृष्टी संशोधनाची दिसत नाही. मूळात जाऊन सत्यता पडताळण्याची नाही! ''आम्ही या ग्रंथांतून घेतले!'' या संपादकांनी भारताचार्य चिं. वि. वैद्य यांच्या मूलगामी, निर्णायक, परखड संशोधनाची 'याबाबतीत' साधी दखल, उल्लेखापुरतीही घेतलेली नाही ! अनुल्लेखाने त्यांना डावलून मध्ययुगीन राजवंशांविषयीचा इतिहास संशोधक व इतिहासकार सत्याचा विपर्यास करणाराच प्रसृत करीत राहिलेले आहेत. बा. द. सातोस्कर मात्र थोडी तरी दखल वैद्य यांच्या मतांची 'गोमंतक-२' मध्ये घेतल्याचे दर्शवितात, पण आपल्या विचारापासून तेही ढळत नाहीत.



**२) तालगुंड** : लेखात **'द्विज-कुल'** असा शब्द आला आहे. 'कदंब' हे द्विज-कुलीन होते, असा त्यातून अर्थ निघतो.

'मनुस्मृती'च काय, पण इतरही अनेक ग्रंथांनी 'द्विज' या विशेषणाने तीन वर्णांचा बोध होत असल्याचे स्पष्टपणे मान्य केले आहे. येथे 'द्विजकुल' हे 'ब्राह्मण' असू शकते,'क्षत्रिय' असू शकते,'वैश्य' असू शकते; एव्हढेच काय पण 'शूद्र' ही असू शकते; कारण शूद्रांनाही संस्कारांचे अधिकार आहेत व संस्कारान्ती तेही स्वतःस 'द्विज' म्हणवून घेऊ शकतात. याला प्रमाणे विपुल आहेत आणि तीदेखील 'ब्राह्मण - ग्रंथकारांनी' नमूद केलेलीही. पण येथे वैदिक परंपरेचे प्रणेते 'राजकुल' हे 'द्विजकुल' आहे, आणि म्हणूनच ते'क्षत्रिय-कुल' आहे. ते अन्य कोणत्याही वर्णाचे नाही.
'क्षत्रं राजन्यः।' (ऐ. ब्रा. ८-६)

**३) 'द्विजोत्तम'** : द्विजांमध्ये 'उत्तम' तो द्विजोत्तम ! कुणीही 'द्विज' स्वतःस **'द्विजोत्तम'**म्हणवून घेऊ शकतो; अर्थात 'संस्कारित' तोही 'द्विजोत्तम' ठरेल! पण येथे 'राजवंशीय' नृपती 'मयूरवर्मन्' द्विजोत्तम आहे.'कुणी सामान्य क्षत्रिय' नव्हे की अन्यवर्णीय नव्हे ! **क्षत्रियश्रेष्ठता:** पाहता:-

१.'प्राणो हि वै क्षत्रं जायते हैनं प्राणः क्षणितोः ।' (श. ब्रा. १४-८-१४-४)

२. "क्षत्रं वीर्यं राजन्यः । " (ऐ. ब्रा. ८-२)
३. "क्षत्रं हि राष्ट्रम् ।" (ऐ. ब्रा. ७-२२)
४. "आदित्यो वै दैवं क्षत्रम् आदित्य एषां भूतानामधिपतिः।" (ऐ. ब्रा. ७-२०)
५. 'प्रजापतिर्वै क्षत्रम् ।' (श. ब्रा. ८-२-३-११)
६. 'मित्र : क्षत्रं क्षत्रपति : ।' (तै. ब्रा. २-५-७-४)
७. 'क्षत्रं वरुणः ।' (कौ. ब्रा. ७-१०)
८. 'क्षत्रं वा इंद्रः ।' (कौ.ब्रा. १२-८)
९. 'ब्रह्म (ब्राह्मण नव्हे!)हि पूर्वक्षत्रात् ।' (तां. ब्रा. ११-१-२)
१०. 'क्षत्रं वैश्वानरः।' (श. ब्रा. ६-६-१०७)
११. 'क्षत्रात् परं नास्ति ।' (श.ब्रा. १४-४-२-२३)
१२. 'ब्राह्मण':' क्षत्रियमधस्तादुपास्ते राजसूये ।' (उपरोक्त)
१३. 'क्षत्रस्य योनिर्यद् ब्रह्म ।' (ब्राह्मण नव्हे). (श. ब्रा. १४-४-२-२३)
१४. 'ब्रह्मणः (ब्राह्मण : नव्हे !) क्षत्रं निर्मितम् ।' (तै. ब्रा. २-८-८-९)
१५. 'अभिगन्तैव ब्रह्म कर्ता क्षत्रियः।' (श. ब्रा. ४-१-४-१)
१६. 'यस्तान्तवं वस्ते क्षत्रं वर्धते, न ब्रह्म ।' (गो. उ. २-४)
१७. 'एतानि क्षत्रस्यायुधानि यदश्वरथः कवच इषुधन्व !' (ऐ. ब्रा. ७-१९)
१८. 'राजन्य'(=क्षत्रिय=वीर=वीर्य=प्रताप) हा सर्व वर्णांत उच्च, उत्तम, श्रेष्ठ असल्याचे उल्लेख 'तैत्तिरीय संहितेत' उपलब्ध आहेत. (उदा. तै.सं. २-५-१० १)
१९. याउलट 'ब्राह्मण' हे'क्षत्रियां' पेक्षा श्रेष्ठ आहेत, असे उल्लेखही आहेत.' (अथर्व. ५-१८; ५-१९; मै.सं. ४-३-८; वा.सं. २१-२१ श. ब्रा. १३-१-९-१; १३-३-७-८).

-अर्थात ही **'ईर्षा'**, **'स्पर्धा'** झाली !. ईर्षेला बंध कोणाचे?

२०."ना विष्णु : पृथ्वीपतिः !" हे सूत्र समजून घेतले तर 'क्षत्रिय श्रेष्ठ' की 'ब्राह्मण श्रेष्ठ' असा विवाद उपस्थित न होता, 'क्षत्रिय राजा,' 'नृपती' हाच सर्वोत्तम, व 'द्विजोत्तमही' यात शंका राहत नाही; विद्वानांपुरती तरी राहू नये !!

२१. नृपः = नृपति : = नृपालः a King, राजा, क्षत्रिय । 'जाताभिषंगो नृपतिः । :(R. २-३०)

-'विद्वत्वं च नृपत्वं च नैव तुल्यं कदाचन् ।' :(Subhash)

**४)'मानव्य गोत्रः'।**

१. मनूचे पुत्र ते मानव, त्यांचे गोत्र ते 'मानव्य' 'मानवता' ! यापेक्षा 'उदात्त गोत्र' अन्य कोणते ? कुणाचे ?

२. 'मानव्य गोत्र' ब्राह्मणांत नाही, अर्थात 'कदंब' (तथा सातवाहन,वाकाटक,

इक्ष्वाकू, चुटुकुल,चालुक्य हेही) 'ब्राह्मण' नाहीत; (कारण तेही 'मानव्य गोत्री' स्वत:स म्हणवितात! ) तर -

३. 'क्षत्रियांचे गोत्र मानव्य।'- (ग्रंथ-वचने) : म्हणून उपरोक्त राजवंश 'मानव्य गोत्री-क्षत्रियच' होत !

५) **'हारीतीपुत्र:'.**

१. 'हारीती' हे मातृगोत्र वा मातृगोत्रनामही नव्हे, म्हणून हे वंशही 'द्रवीडवंशीय' नव्हते ! 'हारिती' ही कुणी मानवी (मनुष्य) - 'स्त्री' नाही.

२. हारीती = सरस्वती ! 'सरस्वती', 'भारती', 'इरा', 'इडा','इळा' जी 'वाग्वेदी', 'वाणीची देवता' ! तिचीच ही भिन्न भिन्न नावे.

३. हरख्वैती = सरस्वती नदी; या सरस्वतीचे, हरख्वैतीचे = हारीतीचे पुत्र हे'हारीतीपुत्र !'

४. सरस्वतीच्या खोऱ्यात मूळ वसतिस्थान ज्या क्षत्रिय-गणांचे होते ते 'हारीतीपुत्र' ! = भरत-जन ! त्यांची वाणी ती 'भारती'!

५. भरत-जनांचे वंशज ते भारत-जन, भारत!

६. भारतांचा देश, भारतांचे राष्ट्र तो 'भारतवर्ष!'

७. भारतांची जी वाणी ती 'भारती'! (मध्ययुगीन भारत:-वैद्य).

८. या भारती-सरस्वती-वाग्देवीचे मंदिर कदंबांनी गोव्यात उभारले होते. त्यांच्या अनेक अभिलेखांत'भारती'चे निर्देश येतात; सरस्वतीचे येतात; अफगाणिस्तान प्रदेशाचे येतात; हिमवंताचे येतात; नंदांचे येतात, उत्तर भारताचे येतात.

९.'झेंद - अवेस्ता' या पारसीधर्मग्रंथात 'सरस्वती=हारीती' चे अनेक उल्लेख आलेले आहेत. (भारतीय साम्राज्य = पावगी).

१०. ही 'हरख्वैती' (सरस्वती=हारीती) नदी दक्षिण अफगाणिस्तानात आहे, पंजाबात आहे, उत्तर प्रदेशात आहे, गुजराथेत (साबरमती-शरावती=सरस्वती) आहे, कोल्हापूरच्या पंचगंगांपैकीही एक 'सरस्वती आहे, कर्नाटकात 'शरावती' (शरीती, सरस्वती= वरदा) ही पश्चिमवाहिनी सरिता आहे व तिच्याच काठी 'वैजयंती' (=बनवासी) ही कदंबांची मूळ व प्रमुख राजधानी आहे.

- (प्राचीन भारतीय लोकधर्म : (हिंदी) - वासुदेवशरण अग्रवाल)

६) **व ७) मातृगण-भक्ती :**

झेंद-अवेस्ता ग्रंथातील 'हप्तहिंदू'(=सप्तसिंधू= सप्तसरिता) म्हणजेच 'मातृगण' होय. 'सप्तमातृका' (क्षुद्र?) देवता म्हणजे कदंबांसाठी 'मातृगण' नव्हे ! या मातृगणांद्वारा नित्य आशीर्वचन-जलाभिषिक्त होतात; त्यांचे नित्य ते ध्यान, चिंतन, मनन, अनुध्यान करतात ! येथे मातृ-वंश, मातृगोत्र, असा कुठलाही 'द्राविडी' संबंध अभिप्रेत नाही.

**८) स्कंद** : (= महासेनापती) :

'कदंब' हे 'क्षत्रिय' होते, म्हणूनच 'शिवभक्त' होते. शिवपुत्र कार्तिकेयाचे, देवांच्या महासेनापतीचेही भक्त होते. क्षत्रियच क्षत्रियत्वाची पूजा-भक्ती करणार ? अन्य कोण करतील ? अन्य कुणाची करतील ? 'शिव' म्हणे 'शूद्रां'चे दैवत ! आणि तरीही शिवभक्त अशा कदंबांनाही 'ब्राह्मण' (एकमेव शुद्ध आर्य !) ठरविण्याचा हेका हा कायमच !

**९) यज्ञ** : 'यज्ञ'हे वैदिक परंपरेचे द्योतक असून 'कदंब' हे वैदिक परंपरेचे पाईक होते. त्यांनी अनेक यज्ञ केले म्हणजे ते 'ब्राह्मण' कसे काय ठरतात ! याचा उलगडा न होण्यासारखा आहे ! 'यज्ञ' हे 'क्षत्रियांसाठीही' त्याज्य होते की काय ! न कळे !

**१०) 'वर्ण-त्याग':'वर्ण-स्वीकार !'**

प्राचीनच काय, पण मध्ययुगीन काळातही, कोणासही आपला 'वर्ण' टाकून, दुसरा 'वर्ण' प्राप्त करता आल्याचे उदाहरण नाही; भले मग एका वर्णात जन्मून दुसऱ्या वर्णाचा व्यवसाय कोणी करीत असे ! आपल्या वर्णाचा व्यवसाय टाकणे म्हणजे वर्णत्याग करणे व दुसऱ्या वर्णाचा व्यवसाय पत्करणे म्हणजे दुसरा वर्ण प्राप्त करणे हे कसे ?

'व्यवसाय-स्वीकार' म्हणजे 'वर्ण-स्वीकार नव्हे ! आणि त्याला मान्यता तरी कोण देणार? राजसत्ताच ना? की धर्मसत्ता? **ताम्रपटांतून 'धर्मसत्ता' हा शब्दही 'राजसत्तेचा अंकित होता!'** कारण ? **'राजा कालस्य कारणम् ।' 'राजा धर्मस्य कारणम् ।'** राजा हाच धर्म-महाराज ! राजा हाच धर्माधिराज ! राजा हाच दंडाधिराज राजा हाच न्यायाधिराज ! धर्मसत्ता ही राजसत्तेचेच अभिन्न अंग होती.

क्षत्रिय कदंब-नृपती हे 'वर्णाश्रमधर्म'- नियंते-नियंत्रक होते; तसेच तत्कालीन इतर क्षत्रिय नृपतीही 'वर्णाश्रमधर्माचे नियंते,नियंत्रकच होते. तेव्हा, ''राजेच वर्णातिक्रम करीत होते'', असली विधाने पुढे करून संशोधकांनी आपले प्रस्तर-काठिण्य प्रदर्शित केले आहे. इंग्रज ग्रंथकारांचा हा प्रमाद 'क्षम्य' ठरू शकतो ! कारण क्षमा व सहानुभूती हा भारतीय संस्कृतीचा आत्मा आहे.पण भारतीय अभ्यासकीय विचारवंतही अभिनिवेशी बनून भलत्याच सिद्धांतांची 'री' ओढत राहणार असतील तर त्यांना क्षमा कोण करणार ? तेव्हा 'काल' हा विपुल आहे, एवढेच म्हणायचे.

**११) तालगुंड- लेखात:** 'विप्राणां ।'(विप्र=ब्राह्मण-?) असाही एक शब्द आला आहे; म्हणून 'कदंब' हे ब्राह्मण'! हेही त्यातलेच व्यर्थतापूर्ण संशोधन !

'विप्र' हा जसा 'ब्राह्मण'असू शकतो, तसाच तो ब्राह्मणांव्यतिरिक्त अन्य वर्णाचाही कुणी असणार ! -

१) 'विशेषत्वाने वसते प्रज्ञा जयाचे ठायी तो 'विप्र,'

२) 'विशेषत्वाने केले आहे वेदाध्ययन तो 'विप्र',
३) 'अनुभूतिसंपन्न गायक तो 'विप्र' ! (ऋ-१-१२९-२-११).
-तेव्हा 'वेद', 'प्रज्ञा', 'विद्वत्ता', 'अनुभूतिसंपन्न गायन' इ. वैशिष्ट्ये कोणत्याही वर्णीयांसाठी 'अस्पर्श्य,' 'अधिकारकक्षाबाह्य', असे कोण ठरविणार?

अर्थात 'विप्र' म्हणजे केवळ 'ब्राह्मण (च)' नव्हे! संदर्भानुसार त्यांचा अन्वयार्थ घेणे उचित होय.

'विप्र' म्हणजे 'विद्वान', 'पंडित' हे संदर्भ, 'ऋग्वेदा'त विपुलतेने उपलब्ध आहेत.

'विप्र' हे अर्जित 'विशेषण' आहे; तर 'ब्राह्मण' ( विशिष्ट मर्यादित अर्थे) हा शब्द वंश, वर्ण आहे, 'विप्र' हा 'वर्ण' नव्हे, जसा 'द्विज' हा शब्दही 'वर्ण' नव्हे ! हे शब्द व्यक्तीच्या व्यक्तिमत्त्वाचा, व्यक्ति-गुण अथवा वृत्ति-विशेषत्वाचा तपशील पुरवितात, एवढेच !

**१२) डी. सी. सरकार म्हणतात-**

"that they (Kadambas) later gave themselves as 'Kshatriya' is proved by the fact that not only the names of the succeeding kings (in fact all the kings) ended in 'Varman' (वर्मन) but 'Mayursharman' (मयूरशर्मन) was himeself carved 'Mayur-varman' (मयूर -वर्मन) in all later records of the family."

-("कदंब राजे पुढील काळात ते स्वतः 'क्षत्रिय' होते हे पूर्णतः सिद्ध करतात; ते केवळ पुढचे सर्वच राजे (कदंब) हे 'वर्मन्' उपाधियुक्त वर्णिले आहेत, असे नव्हे तर 'मयूरशर्मन्' हा स्वतःसुद्धा 'मयूर-वर्मन्' या नांवानेच कदंबकुलाच्या सर्वच्या सर्व अभिलेखांतून वर्णिलेला आहे. (यावरूनही कदंबांचे क्षत्रियत्वच स्वयंसिद्ध आहे.)

**१३) 'नीप'- वंश :**

(सोमवंश=पुरुवंश) : पुरुवंशीय सुविख्यात नृपती (प्रा.भा.च. कोश), (भाग.पु. ९-२१-२४; म.भा.उ. ७२-१३; मत्स्यपु. ४९; हरिवंश. १-२०; वायुपु. ९९ - १७८; सोमवंश - द्विमीढ - भाग. पु. ९-२१-२ ते ८) इत्यादी विविध इतिहास, पुराणे, महाभारत इ. ग्रंथांतून वर्णिलेले 'नीप' वंशीय (क्षत्रिय) राजे (नीप= कदंबवृक्ष) व 'कदंबवंश' यांचे अन्योन्य संबंध व वंश-अन्वय हे देखील स्वतंत्र संशोधनीय आहेतच.

**१४) 'पुराणां' तूनची** "अमुक-अमुक ब्राह्मण राजा झाला," असली विधाने ही आत्मवंचनाकारकच मानली पाहिजेत. कुणीही स्वतःचा वर्ण वाईट, कनिष्ठ असे कधीच मानत नाही, म्हणत नाही. म्हणून "मला दुसऱ्या वर्णात घ्या," अशी कुणी कधी मागणीही करीत नाही आणि मागितला म्हणून कुणी कुणाला जन्मप्राप्त वर्णाहून अन्य 'वर्ण' देऊ शकण्यास समर्थ नाही; आणि सारेच 'देव' सुद्धा चार-वर्णांत चिरंतनाचे,

कायमचे, विभागलेले आहेत; हे आम्हां सामान्यजनांपैकी कितीजण जाणतात ? प्रत्येक देवाचा एक-एक स्वतंत्र वर्ण आहे ! (म्हणे !! ):(बृ. उपनिषद)

**१५)'पुनर्जन्म'** सुद्धा पूर्वसंचितांनुसार, कुलधर्मपरंपरेनुसार पुन्हा-पुन्हा त्याच-त्याच कुल-वर्णात लाभतात ! 'आजोबा' नाही का 'नातवा'च्या रूपाने पुन्हा जन्माला येतात ! एवढेच नव्हे तर 'पती'सुद्धा 'पत्नी'च्या पोटी स्वत: जन्माला येतो, तोही आपलाच वंश-वर्ण पुढे चालवीत राहतो.ही आमची भारतीय सांस्कृतिक श्रद्धा, निष्ठा! तथापि पुराण-कथांतून मात्र मागील जन्म व चालू जन्म यांच्या कुल-वर्णांत तफावत वर्णिलेली दिसते; ती 'रंजकते' साठी, विशिष्टांच्या 'स्वप्न-पूजे'साठी होय, असे मानून ते सोडून देणे उचित ठरते. श्रीसमर्थ रामदास म्हणतात-

''जयासि जैसे भासले। तैसे त्याने 'कवित्व'केले। शास्त्रांमाजि घुसडूनि दिले।''

**१६)** 'वीरवर्मा' हा 'मयूरवर्मा' कदंबाचा पितामह, तोच त्याचा 'गुरु'! त्यालाही 'वीरशर्मा' बनवून टाकला अभिलेख वाचणाराने ! 'वीर' (=योद्धा, लढवैय्या, शूर सैनिक, अर्थात 'क्षत्रिय') हा शब्द 'क्षत्रियत्वा'चा द्योतक असताना त्याचा 'वीर-पंत', 'वीर-पंतोजी' बनविण्यात काही तरी आपण चुकतो आहोत याचा सारासार विचार विदेशी व एतद्देशीयही संशोधकांनी पूर्णत: दुर्लक्षिल्याचे पाहून गंभीरता भारून टाकते.'शर्मा' ब्राह्मण व 'वीर'ही ब्राह्मण ! 'वर्ण' हे संशोधकांनी 'चलनी नाणे' मानले !

**(४) क्षत्रियत्व-पूरक प्रमाणे:**

१. **'सिद्धम् ।'** नम: शिवाय ।

अ) 'सिद्धम्' हा 'तालगुंड' या अभिलेखाच्या प्रारंभीचा शब्द, कदंब, सातवाहन, चुटुकुल, चालुक्य, इक्ष्वाकू, गंग इ. राजवंशांप्रमाणेच इतरही काही राजवंशांच्या लेखारंभीही अनेकदा येतो.

आ) या शब्दाचा संबंध जैन, शिवगण, बौद्ध,सिद्ध-लोक (प्राधेच्या गंधर्वपुत्रांपैकी एक) यांच्यांशी पोहोचतो; तसेच त्याचा अर्थ 'सिद्धी असो !' असा आहे ! सर्व प्रकारच्या कल्याणकारी मांगल्याची व इच्छित कार्याची सिद्धी परिपूर्तीची इच्छा यातून व्यक्त केली जाते.**सत्य, परतत्त्व, ब्रह्म, सूर्य, म्हणजेही 'सिद्ध'!**

इ) सिद्ध-देश =भारतवर्षीय देश (म.भा. भीष्म.अ.९) सिद्ध-पूर = भारतवर्षीय क्षेत्र; यावरून 'सिद्ध'ही उत्तर भारतातील - उत्तर - कुरु - देशान्तर्गत 'सिद्ध' लोकांची भारतभूमी, मायभूमी.'तेथे सदैव फुले-फळे देणारे वृक्ष आहेत; त्यांतील काही 'कल्प-वृक्ष' आहेत. (म.भा.भीष्म. ७-२-११).

ई) हा शब्द वैदिक वाङ्मयात नाही. (वैदिक कोश).

उ)'शिवास वंदन' आहे; 'नम: शिवाय !'

२. ''जयति विश्वदेवसंघात - निचितैकमूर्तिस्सनातनः । स्यानुरिन्दु-रश्मि-विच्छुरित-द्युतिमजटाभार-मण्डनः ॥''

अ) **विश्वदेवः संघात** 'विश्वा'चे १० पुत्र (संघात=गट).

**''वसुः सत्व क्रतुर्दक्षः कालः कामो धृतिः कुरुः ।**
**पुरूरवांमाद्रवाश्च विश्वदेवाः प्रकीर्तिताः ॥''**

ही त्यांची नावे आहेत. अशा सर्वांची मिळून जी एकचएक मूर्ती, जी 'सनातन' आहे, तिचा जय असो. (**सनातनः** = १ विष्णू,२.शिव, ३. ब्रह्मा, ४. सूर्य. सनातनी = १ लक्ष्मी, २. दुर्गा, पार्वती, ३. सरस्वती). निचित = एकत्रित - एक = ए+क; (कः=सूर्य); ए=विष्णू, एक=विष्णू, =सूर्य, एकमूर्ति=सूर्य).

- ज्याच्या जटाभारातील चंद्रकिरण- मंडलांनी ज्याचे भाल शोभायमान आहे अशा शिवास वंदन असो, त्याचा जयजयकार !

३. येथे काकुत्स्थवर्मन् कदंब यास सुरेंद्रतुल्य म्हटले आहे; (इंद्रासमः इंद्र हे क्षत्रियांचे दैवत.तो पूजनीय व विशाल बुद्धिसंपन्नही आहे); तो 'भूपति' आहे; कदंबवंशीय आहे; 'सेनानी' आहे अर्थात् 'क्षत्रिय' आहे.

४. बृहत्+अन्वय= वंशपरंपरेने ज्या वंशात योद्धे रणशार्दूल, पराक्रमी सेनापती होऊन गेले आहेत, अशा वंशरूपी व्योमातील(आकाशातील) तो 'चंद्रमा' आहे.

- या सर्व वर्णनात 'ब्राह्मणत्वा'चा लेशमात्रही वर्णिलेला नाही, हे ध्यानी घेणे आवश्यक आहे

५. ''अथ **बभूव द्विज-कुलं प्रांशु** विचरद्गुणेन्द्रशुमंडलम् ॥''

येथे 'प्रांशु=सूर्य । प्रखर आहेत 'अंशु' (=किरण) ज्याचे तो, अर्थात सूर्यकुल, सूर्यवंशीय कदंब-नृपती; ज्यांच्या गुणरूपी चंद्रकिरणांचे मंडल शोभायमान आहे, असे ते कदंबनृपतींचे कदंबराजकुल अस्तित्वात आहे.

६.'' **-त्र्यार्षवर्त्म - हारितीपुत्रम् - ऋषिमुख्य - मानव्यगोत्रजम्** ॥ '' (४)

त्रि (=तीन) = आर्ष (=पवित्रतम, =प्राचीनतम, अभिजात) =वर्त्म (=मार्ग, पथ) ज्यांनी तिन्ही वेदमार्गशाखांचे अनुगमन अनुशीलन केले आहे, अशा प्राचीन इळा-भारती-सरस्वती अर्थात 'हारिती' चे पुत्र, प्रमुख ऋषी जे मनू-मानव्य-त्यांचे गोत्रज असे कदंब -नृपती; इळा - भारती - सरस्वती या देवतांच्या - सरितांच्या मूळ क्षेत्रांत-भू-भागांत ज्यांचे मूळ वसतिस्थान, उत्पत्तिस्थान होते, असे कदंब नृपती.

७. **'गुरु'चे** लाक्षणिक अर्थ सूचक व निर्णायक आहेतः-

**गुरु : = १.** Dear, beloved : (प्रिय).

२. Mighty, powerful, (बलवान).

३. Valuable, (मौलिक).

४. A father, (पिता).
"न केवलं तद्गुरुरेकपार्थिवः
क्षितावभूदेकधनुर्धरोऽपि सः ॥" :(रघुवंश ३-३१, ३-४८, ८-२९)
५. forefather, ancestor,(पूर्वज, पितामह). :(प.-५-२९)
६. Any venerable or respectable person. an elderly personage, or relative, the elder. (pl.).
(सन्माननीय, वंदनीय व्यक्ती, वयोज्येष्ठ व्यक्ती, नातलग, पारिवारिक श्रेष्ठ जन.)
तेव्हा हा 'गुरु वीरवर्मा' हा 'ब्राह्मण आचार्य' नसून क्षत्रियकुलसंबंधी, (रक्ताचा, नात्याचा) पूर्वज पितामह होता, 'मयूरवर्मन्' कदंबचा.

८. 'क्षत्रात्परिपेलवा विप्रता यतः ।'
अ) येथे 'क्षत्रात्' हा संदर्भ पल्लव-नरेशांशी आहे; अर्थात् ते पल्लव-नृपती 'क्षत्रिय' होते.
'ब्रह्मसिद्धी' च्या प्राप्तीसाठी, मान्यतेसाठी क्षत्रिय नृपांकडे एक 'क्षत्रिय-साधक -ब्रह्मसिद्धि- साधक' असा 'मयूरवर्मन्' कदंब हा क्षत्रिय राजवंशी आला आहे. याचाच अर्थ असा की, त्याकाळी आणि सर्वच प्राचीन व मध्ययुगीन काळी वर्णाश्रमधर्म-व्यवस्था ही पूर्णांशाने क्षत्रिय राजांच्याच अधिकारातील बाब होती.
कदंब-कुल हे क्षत्रिय राजकुल होते, ते 'पल्लव', गंग, वाकाटक, चुटुकुल, सातवाहन, चालुक्य, मौर्य इ. क्षत्रिय राजकुलांशी विवाहसंबंधांच्या नात्याच्या जवळिकतेचे होते. तशात जर हा मयूरवर्मन् क्षत्रिय व राजकुलीन असूनही राजधर्माचे-क्षत्रियधर्माचे प्रजापालनाचे प्रमुख व श्रेष्ठ कर्तव्य पार पाडण्यासाठी योद्ध्याच्या शस्त्रास्त्रांनी सज्ज राहण्याऐवजी 'ब्रह्मसिद्धि-प्रीत्यर्थ' राजमान्यतेच्या पाठीमागे धावत असेल तर कठोर व न्यायी राजकर्तव्य म्हणून व अधिकारी याही नात्यानेही पल्लव राजांनी त्याची (मयूरवर्मन् कदंब याची) 'कान-उघाडणी' खरमरीतपणे केली असेल, अश्वसंस्थेद्वारा त्याचा पाणउतारा केला असेल व मयूरवर्मन् यास तो स्वतःचा अपमान वाटून खंत करण्याची पाळी त्याच्यावर ओढवली असेल, तर या पेक्षा वेगळे असे त्याच्या वाट्याला काय येणार होते ? आणि यावे तरी का ? म्हणूनच तो तिथे म्हणतोय-

९. "ब्रह्मसिद्धिर्य्यदि नृपाधीना, किमतऽपरं दुःखमित्यत ॥" (गुरु-कुलांची योग्य प्रकारे, प्रयत्नपूर्वक आराधना करून, प्रयत्नपूर्वक स्वतःच्या वेदशाखांचे अध्ययन करून देखील ) जर ब्रह्मसिद्धी अंतिमत : सर्वस्वी क्षत्रियांवर-क्षत्रियनृपतींवर अर्थात त्यांच्या अधिकारांतर्गत;राजमर्जी-न्यायनिर्णयांवर, राजदंडस्वाधीनशी अवलंबून राहणार असेल, तर त्यापेक्षा जास्त दुःख काय असणार? अरेरे ! 'क्षत्रात् परिपेलवा विप्रता !' असावी ना? ( परिपेलवा = नाजूक, नरम, अक्षम ).

१०. असा तो मयूरवर्मन् की जो क्षत्रिय राजकुलीन होता, 'ब्राह्मण' असल्याचा कसलाही उल्लेख नसणारा तो, ब्रह्मसिद्धीप्रीत्यर्थ गोळा केलेली साधने ( चमस, कुश इ .) फेकून देतो व हाती क्षत्रियाची लखलखती आयुधे धारण करतो; याचा अर्थ काय होतो ? ती शस्त्रे धारण करण्याचे प्रशिक्षण त्याने आपल्या पूर्ववयात जरूर प्राप्त केलेले असणार ! न पेक्षा तो काही जादुगाराचा बच्चा किंवा चेला नव्हता, की हाती धनुष्यखड्ग येताच 'योद्धा' बनून, शतकांधीश पल्लवांना नमवून, स्वत:चे, स्व-वंशाचे स्वतंत्र राज-कुल , राज्य प्रस्थापित करण्यास तो समर्थ व्हावा !

११. '**पल्लवेंद्रा यस्य शक्तिमिमां लब्ध्वा प्रतापान्वयावपि ।**' येथे प्रताप, तोच 'क्षत्रिय' व 'अन्वय' =वंश हा अन्योन्यसंबंध संशोधकांनी दुर्लक्षिण्याचे कारण दिसत नाही.

१२. 'पट्टबंध विधी' ने, राज्याभिषेकाने सेनानायकत्व लाभल्यानंतर षडाननाशी (=कार्तिकेयाशी, देवांच्या महासेनापतीशी ) सख्यत्व व समानता, तुल्यबल प्राप्त झालेला मयूरवर्मन् कदंब,मातृगणाद्वारा ( सरिताशीर्वचन-पुण्यजलराशींच्या सिंचनाने) अभिषिक्त झाल्याचेही येथे स्पष्टपणे नमूद आहे. (२२)

१३. 'प्रांशु'= प्र+अंशु । आहेत अंशु प्रखर (अंशु=किरण) असा जो तो, अर्थात 'सूर्य !' असा तो कंगवर्मन् (अर्थात मयूरवर्मनूचा पुत्र); सूर्यवंशत्वाची निर्विवाद नोंद.

१४. **''तत्सुत:कदंबभूमिवधूरुचितैकनाथो भगीरथ: ।**
**सगर-मुख्यस्स्वयं कदंबकुल-प्रच्छन्न-जन्मा-जनाधिप: ।।** (२४).
**अथ नृप-महितस्य तस्य पुत्र:**
**प्रथित-यशा रघु-पार्थिव: पृथु-श्री:।।**
**पृथुरिव पृथिवीम्प्रसह्य योऽरीन् ।**
**अकृत पराक्रमतस्स्ववंश-भोज्याम् ।।''** (२५).

=" कदंब भूमिरूपी ललनेचा प्रियकर असा त्या राजाचा एक पुत्र होता. त्याचे नांव '**भगीरथ**' होते. तो स्वत: '**सगरकुला**' तील एक प्रमुख वंशज होता, ज्याने राजा म्हणून कदंब-वंशात गुप्त रीतीने जन्म घेतलेला होता-'' (२४)

-''तोच पराक्रम 'रघु;' 'पृथु' या सूर्यवंशीय क्षत्रिय राजांचा, इतिहासात नमूद आहे, व त्यांचेच वंशज 'कदंब राजवंशीय' नृपती शोभायमान आहेत.''

- येथेही 'कदंब हे 'ब्राह्मणच होते ! असेच म्हणणार काय ? उपरोक्त सर्व 'नृपती'ब्राह्मण वर्णीय होते काय ? की हे केवळ 'काव्य' च मानावयाचे? हे सर्व क्षत्रिय-सूर्यवंशीय राजेच पुन्हा'कदंब' कुलात 'क्षत्रिय' म्हणून जन्मास आले होते; हेच स्वीकारार्ह नव्हे काय ?

१५. "गुप्तादि-पार्थिव-कुलांबुरुह-स्थलानि
स्नेहादर-प्रणय-संभ्रम-केसराणि ।
श्रीमंत्यनेक-नृपषट्पद-सेवितानि
यो ऽ बोधय दुहितृ-दीधितिभिर्नृपार्कः ॥" (३१).

- "त्या **'सूर्य'** (=**अर्क**, सूर्यवंशीय क्षत्रिय)
रूपी राजाने आपल्या कन्यारूपी **किरणांच्यां द्वारें 'गुप्त'**-
इत्यादी राजकुलांचे-राजकुलरूपी **कमळांचे** ताटवे
(=कमलपुष्पांची स्थळे, कमलपुष्पपुष्करिणी) प्रफुल्लित केले, प्रेम, आदर, अनुराग, सन्मान, हे त्या कमळांचे पराग होते, त्या कमळांवर अनेक नृपरूपी भ्रमर गुंजारव करीत असत," (३१).

-येथे **'कमळ'** हे **'सूर्याचे प्रतीक'** आहे, आणि तरीही, "सूर्याचा उल्लेख राजाच्या **'सूर्यवंशत्वा'** विषयी नसून हे केवळ काव्यच आहे, हा इतिहास नव्हे," अशीच बोळवण करण्यास धजू शकेल अशी अपवादात्मक तरी व्यक्ति-प्रवृत्ती कल्पनेनेही गृहीत तरी धरणे शक्य होईल काय?

१६. -"**विविध नियम होम-दीक्षा-परैर्ब्राह्मणैः
स्नातकैः स्तूयमाने सदा मंत्रःवादैश्शुभैः ॥'** (३३).

-"निरनिराळे नियम, होम, यांच्या दीक्षा घेण्यात गर्क असलेले ब्राह्मण, तसेच स्नातक हे तेथे नेहमीच शुभकारक अशा मंत्रांनी त्या शिवाची स्तुती करीत असत." (३३).

येथे वापरलेला **'ब्राह्मण'** हा शब्द येथेच अत्यंत महत्त्वाचा आहे; कदंब-राजवंशाच्या 'वर्णा विषयी तो निर्णायक आहे.

**'कदंब'**-नृपांना **'ब्राह्मण'**, **'द्विज'**, **'विप्र'**, **'गुरू'** हे शब्द अपरिचित नव्हते, ते त्यांना अर्थच्छटांसह पूर्णतः ज्ञात होते ! असे असूनही या आधी **'द्विज-कुल'** (श्लो.४), **'द्विजोत्तम'** (श्लो.९) ऐवजी (?) स्वतःसाठी, मूल **'वर्ण'** सूचक शब्द **'ब्राह्मण-कुल'**, **'ब्राह्मणोत्तम'** असे म्हटलेले नाही, याचे कारण ते **'ब्राह्मण'** नव्हतेच! (कुल-वंश-वर्णनि !) **क्षात्रत्वाधारें** मात्र ते **'यज्ञदीक्षित'** म्हणून मात्र निश्चितच **'ब्राह्मण'** होते ! (तै. सं., तै.ब्रा.).

**'द्विज'** हा शब्द 'वर्ण-वाचक' नव्हे, **'वर्ण'** ही नव्हे. तो शब्द विशिष्ट (तिन्ही) वर्णांचा **'तपशील'** देतो. मात्र **'ब्राह्मण'** -हा शब्द 'वर्ण-वाचक' असणे असंभव आहे, श्लो. ३३ मध्ये तो 'वर्ण-वाचक'च आहे ; अर्थातच 'ब्राह्मण' शब्दाचा पर्यायी असा शब्द **'द्विज'** हा शब्द नव्हे, **'द्विज'** शब्द तिन्ही वर्णांचे परिणत वैशिष्ट्यच प्रदर्शित करणारा आहे; आणि हेच मूलतः संशोधकांनी ध्यानी घेण्याचे टाळलेले आहे.

अर्थात कदंब-राजवंशीय नृपतींनी आपल्या १,५०० वर्षांच्या वंशेतिहासात कुठेही, कोणत्याही अभिलेखात, स्वतःच्याच 'तालगुंड' -अभिलेखातही स्व-वर्णाचा

उल्लेख 'ब्राह्मण' या शब्दांत एकदाही-अपवादानेही- अनवधानानेही केलेला नाही, हे सूर्यप्रकाशाइतके स्पष्ट व सत्य आहे.

कर्नाटकातील शिकारपुर तालुक्यातील मळवल्ली ग्रामातील 'कल्लेश्वर' मंदिरातील **'सातकर्णी'** मळपळी -शिला-अभिलेखातील उल्लेख, कदंबांचा सातकर्णीशी असलेला उत्तराधिकारत्वाचा व वर्ण-वंश-कुलाचा अन्योन्यान्वयी संबंध दर्शवितात. [**द्रष्टव्य: ''सिद्धम्। जयति भगवान मळपळिदेवो। वैजयंतीपुरराजा मानव्यसगोत्रो हारितीपुत्तो विण्हुकुडचुटु कुलानंद सातकणि आणपयति महावलभ रजुकं...।।''**]

**१७. -''तस्य औरसस्य विशाल-कीर्त्तेः ।**
**पट्टत्रयार्पण-विराजित-चारुमूर्त्तेः ।।'' (३४).**

- येथील **'औरस'**-हा शब्दही अत्यंत मौलिक, महनीय आहे, स्वतःची पत्नी-तीही रीतसर धर्मनीतिरिवाज-शिष्टसंमत विवाह झालेली, तीही स्वतःच्या वर्णाची (पति-पत्नी **आधीच्या सात पिढ्या एकाच वर्णाचे**, एकाच जातीचे, समान कुलशीलाचे) ! अशी जी धर्मपत्नी; तिच्या ठायी स्वतःपासून जन्मलेला जो स्वतःचा पुत्र, तो **'औरस' पुत्र होय !** यात 'वर्ण-संकरत्वा'चा 'वास'येतो काय ?

१८. त्यामुळेच तर, कदंब-राजवंशांबद्दल त्यांचे स्वयंसिद्ध व सर्व क्षत्रियराजकुल-सन्मान्य क्षत्रियत्व नाकारून त्यांच्याबद्दल अनेकांनी अनेक मते मांडली.:-

१) एक म्हणे, ''मयूर या ब्राह्मणाने कोण्यातरी क्षत्रिय (Royal) राजकन्येशी लग्न केले 'असावे,' त्यामुळे मयूरासह पुढील सर्व राजवंश 'ब्राह्मण' न राहता 'क्षत्रिय' बनला,'' :(बुह्ल्लर).

२) दुसरा म्हणे, '' कदंब आधी ब्राह्मण होते, व नंतर ते क्षत्रिय झाले,'' :(हरेकृष्ण मेहताब-ओरिसा इति.)

३) तिसरा म्हणे, '' कदंब हे जन्माने ब्राह्मण होते, व व्यवसायाने क्षत्रिय होते, '' :(डी. सी. सरकार).

४) कुणी एक म्हणे, ''गंग, सेन यांच्यां प्रमाणेच कदंब हे **ब्रह्म-क्षत्र** होते. आधी (जन्माने) **ब्राह्मण**, नंतर (व्यवसायाने? वर्णसंकराने?) **क्षत्रिय** बनले,''

- कल्प-तर्कांना ना अपंगत्व, ना भीडमुर्वत !!

१९. **'नमो भगवते स्थानकुंदूर-वासिने महादेवाय ।-'**

येथील शब्द 'स्थान' हा 'स्थान'नसून तो 'स्थाणु','स्थानु' असा आहे. त्याचा अर्थ 'शिव'='सूर्य' असाच आहे; अर्थात 'सूर्य'-स्थल ते 'स्थाणु कुंदूर !' शिव व सूर्य यांत अभिन्नता मानलेली आहे. कदंबांच्या सूर्योपासनेचा हा निर्देश, महत्त्वपूर्ण प्रमाण असून त्यांच्या स्व-वंशाचे मूळपीठ-द्योतक, 'सूर्यवंशत्व' आहे. हे समजून घेणे अडचणीचे वाटू नये.

**'कलिंग'**; (ओरिसा) मध्ये गंग-नृपतिवंश व कदंब-नृपति-वंश समांतर

राजवैभव उपभोगीत होते. तेथील कोणार्कचे 'सूर्यमंदिर' कदंबांशी व गंग-वंशाविषयी आपले नाते स्पष्ट करते.

२०. **'कदंब-गाथा'** हे काव्य उडिया भाषा व उडिया लिपीत स. १९०१ मधील (कर्ता; गोपीनाथ मिश्र ) असून त्यात कदंब वंशाचा इतिहास दिला आहे. त्यात **'कदंब-नृपती'** हे **'क्षत्रिय'** च होते व ते **'सिंहलेश्वर'**, **'सिंहलाधीश'**, **'सिंहलेश'** होते, असेही म्हटले आहे. :(भुवनेश्वर संग्रहालय; हस्तलिखित; अप्रकाशित).

२१. एका तेलुगू हस्तलिखिततही क्षत्रिय कदंब राजवंशाचे वर्णन आहे. (कदंबकुल-मोरेस-१९३१). (ओरिएंटल लायब्ररी, मद्रास, ईस्ट इंडिया कंपनीकालीन ओरिसातील कदंब-जमीनदार).

**५) काही अभिलेखीय उल्लेख :**

१. 'कदंब' हे **'अंगिरस'** गोत्राशी संबंधित होते.(जसे सातवाहनही ! )

अ) **''स्वस्ति विजयवैजयन्त्यां स्वामि महासेन मातृगणानुद्ध्याताभिषिक्तानां मानव्य सगोत्राणां हारितीपुत्राणां अंगिरसां प्रतिकृतस्वाध्याचर्च्चकानां सद्धर्म्मसदम्बानां कदंबानां ॥''** (जै.शि.सं.भा.२, पृ.६७) : (देवगिरी-लेखः जि. धारवाड, इं.ए.७. पृ.३५.३७.नं.३६).

आ) बनवासी-अभिलेखः मृगेशवर्मन् कदंबःइंडि.ॲन्टि.७; पृ. ३५.३६)

इ) Succ.Satavahanas: D. C.Sircar, (पृ.२२२)

ई) :**'सातवाहन'** हे क्षत्रिय कुलही **'आंगिरसान्वयी'** होते.: (सातवाहन शिलालेख; मिराशी).

२. 'मनू' चे पुत्र 'मानव्यगोत्री' होत-क्षत्रिय होत. स्वायंभुव मनूचा पुत्र होता 'मानव्य'; 'मानव्याचा' पुत्र होता, **'हरित'** आणि या 'हरिता'चा पुत्र : 'पंचशिखीहारिती !'- :(चालुक्य अभिलेख).

:(Succ. Of Satav.: D. C.Sircar, पृ.२२२)

३. 'अंगिरस', 'हारिती' हे 'मनू' -'इक्ष्वाकू' यांचे पूर्वज होते. - (मुंबई गॅझे.१ (२), पृ. २१७)

४. उपरोक्त क्र १हा अभिलेख-

''सद्धर्मसदंबाणां कदंबाणां अनेक जन्मान्तरोपार्जित विपुलपुण्यस्कंधः आहवार्जित परमरुचिर दृढसत्त्वः विशुद्धान्वयप्रकृत्यानेकपुरुषपरंपरागते जगत्प्रदीपभूते महत्येदितोदिते काकुस्थान्वये श्रीशांतिवर्मतनयः श्रीमृगेशवर्माआत्मनः राज्यस्य तृतीय वर्षे.... ।'' (जै.शि.सं.२ पृ.६७). - असे 'कदंब'-वर्णन देतो.

-हा कदंब राजा मृगेशवर्मा सद्धर्मानुचारी आहे. (सत्+अंब) पुण्यशील-सच्छील मातांचा सुपुत्र आहे, ' अनेक जन्मान्तरोपार्जित विपुलपुण्य' अर्थात तो 'पुनर्जन्मा'वर श्रद्धा असणाराही आहे. तो 'विशुद्ध' (=१. वंश, २. परंपरा)= 'सूर्यवंशीय' आहे.

५. "**श्रीमत्कदंबकुलगगन-गभस्तिमालिनः**
**कृष्णवर्म्म-महाधिराजस्य प्रिय भागिनेयो.... ॥"**

- "हा कदंबकुलरूपी गगनीं शोभायमान असा '**सूर्य**' (क्षत्रिय सूर्यवंशी कदंब-नृपती); गंगनृपती अविनीत महाराजाधिराज कृष्णवर्मन् याच्या '**भगिनीचा पुत्र**' (=भागिनेय) होता."

(१) (मर्करा-लेखः= (सं.), (स.-४६६); अविनीत कोंगणी-गंग-नृप.

(२) (मण्णे-लेखः (सं.), (स.-७९७), मारसिंह-गंग-नृप-लेख.

(३) (देवरहळ्ळी-लेखः (सं./क.), (स.-७७६), पृथिवी निर्गुंदराज गंग-नृप यांचा लेख-(जैशिसं. भा-२, पृ. ६३, ११५, १०९).

६. "**विबुध प्रतिबिंबानां कदंबानां धर्ममहाराजस्य श्रीविजयशिव मृगेश-वर्म्मण.... ।**
**सु-विशुद्धपितृमातृवंशः....।**
आदिकालराजवृत्तानुसारी धर्ममहाराजः कदंबानां
**श्रीविजयशिव मृगेशवर्मा कालवंगग्रामंत्रिथा विभाज्य दत्तवान् ॥"**

-(विबुध=चंद्र; "सुविशुद्धपितृमातृवंश" = पिता व माता यांचे हे दोन्ही वंश विशुद्ध आहेत.'अनैतिक' वा 'वर्णसंकरितही' नव्हेत. **आदिकालराज**=मनू, पृथू, सगर इ.):(सर्वांत पहिला अभिषिक्त राजा-'पृथू') -(देवगिरी-लेख (सं.) श्रीविजयशिवमृगेशवर्माकदंब-दानपत्र- इं. ए.७; पृ.३७-३८;नं.३७;
:(जै.शि.सं.-२ पृ. ६९-७२)-( वैदिक कोश, सूर्यकांत ).

-'पृथू'शी कदंबांचे वर्ण-वांशिक नाते आहे ! 'पृथू' हा क्षत्रिय सूर्यवंशीय सर्वप्रथमनृपती.

७. "**आदिकालराजर्षिबिंबानां** आश्रितजनाम्बानां कदंबानां ।
**धर्ममहाराजस्य** अश्वमेधयाजिनः समरार्जितविपुलैश्वर्यस्य..
**शरदमलनभस्युदित शशिसदृशैकातपत्रस्य धर्ममहाराजस्य**
श्रीकृष्ण वर्मणः प्रियतनयो देववर्म्म युवराजः ॥"

-येथे श्रीकृष्णवर्मन् कदंब हा **आदिकालराजर्षि**- "**मनू-'पृथू'-सगर" यांचा वंशज** व अश्वमेधयज्ञकर्ता आहे. (हे सर्व राजे अर्थात **क्षत्रिय** व **सूर्यवंश-बिंबे** होते.) तो शरद -ऋतूतील निर्मल आकाशातील उदित असा धवल '**चंद्रमा**' असून, त्यांच्याप्रमाणेच '**एकछत्रधारक**' व '**एक-छत्रपृथ्वीचा राजा**' आहे. (**आदिकालराजा** = सर्वांत पहिला अभिषिक्त राजा=वैनपुत्र-'पृथू'). -(देवगिरी-लेख-(सं.) - श्रीकृष्णवर्मन् कदंबाचा पुत्र देववर्मन्.इं. ए-७; नं. ३५,पृ.३३-३५), - (वैदिककोश-सूर्यकांत), (जैशिसं-२, पृ. ८३).

८. "**राजा राजारि-लोकास्थिर-तिमिर-घटा-पाटने शुद्ध-वृत्तः॥"**

(शुद्ध+वृत्त= १. निर्मल आचरण असणारा, २. सूर्यवंशीय.)-(मन्ने-लेख (सं.), (-८०२) : मान्यपूर राष्ट्रकूट-नृप.NC-१ नेलमंगल tl-ri ६१), (जैशिसं-२, पृ. ११५).

९. "गंगासागर यमुनासंगमदोळ् वारणासि गयेयेम्बी तीर्थंगळोळो (तु) कुलद्विजपुंगव गोकुळमनळि दरिन्ति दनळिदऱू ॥ वीरपेर्मांडिदेवस्य जिनालयं ॥"
: (या लेखात चालुक्य-सूर्यवंशी क्षत्रियराजा-श्रीवीरपेर्मांडि देवाच्या द्वारा शके १०१९ मधील १२ निवर्तने भूदान उल्लेख.-[JB-९, पृ-१७०-१७१ व पृ-१९४-१९८, १९९,] कुल **'द्विजपुंगव' = क्षत्रियपुंगव = सर्वश्रेष्ठ वेदविद्याविद क्षत्रिय कुलातील नृपोत्तम.**

१०. "**कादंब-कुल-कमल-मार्तंडनेनिसिद** कीर्त्तिदेवनवंश-**वीर्य-प्रभाव**-मेन्तेदंडे ।"
-**'कादंबकुळकमळमार्त्तंड':** अर्थात कदंबवंशातील **कमल**पुष्पांना प्रफुल्लित करणारा मार्तंड (=सूर्य)! -यावरून कदंबकुलाच्या सूर्यवंशत्वाचा स्पष्ट बोध होतो; तसेच **"वंश-वीर्य्य-प्रभावमेंतेदंडे** ॥" यावरून (वीर्य=क्षत्रिय) त्या वंशाच्या **'क्षत्रियत्वा'**चा बोध स्पष्ट आहे. (कादंब=कदंबवंशीय ते 'कादंब' !) :(जै.शि.सं-२ पृ.२६६-२७१)-(कुप्पुटूरू-लेख (कन्नड), इ. १०७५. कीर्तिदेव कदंब-नृप-लेख-E-C-C, पृ.२६२).
**-याच लेखात:** १.'भरतावनि' (=भरतवर्ष-देश),
२. 'कुंतळव्' (=कुंतलदेश), 'कुंतळ-भूतळके',
३. 'बनवासिदेश' (=बनवासी-वैजयंतीदेश),
'वनवासियागि' - इ. उल्लेख महत्त्वाचे आहेत.
४. मूळ पुरुष 'मयूरवर्मन्' हा सांगितला आहे, **'शर्मन्'** नव्हे !
५. त्यास 'इंद्रोत्तम' म्हटले आहे, ते **'क्षत्रियत्व'** द्योतक आहे. त्याला शासनदेवीप्रसादाने राज्य मिळाले. मोरपंखांचा पट्ट त्याच्या डोक्यावर ठेवल्याने तो **'मयूरवर्मन्'** झाला - तो 'त्रिलोचन' होता; तो कुलवंद्यपुरुष होता.
या 'कादंब'-शब्दावरही संभ्रमित होऊन डॉ. श्री. व्यं.केतकर म्हणतात, 'कादंबः हे कदंबांचे 'औरसपुत्र नसावेत!' ईश्वरेच्छा बलीयसी !!

११. "**श्रीमत्कदंबावरतिग्मरश्मेशिरसरोजं खलु शांतरस्य पूजां।**
**प्रचके स च चक्रवर्ति श्रीविक्रमादित्यनृपेंद्रपादे ।।"**
- "(शिलाहार भोज-प्रथम-याने **कदंबवंशरूपी अंबरातील** (गगनातील) प्रखर - तीव्र किरणयुक्त =(प्रतापी) **'सूर्य'**च असा जो **'शान्तर' (कदंब-नृप)** त्याच्या शिर**कमलाने (कमल** =सूर्यप्रतीक) चालुक्य चक्रवर्ती विक्रमादित्य याच्या चरणांची (=पायांची) पूजा केली.)" येथे **शांतर कदंबाचा 'सूर्यवंश'** दोन प्रकारे सूचित आहे!

१२. ''ततः प्रववृते वंशः शुद्धः सितांशुनिर्मलः ।
अम्लान कमलोल्लासो महेश्वरकृतस्थितिः ॥ ७ ॥
कदंबपदविख्यातो राजहंसोपशोभितः ।
अभंग इव गंगायाः प्रवाहो हिमवद्गिरे : ॥ ८ ॥''

-''त्यापासून 'सूर्यवंशा'त (शुद्ध= सूर्य) शुभ्रधवल-निर्मल किरणांनी (=सितांशु) युक्त असा, अम्लान (=न कोमेजणाऱ्या) प्रफुल्ल विकसित कमलपुष्पांनीयुक्त असा (कमल=सूर्याचे प्रतीक, सूर्यवंशाचे प्रतीक, देवकचिन्ह-पुष्पे=कदंबवंशीय नृपती),शंकराच्या पद-कमलीं रत असलेला (शंकर-शिव-हाही 'सूर्य'रूप आहे.) कादंब (कदंबवंशीय संतती तो 'कादंब' अशा उपनांवाने प्रसिद्धी पावलेला, नृप-रूपी हंसांनी सुशोभित (हंस=सूर्य, विष्णू), 'हंस'-अवतार हा श्रीविष्णूचा (विष्णू हाही 'सूर्य'रूप आहे!) सर्वांत पहिला अवतार; पण पुढे याचे उल्लेख वगळण्यात आले व अंतिम स्थानी 'बुद्ध' संमीलित झाला); हिमालयापासून निघालेल्या गंगानदीच्या प्रवाहाप्रमाणे अखंड असा कदंब-वंश चालू झाला.'' (कादंब=कलहंस, goose) - (असोगे -ताम्रपट, स.-११३३) संस्कृत, कदंब-नृपती; गोवे. जयकेशी -द्वितीय; द. म. इ. सा. खं. १, पृ. २६-३२; JBBRAS १. पृ. २७९, २४२, २६६).

१३. ''प्रख्यातस्य कदंबवंशतिलकस्योर्ध्वीपतेरात्मजा वीराणां प्रथमस्य पल्लव महाराजस्य तेजस्विनः ।
आख्यामग्गळनिम्मटीति दधतो शुद्धान्ववा-योचिताभत्तुस्तस्य भुवो ॥''

- येथे 'शुद्ध' + अन्वय =सूर्य+वंश, हा स्पष्ट उल्लेख मयूरवर्मन् कदंबवंशासंबंधी निर्देशित आहे. (पल्लव-अभिलेख = पृ - ३७४ - ७५, टी. व्ही. महालिंगम, १९८८ ).

१४. ''पल्लव राजे - 'क्षात्रतपोनिधी' होते.'' (विष्णुगोपवर्मनपल्लव) -(पल्लव - लेख=पृ. ४५, नं. ६, (इस. ४४७); महालिंगम); अशा क्षत्रिय - पल्लव राजवंशाशी क्षत्रिय-सूर्यवंशी कदंब राजवंशाचे विवाहसंबंध होते.

१५ **पल्लव-नृपती** : १. श्रीक्षत्रचूलामणि, २. श्रीक्षत्रचूळामणि, ३. श्रीक्षत्रविद्रावण, ४. क्षत्रियचूळामणि, ५. क्षत्रियसिंह, ६. 'राजसिंह' पल्लवेश्वर, ७. पल्लवादित्य, ८. एकसुंदर, ९. राजसिंहेश्वर, १०. रणजय - होते.

(क्ष.अ. बिर्जे: पृ. ३३०)

१६. ''आसीत्प्रशस्तगुणशालिनि सूर्यवंशे राजा बभूव बहुधर्मयुतः प्रशस्तः ।
( कर्कराजः राष्ट्रकूटः ।)'' ॥ २ ॥

- येथे कर्कराज 'राष्ट्रकूट' राजा 'सूर्यवंशी' होता, हे नमूद आहे. या राजवंशाचे कदंबराजवंशाशी विवाहसंबंध होते; हे लक्षणीय आहे. - (खाकुरडी - जि. नाशिक). - ताम्रपट, स-१०५६, दंतिदुर्ग राष्ट्रकूट नृप. द.म. द. सा. खं. ४, पृ. २० ते २७).

१७.''स्वस्ति होयसलवंशाय यदुमूलाय यद्भवः ।
क्षत्र-मौक्तिकसन्तानर् पृथ्वीनायक-मंडनं ॥ ३ ॥......।

**तनूभवः 'क्षत्रकुलप्रदीपः' प्रतापतुंगोन्वेरेयंगभूपः ॥०७ ॥.**
**नरसिंहवर्म्म -भूभुज-सहस्रभुज-भूजपरशुरामोऽपि ।**
**चित्रं विष्णुनृपालश्शतकृत्योऽप्याजिनिहित-शत्रु-क्षत्रः ॥ २१ ॥''**

- येथे **होयसळ-नृपतींच्या 'क्षत्रियत्वाची'** प्रमाणे नमूद आहेत. १. क्षत्रमौक्तिक, २. क्षत्रकुलप्रदीप, ३. पृथ्वीनायक-(भंडारिबस्ती- लेख : होयसळवंश, स. ११५९, नारसिंहदेव), (जैशिसं. १; पृ. २७८-२८६). क्षत्रिय **यदुवंशी होयसळ व कर्दब** यांचे **विवाहसंबंध** झालेले आहेत.

१८. **''कदंबमूले जातः ..... त्रिलोचन कदंबः इति प्रवीरः ॥ २ ॥ तस्मादयं 'रवि-सितांशु - कुल-प्रसूत' भूमीश्वरोर्जित विलोपन विक्रमाणां ।वंशो विशुद्धगुणबोध - धराधिपानामाप्त : परामुदयिनीय कदंब संज्ञाम् ॥''**

-(द. म. इ. सा. खं. ४, पृ. ३५) - (पणजीः (गोवे) ताम्रपट, (सं), इ.स. १०५९); कदंब जयकेशी -प्रथमः (कदंबकुलः मोरेस).

-कदंबांचे **सूर्यवंश-कुल;** धवलकिरणयशोकीर्तिमंडित आहे.

तो वंश विशुद्धगुणसंपन्नताबोधकही आहे; प्रवीरः = श्रेष्ठ क्षत्रिय, (**रवि**=सूर्य, **सित**=धवल, शुभ्र, सतेज; अंशु=किरण; **विशुद्ध**=१. सूर्य, २. निर्मळ, निष्कलंक).

-तर अशा प्रकारें, उपरोक्त क्र. १ ते १८ मधील विवेचनांतील 'कदंब' राजकुलाचा 'वंश-वर्ण' 'समजून' घेण्यासाठी काहीशी 'तरलता' व 'काव्य-प्रतिभेची झेप' खर्ची घालावी लागणार, हे नक्कीच ! कारण हे 'कदंब-नृपती' स्वतःविषयी उघडउघड ''आर्य-भारतीय-क्षत्रिय-सूर्यवंश वा चंद्रवंश-ध्रुवीय-उत्तर वा दक्षिण भारतीय'' असे तपशील नमूद करत नाहीतसे भासते ! कारण हे 'लेख' त्यांनी, **''विदेशी संशोधकांच्या अभ्यास-विश्लेषणाप्रीत्यर्थ कोरलेले नव्हते!''** ही दानपत्रे या भूमीतील '**ब्राह्मणां**'साठी दिलेली आहेत, व ती कोरणारे कोरकेही त्यांचेच प्रजानन होते. दान स्वीकारणारे व प्रजानन राज-वर्णाविषयी पूर्ण ज्ञात असणे निश्चितीचे होते. तेव्हा प्रारंभिक प्राचीन काळात 'राजा' ने आपला वर्ण व्यक्त न करण्याचा किंवा डांगोरा पिटून जाहीर करीत राहण्याचा मोह वा निकड त्यांना असणे संभवत नाही. तरीही हे 'लेख' फार 'कुशलतेने', 'सूचक अर्थगर्भ' तेने' व 'आशय व्यक्त करणारे' नक्कीच आहेत. राजकुलप्रणीत प्रारंभी तरी तशी ती कुलशीलनीतिसंपन्न रीति मानावी !

● **येथे आणखी दोन ''प्रमाणे'' कदंब-राजकुलाच्या क्षत्रियत्वाविषयीची** पाहावयाची आहेत. (प्रसिद्धी : इ. स. १९८५ ) :-

: **'कदंबां'ची ही क्षत्रियत्व-निर्णायक दोन्ही 'प्रमाणे'** त्यांच्याच स्वतःच्याच दोन स्वतंत्र अभिलेखांतील आहेत. दोन्ही लेख प्राचीन-प्रारंभिक काळांतील आहेत; ती 'प्रमाणे' नंतरची, उत्तरकालीन नव्हेत, किंवा इतरांचे अनुकरण करण्यासाठी, एक **'क्रेझ'** (Craze) ही नव्हेत ! मोराएस इ. बरेच 'संशोधक' (!) असेच समजत राहिले आहेत, की ''दक्षिण भारतीय राजवंशांनी आपले पूर्वापार क्षत्रियत्वाचे कुल-

वंश-वर्ण-संबंध, मूळस्थान (Origin) उत्तर भारतीय राजवंशांशी व उत्तर भारतीय भौगोलिक स्थानांशी जोडणे, ही एक 'Craze' आहे ! (कदंबकुल : मोराएस,) असो ! ती प्रमाणे अशी :-

१९. **प्रमाण - १ ले** : (कदंब हे सूर्यवंशी क्षत्रिय.): - "अथ बभूव हारितीपुत्रो मानव्यसगोत्रोद्भवो **द्विज** : वीरशर्म्मेति वेद:कुलमति:....सास। वेश्माकरोत **द्विजोत्तम:** कुलमाभूत-कदंब-नामा **ततस्तस्यार्क्क-बिंब-द्युतिक्षितौ ॥ योऽथ वीरशर्म्मणो** ज्येष्ठ: श्रीबंधुषेण: प्रिय: आत्मज: । स हि बभूव क्षात्रवृत्ति-लता-मूल-गुणांबु-प्रसेचित: तद् सुतो मयूरवर्म्मेति-वेदांग-विद्या-विशारद-:नृपतिर् आस **विक्रमैकरस:** -शुभ-लक्षणलक्ष्य-विग्रह: ॥"

-(कदंब-अभिलेख संग्रह : बी.आर. गोपाल : स. १९८५).

आता याविषयी संपादक डॉ. बी. आर. गोपाल जे काही म्हणतात, ते असे आहे : -                                                                 :(पृ. xxii)

"The argument that only the successors of Mayurasharma (मयूरशर्मा) have the name-ending ' Varma ' (वर्मा) indicating their conversion as ' kshatriyas' (क्षत्रियांत रूपान्तर) will not hold good any more. That Chandravalli inscription also refers to him as 'Mayurasharma' (मयूर शर्मा) is not more correct, since the name there in is clearly 'Varma' (वर्मा) and not' Sharma' (शर्मा)!"

-"मूयरवर्मा (कदंब) याचे सर्व वंशज 'वर्मा'-नामान्त आहेत. एवढेच नव्हे तर, तो स्वत:ही 'शर्मा'न्त नाही, 'वर्मा'न्त आहे. अर्थात हे 'क्षत्रिय-बोधक' आहे."

: (याबाबतचे तसेच वाचन डॉ. रमेश यांनी डॉ. बी. आर. गोपाल यांना दाखविले. त्याप्रमाणे वरील निर्णय बरोबर आहेत, सुस्पष्ट आहेत, असे डॉ. बी. आर. गोपाल आपल्या टीपेत म्हणतात.)

"the Gudnapura inscription also does not associate Mayura's father with any such name-ending." (मयूराचा पिताही 'शर्मा-'वर्मा' काहीच नसून, तो आहे 'बंधुषेण!')

"indeed, it clearly speaks of the Kshatraqualities (=वृत्ति:=qualities, =वंश,वर्ण) of Bandhushena.(यावरून' बंधुषेण'-मूरवर्माचा पिता हा 'क्षात्रवृत्ती'अर्थात 'क्षत्रिय' होता.)

वस्तुत: सदर लेखात, 'बंधुषेण हा क्षात्रवृत्ती होता'असा अर्थच नाही. अर्थ आहे, "तो-बंधुषेण क्षात्रवृत्ती मूळातच असलेल्या वंश-लतेच्या मुळांना गुणरूपी जलाचे सिंचन करणारा बनला, शोभला !"

'वीरवर्मन',('शर्मा'-नव्हे !) हा मयूरवर्मन्‌चा पितामह व 'गुरु' होता. त्याचा एक - दोन पिढ्यांपूर्वीचा पूर्वज 'शिवस्कंदवर्मन'होता.

या लेखाच्या प्रारंभीच वंदनात **'मन्मथ'** आला आहे- ''जयति सुर-वधूनां **मन्मथः** कामिनीनां..... ।'' -''(स्वर्ग-अंगनांचा, देवांच्या स्त्रियांचा प्रिय **'मदन'**, त्याचा जय असो !)''

: विष्णूच्या करांगुलीपासून **'कंदर्प' (मदन)** याची निर्मिती झाली; व **कंदर्पापासून कदंब'** (वृक्षाची) निर्मिती झाली; (व या कदंब-वृक्षापासून कदंब-नामक क्षत्रियराजकुलाची निर्मिती झाली,) असे 'वामण पुराणा'त म्हटले आहे. येथे कुठे 'ब्राह्मण'त्वाचा स्पर्श तरी जाणवतो काय ?

प्रस्तुत लेखाच्या अर्थामध्ये, डॉ. गोपाल म्हणतात :-

"His family which had the lustre (द्युतिमंडल) of the disc (मंडल, बिंब) of the **'sun'** on the earth, was named **'Kadamba."**

''सूर्याचे प्रज्वलित - दिव्यदीप्तिमान-द्युतिमंडलबिंब म्हणजेच 'कदंब' हे कुलनाम होय.''

**-''अर्क (=सूर्य) - बिंब - द्युतिक्षितौ । कुलमाभूत कदंबनामा । ''** हा उल्लेख या कदंब क्षत्रिय - कुलाचे सूर्याशी असणारे उत्पत्ति-जनक-नाते स्पष्टपणे निर्देशित करतो.

पुढे बंधुषेणपुत्र मयूरवर्मन् याने स्व-कुल-कमलास (कमलपुष्प =सूर्याचे प्रतीक, सूर्यवंशाचे प्रतीक, कदंब क्षत्रिय राजकुलाचे प्रतीक तेच पुढे 'पद्म-टंक' नामक सुवर्ण नाण्यांवर (कदंबांच्या) अंकित केले गेलेले आहे.) इतकी मौलिकता प्राप्त करून दिली, की मधमाशांचे (भ्रमरांचेही-?) थवेच्या थवे त्याच्याभोवती मंजु-मधुर गुंजारवाचे संगीत वितरीत करीत राहिले !

-प्रस्तुत लेखात कदंब-नृपतींना 'द्विज', 'द्विजोत्तम' हे शब्द संबद्ध आहेत, व त्यांचे क्षत्रियत्व कुल-वंशवेलीक्षत्रियत्वही सुस्पष्ट आहे. याचाच अर्थ असा, की 'क्षत्रिय'-हेही 'द्विज' आहेतच; शिवाय ते वेदांग -विद्या-विशारद असू शकत असत, होतेही ! अर्थातच - १. 'क्षत्रिय हेही 'द्विज',

२. क्षत्रिय हेही 'द्विजोत्तम', नव्हे तर,

३. 'क्षत्रियच 'द्विजोत्तम', आणि-

४. क्षत्रिय हेच 'राजे-नृपती', व द्विजोत्तमही !

: कदंब-नृपतींपैकी एकही 'शर्मा' नामान्त नाही. त्यातूनही 'शर्मा'-उपाधी अप्रशस्त वाटावी (क्षत्रियांसाठी) असे तिच्यात काही नाही. 'शर्मा' - नामान्ताला 'वर्ण-बाधा' नाही, 'वर्ण-मर्यादा' नाही. : - (मग 'मनुस्मृती' काहीही सुचवो !') व्यक्तिनामास जोडावयाचे ते एक 'पालुपद' असल्यानेच बहुधा, प्राचीन भारतातील बऱ्याच 'सूर्य-सोम-वंशी' क्षत्रिय नृपतींची नावे 'शर्मान्त' ही आढळतात :-

● '(प्राचीन चरित्रकोश- चित्राव) : १. क्षेमशर्मन, २. गिरिशर्मन (सूर्य वीर.), ३. गोविंदशर्मन, ४.चंद्रशर्मन (सूर्य.कुरु), ५.जयशर्मन, ६. दृष्टशर्मन (सोम. वृष्णी),

७. देवशर्मन (विष्णु-अवतार), ८. विष्णुशर्मन, ९. वृद्धशर्मन (सोमे. पुरु.), १०. वेदशर्मन (सोम. विदु.), ११. शिवशर्मन, १२. सुशर्मन (कर्ण-पुत्र), १३. सोमशर्मन (सोम-कोष्टु-मथुरा) - (गुद्नापूर-शिलास्तंभलेख (कर्नाटक), स्तंभ-उंची २० फूट), :(इ.स. ३ रे - ४ थे शतक)

१. 'कदंब लेख-संग्रह.' डॉ. बी. आर. गोपाल. (स. १९८५)

२. 'श्रीकंठिका' : प्रो. एस. श्रीकांतशास्त्री-गौरवग्रंथः

संपा. डॉ. बी.आर.गोपाल.

२०. **प्रमाण : २ रे** :(व 'निर्णायक !') :

:(कदंबलेख -संग्रह : डॉ. बी.आर. गोपाल); पृ. १७८, (स. १९८५),

(१) के. डी. बाजपेयी गौरव ग्रंथ : संपा. एस. एच. रित्ती. (बेडकिहाळ ताम्रपट) : इ. स. ३१० : शांतिवर्माकदंब : (३ पत्रे.) या लेखाला डॉ. बी. आर. गोपाल 'Spurious' असे शीर्षक (कंसात) लिहितात ! का? तर अक्षर वळण ११ व्या शतकातल्या ''सारखे कंदाचित वाटते !'' पण 'काल' मात्र नमूद केलाय शके २३२ (स. ३१०).

हा लेख कदंब-राजवंशाचा, उपलब्ध सर्वांत प्राचीन व प्रारंभिक असा अभिलेख ठरतो: -

**-''स्वस्ति जयति त्रिदिवाक्रान्त-कारण-क्षण-वामन=हरिर्दैत्याधिप-वधू-नयनांजन-वामन=श्रीमतां विजय-वैजयन्त्यां स्वामि-महासेन-मातृगण -पादानुध्यान-तत्पराणां मयूरवर्मणा वंशोजातानां जगदंबानां कदंबानां सौर्य्यालंकृत -तेजसाम अनवरत -प्रवृत्त-दानानंदित द्विज-दीनानाथ -जनानाम् हास इव विशुद्ध -विपुलमय -पक्षाणां चतुरुदधि -बेळावलंबिनीम् कीर्तिमुद्वहताम पर-नरप-करी-तुरंगम-विदलन-विनिवृत्त-रक्तधारा-रंजितकराल-करपाल-भव-भयानत-समस्त-सामंत-मकुट-मालाराजः पुंज-पिंजरित-चरणारविंद-युगलानामारि-निकर-विपिन-विदलन-पटुतर-वारि-लब्धजयलक्ष्मीशानां वंशे श्रीसर्व्ववर्म्मा अजनि तत् सूनु:हिमवद-गिरि-शिखरे-स्थापित-शक्तिः शक्ति-त्रय-संपन्नो-ललाट-लोचनः सर्व्व शक्रान्त कीर्तिः स्व-भुज लसदसित राशि-तारातिवर्गः....! ... पृथुसमचरितो लोकयात्रप्रवीणः संध्यादिना विधातृसमः मद-गज-घटा-पाटन-खिन्नबाहुः तंत्रावाप-प्रयोगे-प्रकटिता-धीशणःपार्थ-मार्ग्गानुसारी-शरदुदित-सकल-विधुकर-निकर-परिष्यंदित-अमलयशः स च शांतिवर्मा-महाराजस्सर्व्वानेवमा ज्ञापयति विदितामास्तु वोष्माभिर्द्वातृषंदुत्तर-द्विशतेषु-शक-वर्षेष्व तिथेषु....!**

**एवं सीमा विशुद्धः ग्रामं '<u>क्षत्रिय-पुंगवः</u>' दत्तवान् विप्रमुख्याभ्याम् स्वराष्ट्रपरिवृद्धये विजित सकलामुर्वीम् चतुस्सागरमेखलां निष्कंटकम् जगत्कृत्वा पश्चाद्धर्म -पुरस्सरः सर्व्वांश निहिताचरै प्रत्यधीकृत समस्तजनचरितं:''**

**-याचा आवश्यक तो सारांश:-**

-''वामनास (विष्णु-अवतारी हरीस) वंदन. कदंब-नृप हे जगतास मातृवत, ते विजय-वैजयंती राजधानीचे व राज्याचे स्वामी. 'सौर्य्य (belonging to the 'sun-, Solar-race इ. सूर्यसंबंधी, सूर्यवंश) अर्थात सूर्याच्या, सूर्यवंशाच्या परंपरागत द्युतीने तेजस्वीपणे शोभतात. अशा जयलक्ष्मीशाच्या वंशात श्रीसर्ववर्मा-कदंब जन्मला. त्यांचा पुत्र शांतिवर्मा, सूर्यवंशीय क्षत्रिय राजा पृथू याच्यासम चरिताचा, लोकयात्राप्रवीण, संध्याधिकांमध्ये (विधातृ=) ब्रह्मदेवासम असणारा, मत्त हत्तीच्या घंटा (गंडस्थळे) फोडून टाकल्याने श्रमलेल्या बाहूंनी शोभायमान, पार्थ (=अर्जुन, सोमवंशीय क्षत्रिय राजा) त्या अर्जुनाच्या जीवनक्रमणेचे अनुगमन करणारा, शरदातील निर्मल चंद्राप्रमाणे शोभिवंत, निर्मल यशसंपन्न अशा त्या शांतिवर्मन् कदंब या **'क्षत्रिय-पुंगवाने'** (सर्वश्रेष्ठ क्षत्रिय नृपतीने; पुंगव=वृषभ, बैल, सर्वश्रेष्ठ) प्रमुख विप्रांस स्वराष्ट्राच्या अभिवृद्धीसाठी, कल्याण-मंगलासाठी उक्त गांवांचे दानपत्र करून दिले आहे.''

या वर्णनातील शब्दनूशब्द पूर्ण 'बोलका' आहे. येथे या कुलास 'द्विज' संबोधलेले नसूनही द्विजाच्या आचरणाने संपन्न (विधातृ-सम संध्यादिक कर्मे करणारे) राजे आहेत; तरीही ते **'क्षत्रिय-पुंगव' (सर्वश्रेष्ठ क्षत्रिय) नृपती आहेत**. या लेखाचा काल इ. स. ३१० आहे; तेव्हा कदंबांचा हा उपलब्ध आद्य लेख.

**(६) तात्पर्य व कदंब-वर्णनिश्चिती** : तेव्हा प्राचीन व मध्ययुगीन दक्षिण भारतीय कदंब राजवंश (उत्तर कर्नाटक, दक्षिण महाराष्ट्र, गोवा, कलिंग) आर्य-क्षत्रिय - मराठा- राजवंश ठरतो, हे भारताचार्य चिं. वि. वैद्य यांचे प्रतिपादन आंग्लीय व/वा तत्सदृश कोणांस उमजून घेण्यास या विवेचनानंतर तरी प्रत्यवाय राहू नये.

कदंबांचे वंशज्ञते आजचे 'कदम'-**'मराठे'** होत आणि ओरिसात आजही 'कदंब' हेच उपनाम-कुलनाम-आडनांव (Surname) लावणारे **'क्षत्रिय'** अस्तित्वात आहेत. तेव्हा याविषयात विस्तृत व सर्वक्षेत्रीय तपशील संकलनाची नितान्त गरज आहे.

●●

# २. महापद्म 'नंद' - राजवंशाचे 'क्षत्रियत्व' आणि संशोधकांचे सत्यापलाप !

*" महापद्म (नंद) हा मगध- सम्राट (इस पू. ४२२-३२२) १०० वर्षे राज्योपभोग घेता झाला; तो, 'शिशुनाक' या क्षत्रिय राजाच्या वंशातलाच होता. तरीही त्यास 'नंद' समजून भिन्नवंशी मानले गेले. तो यज्ञकर्ता, राज्याभिषिक्त, सार्वभौम सम्राट, एकछत्र राज्यकर्ता व "एकक्षत्र" म्हणजे सर्वश्रेष्ठ अद्वितीय 'क्षत्रिय' सम्राट होता, तरीही त्यास व त्याच्या ८ पुत्रांसही 'शूद्रमातेचे पुत्र' ठरवून 'शूद्र' ठरविले गेले ! 'पृथ्वी' हीच "शूद्रा / शूद्र / शूद्री" आहे, जे पुराणांत म्हटले आहे, असे ते आजवर अज्ञातच ठेवले गेले. तेव्हा 'क्षत्रियेतरा' स राज्याभिषेक / राज्याधिकार नसे; हेच सत्य सुवर्णनिकषा जसे; यच्चयावत विद्वानांपुढे नम्रपणें ठेवण्याचा हा प्रयत्न आहे.."*

●●●

**१. प्रास्ताविक :**

इ.स.पू. ४२२ ते इ. स. पू. ३२२ ही १०० वर्षे मगधचा एक सम्राट 'महापद्म' सर्व भारताचा पहिला **'सार्वभौम'** राजा ऐतिहासिक साधनांनी सिद्ध केला आहे. सर्व अभ्यासकांनी तो मान्य केला आहे. त्याच्याविषयी भारतीय संस्कृत पुराणे प्रत्येकी ५-५ श्लोकांत माहिती देतात; अशी सहा पुराणे आहेत:-

१. मत्स्य., २. वायु., ३. ब्रह्मांड., ४. विष्णु., ५. भाग., व ६. भविष्य.

'महापद्म' हा, 'शैशुनाकवंशीय क्षत्रिय राजा' अशा त्या महानंदीचा 'औरसपुत्र' होता. शैशुनाक राजांना मत्स्य.-वायु. -ब्रह्मांड. ही तीन पुराणे, 'क्षत्रबांधवः।' (क्षत्रिय) असे म्हणतात. तेव्हा हा 'महापद्म'ही ''जन्मजात विशुद्ध क्षत्रियच'' होता. परंपरासिद्धही ! (मत्स्य.२७२- १३, वायु. ९९-३२२; ब्रह्मांड. ३.७४-१३५; मनु.२.७, ६.६).

मत्स्य-वायु-ब्रह्मांड ही पुराणे महापद्म 'एकराट', 'एक क्षत्र' होता, असे म्हणतात. 'एकराट', 'एकछत्र' म्हणजे सार्वभौम, चक्रवर्ती - 'अनुल्लंघित शासन' असेही म्हटलेय; आणि 'एकराट्' हे राजबिरुद 'राजसूय' व 'अश्वमेध' यज्ञ करणाऱ्या राजांसच प्राप्त होत असे.(श. ब्रा. ५.४.३.१., २१; ऐ. ब्रा. ३.२.३.१५; गो.ब्रा.), आणि- 'एकक्षत्र' म्हणजे ''एकमेवाद्वितीय सर्वश्रेष्ठ क्षत्रिय'' होय! शिवाय महापद्म हा 'एकराट', होता. याचाच अर्थ असा आहे की त्याने 'यज्ञ' केले होते आणि 'यज्ञाधिकार' हा 'शूद्रा' स नव्हता; आणि 'क्षत्रिया'खेरीज 'राजपदाधिकार' **कोणाही अन्यास नव्हता.** म्हणजेच **'महापद्म'** हा **'क्षत्रिय'**च होता. (मनु. अ.७ वा.)

'पुराणे म्हणतात, 'महापद्मास' 'राज्याभिषेक' झाला होता !

(मत्स्य. २७३ - ३५;वायु. ९९.४१५; ब्रह्मांड. ३.७४.२२७; विष्णु. ९९.४१५; भाग. १२.२.२६).

-आणि 'राज्याभिषेक'हा अधिकार शूद्रां' स नव्हता. अर्थात महापद्म हा 'क्षत्रिय'च होता. वर्णसंकरास, जारजसंततीसही 'राज्याभिषेकाधिकार' व 'प्रजामान्यताप्राप्ती' नसे व 'राजाही होणे' ही नाही. आणि महापद्म हा ८८ वर्षे व त्याचे ८ पुत्र त्याच्या पश्चात क्रमाने१२ वर्षे राजपदावर विराजमान झाल्याचे पुराणांत नमूद आहे. अर्थात ते सर्व विशुद्धकुलीन, औरस संतती व क्षत्रिय होते.

'आनंदाश्रम-पुणे 'च्या संग्रही ''मत्स्यपुराण-क्षत्रियराज-नामानि'' या शीर्षकाचे एक जंत्रीस्वरूप हस्तलिखित आहे. त्यात 'महापद्म-कौटिल्य-शरधन्वा-पुष्यमित्र-वसुदेव-शिशुक' इ.ही नांवे आहेत. कर्ता व काल नमूद नाहीत.

:(ह. लि. क्र. ८८/९५८/११,६०९ मत्स्य.)

तात्पर्य असे की ही, ''प्रमाणे''हेच सिद्ध करतात की,'महापद्म' व त्याचे पुत्रादि वंशजही विशुद्ध क्षत्रिय कुलीन होते.

तरीही, पुराणांतील ४-२ शब्दांचेच अर्थ गैरसमजुतीने यथार्थपणे समजून घेतले गेलेले नाहीत. इ. स. १९१३ मध्ये या सहा पुराणांचा तौलनिक अभ्यास करून एफ. ई. पार्गिटर यांनी "the Purana Text of the Dynasties of the Kali Age, with introduction And Notes : Oxford University Press, Bombay" हे पुस्तक प्रकाशित केले आहे. त्यात **''महापद्म हा शूद्र स्त्रीचा पुत्र होता''** असे विधान केले आहे; पुराणश्लोकांचा अर्थ म्हणून ते छापले आहे !

त्यांच्याच प्रमाणे इतर अनेक, नव्हे बहुतेक सर्व अभ्यासकांनी किंवा त्यांपैकी कुणीही हे विधान नाकारल्याचे व/वा असिद्ध केल्याचेही उपलब्ध झाले नाही.

**२. महापद्म कोण होता ?:** ( विभिन्न मते):

'महापद्मास व त्याच्या वंशजांना कुलोत्पत्तीच्या हीनत्वाचे लांछन/कलंक लावून ज्या अभ्यासकांकडून बदकुलीन व जारज संतती ठरविण्याचे जे प्रयत्नपूर्वक धाडस या देशात घडले आहे त्यास जगाच्या कुठल्याही इतिहासात तोड नसेल ! अभ्यासक, त्याच्याविषयी काय काय म्हणतात? (महापद्म कोण होता ?) याची अनेक उत्तरे वानगीदाखल अशी आहेत:-

१. शूद्रमातेचा पुत्र (पिता:राजा), २. नापित स्त्रीचा पुत्र (पिता: राजा), ३. नापित पिता व राणीचा पुत्र, ४. वेश्येचा पुत्र, (पिता : राजा), ५. राजा व वेश्या यांचा पुत्र, ६. वेश्या व नापित यांचा पुत्र, ७. जारज पुत्र, ८. नीच जातीचा, ९. नीच कुलत्वाचा, 10. He was a barber, 11. He was a son of barber, 12. He was a son of barber and a 'queen', 13. a man of low origin. 14. He was the son of a barber by a courtezen. (नापिताचा वेश्येपासूनचा पुत्र ) १५. महापद्माच्या नापित जातीय पत्नीचा पुत्र 'घननंद', १६.महापद्म हा घननंदाच्या **'बदफैली'** मातेचा पती होता, १७. तो अ-क्षत्र स्त्रीजनित धननंदाचा पिता होता, १८. नंद ह्या, व्यभिचारज 'शूद्र' घराण्याचा प्रतिष्ठापक, १९. नंदवंशाचा मूळपुरुष व **'नापितदास'**, २०. **'अन्नात** (अज्ञात) कुलजात, २१. नंदकुलीन मूळ पुरुषाचा पिता **'शूद्र'** होता, २२. नंदवंशीय मूळ पुरुषाची माता 'शूद्र' होती, २३. तो वा 'उग्रसेन' दरवडेखोरांच्या टोळीचा पुढारी **'चोरपूर्व'**होता, २४. तो महानंदिनच्या राणीला, तिच्या **'चोरट्या प्रेमसंबंधांतून** 'नापिता' पासून झाला होता, २५. तो 'नापित' जातीय 'गणिकेपासून झाला होता, २६. तो 'राजा'ला 'शूद्रगणिके'पासून झाला असा पुराणांत उल्लेख आहे. (म. ज्ञा.पृ. १७४), (**'गणिका'** हा शब्द कोणत्याही पुराणात नाही, महापद्माच्या मातेबद्दल): २७. पहिला नंद, जो **महापद्म**, तो 'हीन' संबंधांतून झाल्याचे वर्णिलेले आहे. (महाराष्ट्रीय ज्ञानकोश, पृ. १७४), (पूर्णत: असत्याचे/धाष्टर्याचे विधान!), २८.''चंपाची एक ब्राह्मण स्त्री एका मौर्यराजाकडे नापित स्त्रीचे काम करीत होती आणि पुढे त्याने तिच्याशी लग्न लाविले, व तिच्यापासून त्याला 'अशोक' हा मुलगा झाला.''

(''दिव्यावदान'').

-असे हे महापद्मजसे प्रमादपूर्ण प्रवाद प्रियदर्शी सम्राट अशोकासही अजगरी विळखा घालतातच. भारतीय इतिहास- लेखनाची इतिकर्तव्यतापूर्ण शोकात्मिकता अन्यत्र दुर्मिळ व म्हणूनच एकमेवाद्वितीय ठरणारी होय !

**३. सहा पुराणांविषयी विवेचन :**

**(१) पुराणांचे मूल्यमापन :**

(द. प्रा. इ. /डॉ. रा. गो. भांडारकर; पृ. ६५ व ६६; ७४)

**१. संभवनीयता:** कोणातरी कवीने सांगितलेली कथानके, वृत्तान्त प्रारंभतः मौखिक, लोककथात्मक असावेत, व तेच लिखित स्वरूपात 'पुराणे' बनले असावेत.

२. **कालभिन्नता :** सर्व पुराणे, एकाच काळी उत्पन्न झालेली दिसत नाहीत.

**३. काल ज्येष्ठता व कालकनिष्ठता :** काही पुराणे इतरांहून 'कालज्येष्ठ' :(तुलनात्मकदृष्टचा अधिक पूर्वकालीन आहेत). कालक्रमाने: १. वायु, २. मत्स्य, ३. ब्रह्मांड. आणि काही पुराणे 'कालकनिष्ठ' (तुलनात्मकदृष्टचा बरीचशी उत्तरकालीन) आहेत. कालक्रमाने: ५ विष्णु., भागवत., ७. भविष्य.

**४. उद्देश-पीठिका :**'कालकनिष्ठ'त्या उत्तरकालीन पुराणांचा, उदा. **विष्णु.** व **भाग.** यांचा उद्देश;-

''कोणत्याही एका विशिष्ट दैवताचे माहात्म्य वाढविणे;'' तसेच-

''एखाद्या विशिष्ट 'धर्म-मता' विषयी मनात बिंबे (ल) असा बोध करणे'' हा असतो.

५. **'विष्णु'.-पुराणाची 'सत्यार्थपात्रता'** : (पृष्ठ ७४):

१)'विष्णु.' हे 'वायु.' इतके 'कालज्येष्ठ/प्राचीन' नाही. तसेच ते **'भरंवशास योग्य नाही!'** ते 'वायु.'हून 'कालनिष्ठ व उत्तरकालीन' आहे.

२) विष्णुपुराणकर्त्याचा उद्देश -''एकदेशीय धर्ममताची प्रवृत्ती करावी,'' असा असल्यामुळे तपशीलवार वृत्तान्त सांगताना त्यात **'तहकीकपणा'** कडे त्याने फारसे लक्ष दिलेले नसावे, असे दिसते.

**६.' भागवत'पुराणाची 'सत्यार्थ-योग्यता':** (पृ. ७४)'भाग.' मध्ये तर 'विष्णु.' हूनही जास्तच हेळसांड आहे. (ते 'विष्णु.'चे अनुगामित्व/अवलंबन) आहे.

**७. 'भविष्य '-पुराणाची 'अदखल-पात्रता:' (!)**

यात नंदांविषयी विशेष माहिती नाही. मात्र हे एकच पुराण, नंदाच्या आठही पुत्रांची नांवे नमूद करते. त्यांतले एकही नाव इतर पुराणांत आलेले नाही. किंवा इतर पुराणांनी एक-एक तीही वेगवेगळी नांवे दिलीत, त्यांतील एकही नांव

'भविष्य.'मधील नांवांत नाही.

८. **एफ. ई. पार्गिटर-मतें:** (The Purana Text : P. 77) : पुराणांत आलेली माहिती 'मूळ अधिक प्राचीन प्राकृत' वरून 'संस्कृत' मध्ये रूपांतरित केली गेली असावी. (उदा. मत्स्य-वायु-ब्रह्मांड ही पुराणे), कारण त्यांची -१. 'वृत्तरचना', व २. त्यांत आढळणारी **'मूळ प्राकृत शब्दरूपे'**, ३. नावांची चुकीची रूपे कायम राहणे, ४. 'अनियमित संधी'. ('irregular sandhi), 5.( the copous use of expaetive particles !") इ.इ.

**(२) पार्गिटरचे विवेचनाविषयी :** (पुराण टेक्स्ट-संदर्भात) : - पार्गिटरने 'मत्स्य-वायु - ब्रह्मांड' यांचा, **'श्लोकसाधर्म्यांमुळे'** 'एकत्र विचार' केला आहे, व 'विष्णु.-भाग.' यांचा 'एकत्र विचार' केला आहे. **'तळटीपां'**त पाठभेद नमूद केले आहेत. मात्र त्यांच्या अर्थांचा समावेश **''मुख्य अर्थ''**-मजकुरांत केलेलाच नाही. त्यामुळेच **'एकांगीपणाचा दोष'** अजाणतेपणे भारतीय इतिहासात विकृत - घातक व हीनस्तरदर्शी रूढही होऊन राहिला आहे. कारण काही महत्त्वाचे निर्णायक 'शब्दबंध' हेही जर अशाच प्रकारे चिरकालपर्यंत फक्त **'तळटीपां'** तच पडून राहिले व 'श्लोकांचा मुख्य अर्थ देताना त्यांची दखल घेतली गेलीच नाही;' त्यांचाही अर्थ तेथे मुख्य अर्थांमध्ये समाविष्ट केला गेलाच नाही, ते दुर्लक्षितच राहिले तर मूलभूत स्वत्वाधिष्ठित **'सुवर्णगर्भ सत्येंही'** डावलली जातात, आणि तीच निष्काळजी अर्थनिश्चिततेने, **'शूद्रा/शूद्री-गर्भोद्‌भव' मिथ्ये** ही सजीव साकार होऊन समाज, जीवनेतिहासात सर्वत्र असत्यांचाच बोलबाला बोकाळवीत राहतात. सामान्य समाज; शतकांनुशतकांचा श्रमांधिष्ठित पोटार्थी अशा कोटचवधी तळागाळांतल्यांच्या लेखीं 'तळटीपां'तील काय नि 'मुख्यार्थ'काय, सर्वथः एकच ! 'काले अक्षर भैंस बराबर!' तेव्हा सामान्य वाचकही मूळ संहितांकडे वा तळटीपांकडे पाठभेदांकडे वळण्याची सुतराम् शक्यता नसते. सामान्य वाचकही पंडितांवर भरंवसून असतो. तो भरंवसाच त्याच्या कुवतीतला, गरजेचा व महत्त्वपूर्ण निर्णयाचा ठरतो. या पार्श्वभूमीवर येथे **'नंदां'**च्या विटंबनेचे **'सं'-शोधन** करावयाचे आहे.

-''अशा ह्याप्रमाणे नंदांचा किंवा 'जनपदकल्याणी' चा कसातरी 'हलकी कामे' करणाऱ्या लोकांशी किंवा 'हलक्या कुला' शी संबंध जोडलेला सांपडतो,''

: (म.ज्ञा. प्रस्ता. खं. पृ. १७४ )

-या महापद्म राजाविषयी प्रत्येक पुराणात (एकूण अशी सहा पुराणे) प्रत्येकी ५ श्लोकांत तपशील उपलब्ध आहे. हे श्लोक सर्वस्वी एकजसे नाहीत. थोडेफार शब्दांचे फेरफार आहेत. शिवाय या सहा पुराणांची जी हस्तलिखिते उपलब्ध आहेत, त्यांच्यांतही काही शब्दांचे 'पाठ-भेद' मिळतात. या सर्वांचा साकल्याने केलेला अभ्यास म्हणजेच एफ. ई. पार्गिटरचे ''पुराण टेक्स्ट'' (१९१३). यात कलियुगातील भारतीय राजवंशांची वर्णने जी सहा (व सातवे पुराण'गरुड') पुराणांत आहेत यांची

चर्चा व अभ्यास मूळ श्लोक व त्यांचे अर्थ आणि पाठभेद इ. तपशील आहे.

'कालज्येष्ठ' पुराणे 'मत्स्य-वायु-ब्रह्मांड.' आणि कालकनिष्ठ' पुराणे 'विष्णु-भागवत-भविष्य.' यांच्यांत जी **'महापद्मा'** विषयी तफावत आहे ती अभ्यसनीय आहे.

**(३) त्याखेरीज प्रस्तुत निबंधकर्त्यास जी हस्तलिखिते व मुद्रित ग्रंथ उपलब्ध झाले, त्यांची 'संख्या' पुढीलप्रमाणे आहे:-**

अ)हस्तलिखिते,(४४): (१)'अ'-गट(कालज्येष्ठ): (२)'ब'-गट: (कालकनिष्ठ)

| क्र. | संस्था :(पुणे) | मत्स्य. | वायु. | ब्रह्मांड. | विष्णु. | भाग. | भविष्य. | एकूण (६) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | | | ४ | | | ५ |
| १. | भांडारकर इन्स्टि.पुणे | ०५ | ०४ | - | ०९ | ०५ | - | २३ |
| २. | डेक्कन कॉलेज, पुणे | ०१ | - | - | ०२ | ०१ | - | ०४ |
| ३. | जयकर ग्रंथालय, पु.वि. पुणे. | ०१ | - | - | ०१ | ०३ | - | ०५ |
| ४. | आनंदाश्रम : पुणे | ०४ | ०३ | - | ०५ | - | - | १२ |
| | एकूण | ११ | ०७ | ०० | १७ | ०९ | ०० | ४४ |

**(ब) मुद्रित/प्रकाशित : (६ पुराणे) : (८) प्रती.**

| | म. | वा. | ब्र. | वि. | भा. | भ.: | ए. |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ५. रा.श्री. गोंधळेकर: भाग ३ रा (वळे व अष्टपुत्रेकृत) (शिलामुद्रित), (पुणे:/१८७४), | १ | . | . | . | . | . | १ |
| ६. आनंदाश्रम, पुणे (१९८१),(१९८३): | १ | १ | . | . | . | . | २ |
| ७. वेंकटेश्वर प्रेस, मुंबई: | . | . | १ | . | . | . | १ |
| ८. पुराणप्रकाशकमंडळी वाई:(१९०३) | . | . | . | १ | . | . | १ |
| ९. दामोदर सावळाराम मंडळी:(१९२९) | . | . | . | . | . | १ | १ |
| १०.(सार्थ हिंदी) गीताप्रेस: | . | . | . | १ | . | . | १ |
| ११.(सार्थ मराठी),१९१४ च्या पूर्वीची आवृत्ती: | . | . | . | . | १ | . | १ |
| : एकूण : | .२ | .१ | .१ | .२ | .१ | .१ | ०८ |
| ● सर्व एकूण : | १३ | .८ | .१ | १९ | १० | .१ | ५२ |

# १) 'महापद्म' -राजकुल व ६ पुराणांतील मूळ श्लोक

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ० श्लोक | २७२-११ ते १३,<br>२७२-१७ ते २१, | ९९-३२० ते २२,<br>९९-३२६ ते ३१, | ३.७४.१२३७,<br>३.७४-१३९, ते १४३. | ४.२४.३b)ते ६. | १२-१-६b)<br>ते १२. | ४-६-२५,<br>४०६-३१ ते ३६. |
| | (१) 'अ' गट / पुराणे : | | | (२) 'ब' गट / पुराणे: | | |
| | १. मत्स्य. | २. वायु. | ३. ब्रह्मांड. | ४. विष्णु. | ५.भाग. | ६. भविष्य. |
| | (वंशक :उदासी) | (दर्शक : उदायी) | (दर्भक : उदयी) | (दर्भक : उदयन) | (दर्भक : अजय) | (दर्भक उदयाश्व) |
| ० | चत्वारिंशत्<br>समा भाव्यो<br>राजा वै<br>नंदिवर्धनः। | द्वाचत्वारिंशत्<br>समा भावो<br>राजा वै<br>नंदिवर्धन :। | चत्वारिंशत्<br>समा भाव्यो<br>राजा वै<br>नंदिवर्द्धन : । | दर्भकात् च<br>उदयन<br>स्तस्मादपि<br>नंदिवर्धन- | दर्भकस्य<br>अजयः<br>स्मृतः ॥ ६ ॥<br>नंदिवर्धन | दर्भकस्तनयो<br>उदयाश्वस्ततो<br>अभवत् ॥<br>नंदिवर्धन |
| १. | चत्वारिंशत्<br>त्रयश्चैव<br>महानंदी<br>भविष्यति ॥ | चत्वारिंशत्<br>त्रयं चैव<br>महानंदी<br>भविष्यति ॥ | चत्वारिंशत-<br>त्रयश्चैव<br>सहानंदि<br>भविष्यति ॥ | स्ततो<br>..<br>महानंदी<br>.. | आजेयो<br>..<br>महानंदि<br>सुतस्ततः ॥ | एवतत् ॥<br>तस्मात्<br>नंदसुतोऽ<br>भवत् ॥ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २. | इत्येते<br>भवितारोऽत्र<br>**शिशुनाकत :।**<br>वंशे वै<br>शतानि त्रीणि<br>पूर्णानि<br>षष्टिवर्षा-<br>धिकानि तु ॥ | इत्येते<br>भवितारो वै<br>**शैशुनाका**<br>नृपा दश<br>शतानि त्रीणि<br>वर्षाणि<br>द्विषष्टचभ्य-<br>धिकानि तु ॥ | ..<br>भविष्यंतिच<br>**(शिशुनागा)**<br>(दशै वै ते),<br>शतत्रयम्<br>वर्षाणि<br>षष्टचु तर ॥ | इत्येते<br>भविष्यंति<br>***शैशुनागा**[नाभा]<br>दश भूमिपाला<br>स्त्रीणि<br>वर्षशतानि<br>द्विषष्टच-<br>धिकानि॥ | ..<br>..<br>**(शिशुनागा)***<br>(दशै वै ते)<br>शतत्रयम्<br>..<br>षष्टचुत्तर ॥ | ..<br>..<br>..<br>..<br>..<br>..<br>..<br>.. |
| ० | **'शिशुनाका'**<br>भविष्यंति<br>राजान:<br>**'क्षत्रबंधव:।'** | **'शैशुनाका'**<br>भविष्यंति<br>राजान:<br>**'क्षत्रबांधवा:।'** | **'शिशुनागा'**<br>दशैवैते<br>राजान:<br>**'क्षत्रबंधव:।'** | **('शैशुनागा')**<br>(दश) +<br>(भूमिपाला)+<br>.. | **'शिशुनागा'**<br>दशै वै ते समा+<br>..<br>पृथिवीं | ..<br>..<br>..<br>.. |
| ३. | एतै: सार्द्धं<br>भविष्यंति<br>**'यावत्कलि'**<br>नृपा : परे ॥ | एतै: सार्ध:<br>भविष्यंति<br>**'तावत्काल'**<br>नृपा: परे ॥ | एतै: सार्द्धं<br>भविष्यंति<br>**'तावत्कालं'**<br>नृपा : परे ॥ | ..<br>..<br>..<br>.. | कुरुश्रेष्ठ<br>भोक्ष्यंति<br>**'कलौ'**<br>नृपा : ॥ | ..<br>..<br>..<br>.. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ० | महानंदि- सुतश्चापि 'शूद्रायां' कलिकांशजः। | महानंदि- सुतश्चापि 'शूद्रायां' काल-संवृतः। | महानंदि- सुतश्चापिः 'शूद्रायाः' काल संवृतः। | महानंदि- सुतः 'शूद्रागर्भोद्भवो' ऽतिलुब्धो | महानंदि- सुतो राजन् 'शूद्रीगर्भो-' द्भवो बली | पितुस्तुल्यं कृतं राज्यं 'शूद्रीगर्भ- समुद्भव'॥ |
| ४. | उत्पत्स्यते महापद्मः 'सर्वक्षत्रांतको नृपः' ॥ १७ ॥ | उत्पत्स्यते महापद्मः 'सर्वक्षत्रांतरे नृपः' ॥ २३ ॥ | उत्पत्स्यते महापद्मः 'सर्वक्षत्रांत- कृन्नृपः' ॥१३९॥ | परशुराम इवापरो महापद्मो नंदः ऽखिलक्षत्रांत कारी भविता ॥४॥ | कश्चिन्नंदः महापद्मपतिः क्षत्रविनाश- कृत् ॥ ९a ॥ | नंदज्जातः प्रनंदश्च दशवर्षं कृतं पदम् ॥ |

| श्लोक | (१) 'अ' गट / पुराणे : | | | (२) 'ब' गट / पुराणे | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | १. मत्स्य. | २. वायु. | ३. ब्रह्मांड. | ४. विष्णु. | ५.भाग. | ६. भविष्य. |
| ० | ततः प्रभृति राजानो भविष्याः ***शूद्रयोनयः।*** | ततः पभृति राजानो भ विष्याः ***शूद्रयोनयः।*** | ततः प्रभृति राजानो भविष्याः ***शूद्रयोनयः।*** | ततः प्रभृति ***शूद्राभूमिपाला*** भविष्यंति। | ततो नृपा भविष्यं ***शूद्रप्राया–*** | तस्माज्जातः परानंदः पितुस्तुल्यं ***कृतं पदम् ॥*** |
| ५. | एकराट् स महापद्मो ***'एकक्षत्रो'*** * भविष्यति ॥ | एकराट् स महापद्म ***'एकक्षत्रो'*** * भविष्यति ॥ | एकराट् स महापद्म ***एकच्छत्रो*** भविष्यति ॥ | महापद्मः ***सचैकच्छत्रा*** मनुलंघित – | स्त्वधार्मिका महापद्मो ***स एकच्छत्रां*** पृथिवीमनुल्लं – | तस्माज्जातः समानंदो विंशद्वर्षं कृतं पदम् ॥ |
| ० | अष्टाशीति तु वर्षाणि पृथिव्यां च भविष्यति। | अष्टाविंशति वर्षाणि पृथिवीं पालयिष्यति। | अष्टाशीति तु वर्षाणि पृथिवीं पालयिष्यति। | शासनो .. । पृथिवीं भो क्ष्यति ॥ | घितशासनः ॥ द्वितीय इव भार्गवः शासिष्यति ॥ | तस्माज्जातः प्रियानंदः पितुस्तुल्यं कृतं पदम् ॥ |
| | ***सर्व क्षत्रमथो–*** त्साद्य | ***सर्व क्षत्रहरो–*** द्धृत्य | ***सर्व क्षत्रं –*** समुद्धृत्य | ***महापद्मस्तत्पुत्र–**** श्चैकं वर्षशतं | .. | .. यज्ञभंगः सुतस्तस्मात् |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ६. | भाविनाऽर्थेन चोदितः॥ | भाविनाऽर्थस्य वै बलात् ॥ | भाविनोऽर्थस्य वै बलात् ॥ | अवनीपतयो भविष्यंति * | .. .. | पितुरर्द्धं कृतं पदम् ॥ |
| ० | सुकल्पादि सुता ह्यष्टौ समा द्वादश ते नृपाः। | सहस्रास्त-त्सुता ह्यष्टौ समा द्वादश ते नृपाः । | तत्पश्चा त्सुता ह्यष्टौ समा द्वादश ते नृपाः। | सुमाल्याद्या तस्याप्यष्टौ सुताः भवितार-स्तस्य च | सुमाल्यप्रमुखाः तस्यचाष्टौसुताः भविष्यांति राजानः=स्म | मौर्यानंद - स्तस्यसुतः पितुस्तुल्यं कृतं पदम् ॥ |
| ७. | महापद्मस्य पर्याये भविष्यंति नृपाः क्रमात् ॥ | महापद्मस्य पर्याये भविष्यंति नृपाः क्रमात् ॥ | महापद्मस्य पर्याये भविष्यंति नृपाः क्रमात् ॥ | महापद्मस्य अनु पृथिवीं भोक्ष्यंति । ...* | शतं समाः य इमां मही भोक्ष्यांति । प्रपन्नानु - | महानंद-स्ततोजातः पितुस्तुल्यं कृतंपदम् ॥ |
| ० | उद्धरिष्यति समैर्द्वादशभिः सुतान् कौटिल्यः .. | उद्धरिष्यति तान् सर्वान् कौटिल्यौ वै द्विरष्टभिः । | उद्धरिष्यति तान् सर्वान् कौटिल्यो वै द्विजर्षभः। | समुद्धरिष्यति नवैव तान् नंदान् कौटिल्यो ब्राह्मण : ॥ | द्धरिष्यति । नव नंदान् कश्चित् द्विज : ॥ | एतस्मिन्नेव काले तु कलिना संस्तुतो हरि : ॥ |
| ८. | भुक्त्वा महीं वर्ष शतं ततो मौर्यान् गमिष्यति ॥ | भुक्त्वां महीं वर्ष शतं 'नंदेंदु' स भविष्यति ॥ | भुक्त्वा महीं वर्ष शतं 'नरेंद्र' : स भविष्यति ॥ | तेषामभावे पृथिवीं मौर्याश्च भोक्ष्यंति ॥ | तेषामभावे जगतीं मौर्या वै कलौ भोक्ष्यंति । | काश्यपात् उद्भवो देवो गौतमो नाम विश्रुता : ॥ |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ९. | शतधन्वा च भविता तस्य पुत्रस्तु षट् समाः । | चंद्रगुप्तं नृपं राज्ये कौटिल्यः स्थापयिष्यति । | चंद्रगुप्तं नृपं राज्ये कौटिल्यः स्थापयिष्यति । | चंद्रगुप्तं व्युत्पन्नं कौटिल्य एव राज्येऽभिषेक्ष्यति | चंद्रगुप्तं स एव वै द्विजो राज्ये - भिषेक्ष्यति । | .. .. .. .. |
| संदर्भ : | १.आनंदाश्रम, पुणे :(१९८१), २. गोंधळेकर, पुणे (१८७४) प्रती. | आनंदाश्रम, पुणे, (१९८३), प्रत. | वेंकटेश्वर, मुंबई, ..प्रत. | पुराण प्रकाशक मंडळी, वाई, (१९०३), प्रत. | दा.सा. मंडळी, मुंबई, (१९२९), प्रत. | सार्थ मराठी, (१९१४) पूर्वीची आवृत्ती. |

**२) स्पष्टीकरण : १ :**

वरील तक्त्यात, अंक क्र. ५ पूर्वीच्या ओळीत -

**'एकक्षत्र'** हा शब्द 'मत्स्य.' व 'वायु.' या दोनच पुराणांच्या रकान्यांत जो आहे तो संदर्भित प्रकाशित ग्रंथांत जरी 'एकछत्र' असा आहे, आणि पार्गिटरनीही 'एकछत्र'चाच अर्थ मुख्यार्थात दिला आहे, (पृ. २५) तरीही-

**मात्र-'पुराण टेक्स्ट'** या आपल्या इंग्रजी ग्रंथात-

(१) **पार्गिटरनी** (पृ. २५ वरील) तळटीपांत **'एकक्षत्र'** हा त्यांस उपलब्ध झालेला 'पाठभेद' नोंदविला आहे. ('पुराण टेक्स्ट : कलि एज डिनॅस्टीज:'१९१३)

[LMT ('ल' : मत्स्य) : संस्कृत हस्तलिखित नं. १६४/१८८७-९१ चे डेक्कन कॉलेज, पुणे. ६] (सध्या : भां. प्रा. वि. सं. सं. पुणे. संग्रही). **''एकराट च महापद्म एकक्षत्रो भविष्यति ।''** (श्लोकांक नाहीत).

: (पृ.३२१, ओळी ९ व १०).**(१)**

**(२) या खेरीज आणखी ३ उपलब्ध हस्तलिखितांत 'एकक्षत्र'** शब्द नमूद आहे:-

१) भां. प्रा. वि. सं. सं. पुणे ('मत्स्यपु.' एम.एस. नं. ४५ : 'विश्राम' (II), (पृ. ६४०/ ब, ओळी २ व ३).

**'एकराज्य महापद्मः एकक्षत्रो भविष्यति !'** (श्लोकांक नाहीत ) : (२)

३) व ४) आनंदाश्रमः पुणे-२ (mss.)

३ : (मत्स्य पु. नं. १२ (५)-१२- ७८) : पृ.३०५/बः ओळ : १०) : (३),

४ : (वायु पु. नं. १२ (५) -१९-१२२) : पृः २२३ / बः ओ. १२):(४)

या दोन्ही हस्तलिखितांत पुढील ओळ एकसारखीच आहे:-

:**'एकराट् स महापद्मः एकक्षत्रो भविष्यति ॥'**

(श्लोकांक नाहीत): (वायु. ॥ ७३ - ब):(मत्स्य).

तसेच-

५) 'मत्स्यपुराणानुशीलनः'(इंग्रजी) अग्रवाल, वासुदेव शरण, (१९६३) ऑल इंडिया काशिराज ट्रस्ट, वाराणसी, या ग्रंथात पृ. ३७५ वर 'नंदां'च्या वर्णनाच्या या श्लोकांत ('Eka-Kshatra') अर्थात **'एकक्षत्र'** शब्दच अग्रवालांनी नमूद केलेला आहे.- (**'एकराट्'-'एकक्षत्र'**). या अशा प्रकारें एकूण ५ **हस्तलिखित** प्रतींत **'एकक्षत्र'** हा शब्द संशोधक अभ्यासकांसाठी उपलब्ध असल्याने येथेही वरील तक्त्यात तोच नमूद केला आहे. इ. स. १९९६ मध्येही उपरोक्त हस्तलिखिते उपलब्ध व सुरक्षित आहेत, त्या त्या संस्थांच्या संग्रहांमध्ये. तेव्हा भारतीय इतिहासप्रेमी अशा तथा भारतीय राजवंश - कुल - वंश - वर्ण मूलोत्पत्ती शोधू व लिहू इच्छिणाऱ्या प्रामाणिक प्रवृत्तीच्या व सत्याचे महत्त्व जाणत असलेल्या जागतिक स्तरप्राप्त अशा तथा प्रत्येक इतिहास-अभ्यासक, लेखक व प्रकाशकांनी याची आवश्यक ती जरूर

दखल घेणे आणि आजवरच्या वा आजपर्यंतच्या इतिहासातील हा खोटा कलंक पूर्व प्रकाशित प्रत्येक भाषेतील प्रत्येक ग्रंथांच्या पुनरावृत्तीतून दक्षतापूर्वक काढून टाकणे व इतिहासलेखनाचे शुद्धिकरण करणे नितान्त महत्त्वाचे आहे.

**(३) पाठभेद :**

हे पाठभेद पुस्तकलेखकास; भारतीय राजवंशांच्या माहितीच्या संबंधातील ६ पैकी ४ च पुराणांच्या एकूण चव्वेचाळीस (४४) हस्तलिखितांतून - उपलब्ध झालेले आहेत.

('ब्रह्मांड.' व 'भविष्य.' या पुराणांचे एकही हस्तलिखित उपलब्ध झालेले नाही. पार्गीटर यांनी अन्य अभ्यासलेल्या 'हस्तलिखितां'ची यादी त्यांच्या 'पुराण टेक्स्ट....'मध्ये नमूद आहेच. त्यांतील 'पाठभेद' त्याच ग्रंथांत त्या त्या पृष्ठांवरील तळटीपांत त्यांनी दिले आहेत.

२) उपरोक्त उपलब्ध साधनांतून आढळलेल्या पाठभेदांचा स्वतंत्रपणे समुचित विचार व चर्चा प्रस्तुत पुढील विवेचनात केलेली आहे.

(४) येथे प्रथम 'मत्स्य., मधील मूळ श्लोक (मत्स्य. २७२ - ११ ते २२ पाठभेदांसहीत ):

''चत्वारिंशत्समा भाव्यो **राजा वै 'नंदिवर्धन** : ॥ १०

चत्वारिंशत्त्रयश्चैव **'महानंदी'** भविष्यति ।

इत्येते भवितारोऽत्र **वंशे वै 'शिशुनाकतः'** ॥ १२

**शिशुनाका** भविष्यंति राजानः **क्षत्रबंधव** : ॥१३

एतैः सार्धं भविष्यंति **'यावत्कलि' नृपाः परे** ।

तुल्यकालं भविष्यंति सर्वे ह्येते **'महीक्षितः'** ॥१४

एते सर्वे भविष्यंति एककालं **'महीक्षितः'** ॥ १७

**(२) - ''महानंदि सुतश्चापि 'शूद्रायां कलिकांशजः'**।

उत्पत्स्यते **'महापद्मः' 'सर्वक्षत्रांतको'** नृपः ॥ १८

ततः प्रभृति **राजानो** भविष्याः **'शूद्रयोनयः'**।

**'एकराट्' स महापद्मो 'एकक्षत्रो'** भविष्यति ॥ १९

**अष्टाशीतिस्तु** वर्षाणि **पृथिव्यां च** भविष्यति ।

**सर्वक्षत्रमथोत्साद्य** भाविनाऽर्थेन चोदितः ॥ २०

सुकल्यादिसुता ह्यष्टौ समा द्वादश ते नृपाः ।

महापद्मस्य पर्याये भविष्यंति नृपाः क्रमात् ॥ २१

उद्धरिष्यति **कौटिल्यः** समैर्द्वादशभिः सुतान् ।

भुक्त्वा महीं वर्षशतं ततो **मौर्यान्गमिष्यति** ॥ २२

(५) **शिशुनाकः**

**वरील श्लोकांतील - 'वंशाने क्षत्रिय'** (क्षत्रबांधवः) असणाऱ्या-

१) 'शिशुनाक' राजाच्या वंशजांनाही **'शिशुनाक'** असेच म्हटले आहे. (मत्स्य.),

२) 'शिशुनाक' राजा व त्याचे वंशज राजे : **'शैशुनाक'**. (वायु.)

३) व ४) **'शिशुनाग'** राजा व त्यांचे वंशजही : **'शिशुनाग'** (ब्रह्मांड./भाग.)

५) 'शिशुनाग' राजा व त्याचे वंशज राजे : **'शैशुनाग'** : (विष्णु.)

६) 'शिशुनाभ' राजा व त्याचे वंशज राजे : **'शैशुनाभ'** : (विष्णु./हिंदी)

-('नाक' - चा अर्थ आहे : 'नंद'/ आनंद ('सत्-चित्-आनंद'-पैकी) (अथर्व. ६.८४.४): त्याचेच 'पाठ' बनले **'नाग'/'नाभ'!**

(६) **महीक्षितः ।**

१) 'महानंदी' हा 'शिशुनाक'वंशीय आहे, आणि तोही **'क्षत्रबांधव'** अर्थात **'क्षत्रिय'** आहे.

२) तोही **'महीक्षितः'**आहे, अर्थात **'क्षत्रिय'** आहे - (वायु.)

"मूर्धाभिषिक्तो राजन्यो बाहुजः क्षत्रियो विराट् ।"

(क्षत्रिय) राजा, राट्, पार्थिव, क्षमाभृत, नृप-भूप-**महीक्षितः** । = (क्षत्रिय राजा)

**": चक्रवर्ती सार्वभौमो; नृपोऽन्यो मंडलेश्वरः ।**

**: येनेष्टं राजसूयेन मंडलस्येश्वरश् च यः ।**

**: शास्ति यश् चाऽऽज्ञया राज्ञःस 'सम्राड्' थ राजकम् ।**

**: राजन्यकं च नृपति-क्षत्रियाणां गणे क्रमात् ॥"** :(अमरकोश : २.८.७६७ ते ७६९).

-यांतील राजा, राट्, नृप, महीक्षित, 'क्षत्रियनृपती' -वाचक 'बिरुदे' पुराणांनी 'महापद्मा'बद्दल योजिली आहेत. त्यांकडे अभ्यासकांचे दुर्लक्ष का व्हावे?

(७) **'यावत्कलि नृपाः परे भविष्यंति ।'** (मत्स्य., वायु., ब्रह्मांड.) **"-कलियुगाच्या अंतापर्यंत** म्हणजे संपूर्ण (प्रारंभ ते अंत) कलियुगात **'शिशुनाक'** राजांजसे **'क्षत्रियच राजे'** होतील." - हे **'पुराण-वचन'** अभ्यासक कसे दुर्लक्षू पाहतात ?

(८) **'महानंदिसुतश्चापि... महापद्मः..... नृपः।'(५ पुराणे);**

**: 'महानंदीचा सुत' तोच 'महापद्म नृप'** यात 'महापद्माचे औरस पुत्रत्व, पितृप्रधान राजवंशपरंपरा व विशुद्ध क्षत्रियत्व अबाध आहे.

'महापद्म'च्या पूर्वीचे परीक्षित राजापासून पुढील सर्व राजांच्या फक्त पित्यांचीच नांवे नमूद आहेत. तद्वत 'महापद्मा' नंतरचे राजांचे विषयीही त्यांच्या पित्यांचीच नांवे नमूद आहेत. उदा. क्रमानेच पौरव, (पुरुरवस), ऐक्ष्वाकू, बार्हद्रथ, प्रद्योत, शैशुनाक, त्यांपैकीच 'महापद्म' व त्याचे पुत्र ('नंद'-?) इ. होत. यांपुढील राजवंश-मौर्य, शुंग, काण्व, सातवाहन, वाकाटक (कैलिकिल) इ. होत.

यांपैकी कोणाही राजाच्या 'मातेचे नांव' अथवा 'तिचा वर्ण वा जात' यांपैकी कशाचाही उल्लेख पुराणे करीत नाहीत. 'महापद्म'च्या जन्मदात्या मातेचेही नांव अथवा 'वर्ण-जाती'चा उल्लेख एकाही पुराणात मुळीच नाही.



त्याला स्पष्टपणे 'महानंदीचा सुत' (पुत्र) अर्थातच 'औरस पुत्र' च म्हटलेले आहे. आणि 'औरस पुत्र' तोच होय की जो समान वर्णीय म्हणजेच 'एकच वर्णा' च्या'पिता व माता' यांचा विधिवत विवाहजन्य पुत्र होय,(तत्पूर्वीच्या ७ पिढ्यांपासून वंशशुद्धि-परंपरा ).

'महापद्म' असा नसता तर त्याच्या मातेचे निश्चित नांव, निश्चित मूळ, निश्चित जात नमूद करण्यास 'पुराणकारांना' कोणाची का बंदी होती? त्याची आवश्यकता त्यांना ज्ञात नव्हती की काय ? जैन-बौद्ध-साधने जिथे त्याच्या निश्चित जातीवर तुटून पडल्याचे भासवितात, तिथे पुराणकारांना कोणता संकोच होता? **जैन-बौद्धांचा दुष्टावा व त्यांचीच असत्याविषयी आत्मीयता व त्याविषयीचा दुरावा हेतुत: असे; हे विश्वख्यात आहे.** या पार्श्वभूमीवर पुराणकारांची प्रामाणिकता उठून दिसते.

(९) **पुराणांतील पाठभेद एकत्र :-** यापुढील भागाचे विवेचन करण्यापूर्वी विविध पुराणांतील वरील श्लोकांसंदर्भात उपलब्ध पाठ एकत्र पाहणे आवश्यक आहे:-

१) (अ) **महानंदी ।** [**'सहानंदी'**: (ब्रह्मांड.) ]

(ब) **'महानंदिसुत'** (महानंदिसुतो राजन् ! : (भाग.), (नंदज्जातो : (भविष्य.)

२) **शूद्रायां ।** (मत्स्य./वायु.) : [ 'शूद्रायाः' (ब्रह्मांड.)]

''शूद्रा (शूद्री) गर्भोद्भव । '' .. '' .. गर्भसमुद्भव ॥ '' ( असा उल्लेख मत्स्य., वायु., ब्रह्मांड. मध्ये नाही.), हे उल्लेख - : शूद्रायां/ शूद्रायाः । यांऐवजी, विष्णु.-भाग.-भविष्य. मध्ये नमूद आहेत. तरीही मूळ अर्थास हानी पोहोचत नाही. परंतु **'द्व्यर्थी' भाव निर्माण होऊन अभ्यासक भिन्न दिशेने जाण्यास कारण/ निमित्त प्राप्त होते !**

३.) **'कलिकांशजः**।'(**'काल-संवृत्तः'** (वायु./ब्रह्मांड.): **'कलिकांशजः**व / वा **'कालसंवृत्त:'**हे दोन्ही शब्द **'कालकनिष्ठ'** त्या **'विष्णु-भाग-भविष्य' यांनी पूर्णतः टाळलेले आहेत. हे चिंत्य ठरते !**

त्या ऐवजी (?) :-

१. (विष्णु) : **'अतिलुब्धो'/'अतिलुब्धोऽतिबलो'** आणि-

२. (भाग) : **'बली'** - हे शब्द योजितात. आणि त्यामुळेच 'महापद्माच्या' कुलोत्पत्तीचा प्राणच ती हिरावून घेतात व त्यास 'शूद्रत्वाच्या'/हीनकुलोत्पत्ति - निर्देशक, त्याच्या मातेच्या वर्ण- जातीकडे निर्देश प्राप्त होतो, असे 'अभ्यासक' मानून राहण्यास फार मोठा हातभार लागून राहिला आहे.

**:(पाठ - कालिकांशजः । कलिकांजयः । कलिकांशकः । कालिकांशतः । कालिकाभुजः । इ.)**

४) **'महापद्मः।'** (महापद्म नंदः (विष्णु.) । महापद्मनामा नंदः । (विष्णु. / हिंदी) । प्रनंद / नंदज्जातः (भविष्य.) ।

: 'महापद्मपतीः कश्चिन्नंदः ।' (भाग.)

**:'नंद' असा उल्लेख 'मत्स्य-वायु-ब्रह्मांड'. मध्ये नाही हेही चिंत्य आहे.**

५) **१.'सर्व क्षत्रांतको नृपः '।** : (मत्स्य.)

२. 'सर्व क्षत्रांतरे नृपः । : (वायु.)

३. 'सर्वक्षत्रांतकृन्नृपः। : (ब्रह्मांड.)

४. 'अखिल क्षत्रांतकारी' ! : (विष्णु.) : 'परशुराम इवा परो!' (...इवापारा ।)

५. 'क्षत्रविनाशकृत् ततो नृपः ।' : (भाग.)

: (यात 'सर्व/अखिल' हे शब्द नाहीत.).

६) **'राजानो'** । :(मत्स्य-वायु-ब्रह्मांड) : त्याऐवजी-

(: 'भूमिपालाः' ।: (विष्णु) : नृपाः । :(भाग.) ),

७) **'शूद्रयोनयः'** । :(मत्स्य-वायु-ब्रह्मांड.) त्याऐवजी -

(१.'शूद्राभूमिपालाः । शूद्राभूमिपाः । शूद्राभूपाला : । शूद्रभूपाला : ।

शूद्रो भूपाला : । शूद्राभिपाला : । शूद्राभूमिजाताः । : (विष्णु.)
२. शूद्रयानयः । : (मत्स्य.)
३. शूद्रप्रायास्त्वधार्मिकाः । : (भाग.)
**★८) 'एकक्षत्र' । :(मत्स्य/वायु.) : (५ प्रतींत उपलब्ध).**
**(पाठः** १ एकछत्रः । २. एकच्छत्र : । ३ एकत्र : । ४. " स एकच्छत्रांपृथिवी-मनुल्लंघितशासनः ।". : (भाग.) ५. 'स **चैतकच्छत्रामनुलंघित** शासनो ।' : (विष्णु.)
१०) 'अष्टाशीति ।' (८८ वर्षे) : (मत्स्य. / ब्रह्मांड.). **पाठ :**'अष्टाविंशति !' (२८ वर्षे) : (वायु.).
:(हा उल्लेख -'विष्णु-भाग-भविष्य. मध्ये नाही.).
११) (अ) 'पृथिव्यां च भविष्यति ।' (स महापद्मो) -:(मत्स्य.)
१.'पृथिवीं पालयिष्यति ।' : (वायु./ब्रह्मांड.)
२. 'पृथिवीं भोक्ष्यति ।' : (विष्णु.)
३. 'पृथिवीं' शासिष्यति ।' : (भाग.)
(ब)'पृथिवीं' द्वितीय इव भार्गव : ॥ (शासिष्यति) ॥ : (भाग.) -
(हा उल्लेख फक्त, 'भाग.' च करते.)
१२) **'सर्व क्षत्रमथोत्साद्य** ।' **('मथो'** ।**(मथाः** उत्साद्य ।)? : (मत्स्य.)
**'सर्वक्षत्र'** हरोद्धृत्य । : ('हरो' । (हराः उद्धृत्य । ?) : (वायु.)
**:(पाठ : 'सर्वक्षत्र 'मथोत्पाट्य** ।' - (मत्स्य.)
**:'सर्वक्षेत्रहृतोद्धेत्य ।' (वायु.)**
**:'सर्वक्षत्रं समुद्धृत्य ।' (ब्रह्मांड.)**
**१३. भाविनाऽर्थेनचोदित : ।'**
(अ) १. भाविनोर्थेच नोदितः । २. भाविनार्थे ननोदितः ।
३. भाविनोर्थेच नोदितः । ४. भवितार्थेन नोद्दीत । ५. भवितार्थेन चोदितः ।
६. (उल्लेखहीन दोन प्रती उपलब्ध) । (मत्स्य.)
(ब) १. भावितोर्थस्य महाबलात् । २. भाविनोर्थस्य वै बलात् । ३. भाविनोर्थ महाबलात् । ४. भाविनोअर्थान्महाबलात् । ५. भाविनाऽर्थस्य वै बलात् । (वायु.)
(क) १. भाविनोऽर्थस्य वै बलात्):(ब्रह्मांड.)
(ड) हा संपूर्ण उल्लेख 'विष्णु-भाग-भविष्य.' मध्ये नाही.)
१४) **'सुकल्प'** आदि ८ **पुत्र तेच नृप** । ('महापद्म'चे):
(अ) **(पाठः** १ सहस्र । सहल्याद्यः । संहस्वत स । स्वात्स्तत । इ. विविध. :(वायु.)
२. सुमाल्य । (मत्स्य./भाग./विष्णु.)
३. (ब्रह्मांड.मध्ये नामोल्लेखच नाही.)
४. सुकल्प । सुकुल्य । सुलुल । कुशल । सतुल्य वै । : (मत्स्य.)

(ब) १.'नृपाः, ऐवजी : 'राजानः।'

**(क) फक्त 'भविष्य.' मध्ये आठही पुत्रांची नांवे दिली आहेत. त्यांत वरीलपैकी एकही नांव नाही.**

**१५) 'क्रमात्' : (मत्स्य-वायु-ब्रह्मांड.)**

(अ) 'महापद्मस्य पर्यायि नृपाः । (मत्स्य., वायु., ब्रह्मांड.)

(ब) 'महापद्मस्य अनु । अवनीपतयो - भविष्यंति ।'': (विष्णु.)

(क) (भाग. मध्ये उल्लेख नाही.)

(ड) **'प्रपन्नान्'** : असा एक स्वतंत्र वेगळाच शब्द फक्त 'भाग.' मध्ये नमूद आहे; ●'क्रमात्' ऐवजी. (?)

१६) **'उद्धरिष्यति'** : (मत्स्य.-वायु-ब्रह्मांड-भाग.) :

'समुद्धरिष्यति': :(विष्णु.फक्त).

१७)**'सुतान्'** । : (मत्स्य.)

...['तान् सर्वान '। : (वायु./ब्रह्मांड.)

':नवैव तान् नंदान्'। : (विंष्णु.)

:'नव नंदान् ।' : (भाग.)]

१८) **कौटिल्यः** । :(मत्स्य.):(नंदेंदुः । नरेंद्रः । नंदेंद्रः। )

१. 'कौटिल्यो वै **द्विरष्टभिः'** । (**पाठः** 'महाबलः):( वायु.)

२. 'कौटिल्यो वै **द्विजर्षभं :** । ' : (**ब्रह्मांड.**)

३. 'कौटिल्यो **ब्राह्मणः** ।':(विष्णु.).

४.'कश्चित् **द्विजः'** ।('कौटिल्य' या शब्दाचा उल्लेखच नाही.). (भाग.)

५. **'ब्राह्मण' वा द्विज' असा मुळीच उल्लेख नाही.'** : (मत्स्य./वायु.).

१९) (अ) १. भुक्त्वा महीं वर्षशतं ततो **मौर्यान्** गमिष्यति । : (मत्स्य.)

२. भुक्त्वा महीं वर्षशतं **'नंदेंदु'** स भविष्यति । : (वायु.)

३. भुक्त्वा महीं वर्षशतं **'नरेंद्रः'** स भविषयति ।: (ब्रह्मांड.)

(ब)१. तेषामभावे पृथिवीं मौर्याश्च भोक्ष्यंति : (विष्णु.)

२. तेषामभावे जगतीं मौर्या वै कलौ भोक्ष्यंति । : (भाग.)

(क) [ **पाठः** नंदेंद्रः । नंदनः । नंदेंधः । नंदेंद्रः । नंदेंथा । देवेंद्रः। ) : (वायु.)

२०) १. 'शतधन्वा च भविता तस्य पुत्रस्तु षट्समाः ।' - (मत्स्य.)

('शतधन्वा मौर्य' हा (चंद्रगुप्त); कौटिल्याचाच पुत्र की कसे ? )

२ व ३ .'' चंद्रगुप्तं नृपं राज्ये कौटिल्यः स्थापयिष्यति ।'' : (ब्रह्मांड./वायु.)

४.''चंद्रगुप्तमुत्पन्नं (व्युत्पन्नं-?) कौटिल्य एव राज्येऽभिषेक्ष्यति ।'' : (विष्णु.)

५. 'चंद्रगुप्तं स एव वै द्विजो राज्येभिषेक्ष्यति ।' : (भाग.)

**४.'पुराण- श्लोकार्थविवेचन':** (सर्व विवेचन पुराणांधारित आहे.) :

-'महापद्म' विषयी सहा पुराणांत जे काही म्हटले आहे ते क्रमशः पाहावयाचे आहे. पुराणांचा क्रम पुढीलप्रमाणे कालक्रमाने (ज्येष्ठ व कनिष्ठ/प्राचीन व नंतरची) घेतला आहे: -

(अ)१.मत्स्य., २. वायु., ३. ब्रह्मांड.: (कालज्येष्ठपुराणे.).

(ब)४. विष्णु., ५. भाग., ६ भविष्य. - (कालकनिष्ठपुराणे).

(१) **'शिशुनाक'** - राजे **क्षत्रिय** होते; त्यांना पुराणांनी **'क्षत्रबंधवः'** 'क्षत्रबांधव'; अर्थात **'क्षत्र (क्षत्रिय) बंधू'** म्हणजेच **'क्षत्रिय'** असे म्हटले आहे. "**शिशुनाका** भविष्यंति राजानः क्षत्त्र **बांधवः** ॥"

:(मत्स्य.- २७२.१३) : (वायु.९९.३२१).

-**'शिशुनागाः।'** :

(ब्रह्मांड.२.३.७४.१३५).

-हे उल्लेख 'विष्णु. -भाग.- भविष्य.' नी टाळले आहेत. ते कां ?

(२) शिशुनाक-वंशातच **'महानंदिन्'** हा **'क्षत्रिय'** नृपती होता; व त्याचाच पुत्र **'महापद्म'** हा **'नृप'** ही होता.

"**महानंदिसुतश्चापि....** । उत्पत्स्यते **महापद्म सर्वक्षत्रांतरे नृपः** ।"

:(वायु.)

:'महापद्म' हा 'महानंदीचाच' पुत्र होता; या उलट तो इतर कुणाचा पुत्र होता, असा उल्लेख पहिल्या तिन्ही पुराणांत नाही.

(३)" महानंदिसुतश्चापि **शूद्रायां/ (शूद्रायाः) कलिकांशजः। (कालसंवृत्तः)** । उत्पत्स्यते महापद्मः **सर्व क्षत्रांतरे / (सर्व क्षत्रांतको / सर्व क्षत्रान्तकृत्) नृपः** ॥"

: (मत्स्य.-वायु.-ब्रह्मांड.)

**याचा अर्थः** "महानंदीचा पुत्र महापद्म हा सुद्धा सर्व क्षत्रियांमध्ये 'नृप' जन्मास येईल; (म्हणजेच तोही क्षत्रियच असेल).तसेच तो **'कलिका'** (चंद्रकला) व **'अंश'** यांचा अंशभूत तथा तो **'काल' (कालदेवता)** व **'वरुण'-देवता (संवृत्तः)** यांचे एकात्मरूप **'कालवरुण'/'वरुण'** च असेल; **'सर्व क्षत्रियरूप कालदेवता'** अर्थात **'वरुण'** असेल.-

: (अंतक=अंतकृत्= यम=काल=धर्मराज=दंडराज इ.)

(४) यांतील **'शूद्रायां'** म्हणजे **'शूद्रेत'/'शूद्रेवर'** (सप्तमी: ए. व.) असा अर्थ होतो; आणि याचा संबंध त्यापुढील शब्दांशी म्हणजेच **'काल-वरुण-चंद्र-अंश'** या चारी **आदित्यांशी** आहे.

**:'शूद्रायाः'** म्हणते **'शूद्रेचा/शूद्रेचे'** ।

: हे जे चार **'आदित्य'**, ते **'अदिती'** चे पुत्र आहेत. **' अदिती'** हीच **"पृथ्वी'** ही आहे; आणि **'पृथ्वी'** ही **सर्वांची माता असून** 'शूद्रा' ही आहे. **'पृथ्वी'** हीच **'शूद्रा'** होय. कारण ती सर्वांचे भरण पोषण करते.- महत्त्वाचे म्हणजे असे, की

**हे आठ आदित्य, 'क्षत्र' (क्षत्रिय)** असे परमात्म्याने निर्माण केले, ते 'क्षतृ' म्हणजे ब्रह्मा,- परमात्मा, त्याच्या 'आंतरी' हृद्गर्भी उत्पन्न झाले, म्हणून ते -'क्षतृ + आंतरे' (क्षत्रांतरे) निर्माण झाले. आणि:- महापद्म हा राजा 'परमात्मरूप (=सर्व) क्षत्र (आदित्यदेव) यांच्या अंतरीं (मानसीं/हृदयीं/अंशभूत/मात्रांशे) उत्पन्न झाला.तसे तर प्रत्येक प्राचीन भारतीय राजा हा क्षत्रियच असे, आणि तो परमात्म्याचा अंश असतो, तसेच तो सर्व आदित्यांच्या अंशांपासून जन्मतो व या साऱ्यांची म्हणजेच पृथ्वीची, परमात्म्याची, आदित्यांची जीवसृष्टीविषयीची, राज्यरक्षणाविषयींची व प्रजापालन, पोषणाविषयींची कर्तव्ये समदर्शी दृष्टी व भावनेने, नि:स्वार्थपणे व कर्तव्य कठोरतेने पार पाडतो व प्रसंगी शिक्षाही करतो. हीच कल्पना पहिल्या तिन्ही पुराणांच्या पहिल्या-पहिल्या दोन ओळींत ठासून सूत्ररूपाने भरलेली आहे.

-"राजैव कर्ता भूतानां राजैव च **'विनाशक:'** ।
**धर्मात्मा** य: स कर्ता स्याद्धर्मात्मा विनाशक: ॥"

: (म. भा. शां. ९१. ९)

- ("राजा हाच धर्मातमा आहे व तोच प्राणिमात्रांचा **'रक्षक'** व **'विनाशक'** ही आहे!"). तो 'अधार्मिक बनेल तर प्रमादग्रस्त अराजक माजेल.

**५. क्रमांक (२) व (३) या उपशीर्षकांच्या आशयांची स्पष्टता –**

वरील क्रमांक (२) व (३) यांची स्पष्टता पाहणे महत्त्वाचे आहे. (वायु.)

१) यातील **'सर्व क्षत्रांतरे'** (सप्तमी ए. व.) म्हणजे सर्व क्षत्रियांमध्ये', अर्थात 'सर्व क्षत्रियांमधीलच एक,' असा अर्थ होतो **'महापद्म'** हा 'सर्व क्षत्रियांमध्ये, सर्व क्षत्रियांपैकीच एक, तेव्हा तोही क्षत्रियच-वर्णाने -जातीने-कुलवंशाने, नृप उत्पन्न होईल. गृहांतरे (घरात), वनांतरे (वनात), कुंजांतरे (कुंजात) इत्यादी प्रमाणे **'सर्व क्षत्रांतरे'** म्हणजे सर्व ' क्षत्रियांत', निर्माण होणारा **'प्रत्यक्ष क्षत्रियच'** होय.

२)**'सर्व + क्षत्र/क्षतृ + आंतरे'** असा विग्रह केल्यास संभवनीय अर्थ पुढील प्रमाणे होतात :-

(अ) सर्व = 'एकूण', अथवा 'परमात्मा' ।

(ब) क्षत्र = क्षत्रिय;

अथवा, (क) क्षतृ = ब्रह्मा;

(ड) आंतरे = मध्ये; अथवा 'हृदयात', 'मनात', आंतर्मनात. तेव्हा, : सर्व क्षत्रियांच्यामध्ये,

:सर्व क्षत्रियांच्या हृदयींच्या गाभाऱ्यात,

:परमात्मस्वरूप 'ब्रह्मा' च्या मनीं, आंतरीं,

तसेच, 'सर्व क्षत्र' म्हणजे 'एकूण क्षत्र', 'परमात्मस्वरूप' क्षत्र! म्हणजेच 'सर्व आदित्य', अदितीचे पुत्र. अशांच्या अंतरीं, अर्थात अशा आदित्यांच्या पासून, आदित्यांच्या अंशांपासून उत्पन्न (असा महापद्म-नामक नृप उत्पन्न होईल.)

३.) **याविषयीची कल्पना** येथे स्पष्ट होणे जरूरीचे आहे.

(अ) **'बृहदारण्यक उपनिषद'** मध्ये म्हटले आहे : -

: (बृह. उप. १.४.४.११ ते १४).

-''ब्रह्म वा इदमग्र आसीदेकमेव तदेकं सन्न व्यभवत् ।

तच्छ्रेयो रूपमत्यसृजत 'क्षत्त्रं' यान्येतानिदेवत्रा-

**''क्षत्राणींद्रो वरुण: सोमो रुद्र: पर्जन्यो यमो मृत्युरीशान इति ''**

''तस्मात् 'क्षत्रात्परं' नास्ति तस्माद्ब्राह्मण:

क्षत्रियमधस्तादुपास्ते राजसूये 'क्षत्र' एव तद्यशो

दधाति सैषा **'क्षत्रस्य योनिर्यद्ब्रह्म ।'** - ''

-'' तस्माद्यद्यपि राजा परमतां गच्छति ब्रह्मैवान्तत

उपनिश्रयति **स्वां योनिं** य उ एनं हिनस्ति स्वां स

**योनिमृच्छति** स पापयान् भवति यथा श्रेयां सं हिंसित्वा ॥ ''११॥

-''स नैव व्यभवत् स विशमसृजत यान्येतानि देवजातानि

गणश आख्यायन्ते वयवो रुद्रा आदित्या विश्वेदेवा मरुत इति ॥ १२ ॥

- ''स नैव व्यभवत् स **'शौद्रं'** वर्णमसृजत **'पूषणमियं'** वै

**'पूषेयं हीदं सर्वं पुष्यति यदिदं किंच ॥ १३ ॥**

-'' स नैव व्यभक्तच्छ्रेयोरूपमत्यसृजत धर्मं तत्

क्षत्रस्य क्षत्रं सद्धर्मस्तस्माद्धर्मात्परं नास्ति ॥'' १४ ॥

[ **भावार्थ** : ''प्रारंभी फक्त हे **'ब्रह्मच'** होते. ते एकटेच, कर्मार्थ पुरे पडेना. तेव्हा त्याने प्रशस्तरूप **'क्षत्रिय'** निर्मिले. हे **'क्षत्रिय'** म्हणजे कोण ? तर, 'देवांमध्ये प्रसिद्ध असलेले क्षत्रिय !' त्यांची नांवे अशी आहेत:-

१. इंद्र, २. **वरुण**, ३. सोम **(चंद्र)**, ४ रुद्र, ५. पर्जन्य, ६. यम **(काल)**, ७. मृत्यू, आणि ८. ईशान.

: म्हणून 'क्षत्रियांहून श्रेष्ठ कोणी नाही !'...

: क्षत्रियच ते 'ब्रह्माचे यश' स्थापित करतो.

:''क्षत्रियाचे **'उत्पत्तिकारण'** (=**'योनि'**=उत्पत्तिकारण !) हे **'ब्रह्म'** होय. :('उत्पत्तिस्थान' - नव्हे! )

- ''पुढे 'ब्रह्मा' ने 'वैश्य' निर्मिले. ते म्हणजे, जे हे देवजातिभेद **'गणरूपाने'** सांगितले जातात ते -

१. वसू, २. रुद्र, ३ आदित्य,४. **विश्वेदेव**, आणि ५. मरुत् । हे होत. ''

- ''तरी ते ब्रह्म ('सर्व'), कर्म करण्यास समर्थ झाले नाही. म्हणून त्याने **'पूषन्'/ पूषा'**- नामक 'शूद्र' निर्माण केला.

-'' आणि, तो **'पूषन'/'पूषा'** म्हणजे, ही **'पृथिवी'** होय. कारण हीच हे जे म्हणून काही आहे त्याचे पुष्टिसंवर्धन भरण-पोषण, पालनपोषण, रक्षण-अभिसंवर्धन

करते;'' **(म्हणून 'पृथ्वी' ही शूद्रा आहे.).**

-''तरी ते सर्व कर्म करण्यास समर्थ झाले नाही; म्हणून त्याने **'श्रेयोरूप धर्म'** निर्माण केला.

: हा. धर्म, 'क्षत्रियांचाही नियंता' आहे; तो क्षत्रियांमधील सर्वश्रेष्ठ क्षत्रियच ('क्षत्रस्य क्षत्रं सद्धर्मः।') आहे; म्हणून 'धर्माहून अधिक श्रेष्ठ' काही नाही.

: ('या **'धर्माचे'** योगाने बलहीन हाही, बलवंतालादेखील जिंकण्याची आशा करतो.'')

: आणि हा **'धर्म'** म्हणजेच **'सत्य'** होय. ('स धर्मः सत्यं वै !'))

४) **'' हृदयं वै सम्राट्''** । : (सार्थ उपनिषत्संग्रह : ह.र. भागवत. (१९१४). पृ. ५४८ ते ५५१.

''हृदयमेवायतनमाकाशः प्रतिष्ठास्थितिरित्येनदुपासीत ।''

''हृदयं वै ब्रह्मेति ।''**हृदयं वै सम्राट्** । सर्वेषां भूतानामायतनं, हृदयं वै सम्राट् । सर्वेषां भूतानां प्रतिष्ठा । हृदये ह्येव सम्राट् । सर्वाणि भूतानि प्रतिष्ठितानि भवन्ति । हृदयं वै सम्राट् परमं ब्रह्म । '' नैनं हृदयं जहाति सर्वाण्येनं भूतान्यभिरक्षन्ति देवो भूत्वा देवानप्येति । ''

[**भावार्थ** : '' हृदय हे आयतन, आकाश ही प्रतिष्ठा ! स्थिती ! या रूपाने या ब्रह्माची उपासना करावी.

: हृदय हीच स्थितता, तेच सर्व भूतांचे आयतन ! सर्व भूतांची प्रतिष्ठाही तेच. हृदयातच सर्व भूते प्रतिष्ठित आहेत. हृदयच परमब्रह्म. या जाणिवेतून उपासना करणाऱ्यास हृदय सोडीत नाही. सर्व भूते त्याच्यावर वर्षाव करतात, आणि तो देव होऊन देवांप्रत जातो.'']

५) **चंद्रमाः आदित्यज्योती :**

-''किं ज्योतिरयं पुरुषः? इति आदित्यज्योतिः ॥'' जनक म्हणाले, (''या पुरुषाची व्यवहाराला साधन अशी ज्योती म्हणजे 'आदित्य' होय. या 'आदित्य ज्योतीचे योगाने मनुष्य बसतो, गमन करतो, काम करतो, परत येतो.'')

: आदित्यास्तोचरान्त, या पुरुषाची ज्योती **'चंद्रमा'** होय.

(''चंद्रमा एवास्य ज्योतिर्भवतीति अस्तमित आदित्ये ।'')

- हा मनुष्य **'चंद्ररूपी ज्योतीचे** योगाने बसतो, गमन करतो, काम करतो, परत येतो. [ (एकादशोपनिषत्संग्रह : सत्यानंद : सं. २०३२ : नवी दिल्ली.)

: (बृहदारण्यकोपनिषद्भाष्यार्थ : वि.वा.बापट, आ. २, श.१८४७.)

:(उपनिषद्भाष्यार्थ : (मराठी) : पां.शा. आठवले)]

६) **''इयं भूमि...योनि...।''**

''इयं **भूमिर्हि** भूतानां शाश्वती **योनिरुच्यते** ।

न च योनिगुणान्कांश्चिद्बीजं **पुष्यति पुष्टिषु** ॥'' : (मनु. ९.३७).

- (''ही 'भूमी' (=**पृथ्वी**) म्हणजे सर्व प्राणिमात्रांची जननी - उत्पादक शाश्वत अशी **'योनी'** आहे; परंतु या **योनीत** इतर बीज नसलेले पदार्थ वाढत नाहीत.'')

**७) 'अति लुब्ध, अतिबल' :**

१) विष्णु पुराणात,**'महापद्म हा अति लुब्ध, अति बल'** असा होता असे म्हटले आहे; आणि भागवत पुराणात त्यास **'बली'** म्हटले आहे. यावरून **'अतिबल'** वा **'बली'** म्हणजे 'अत्यंत **सामर्थ्यसंपन्न'** हा **अर्थ** स्पष्ट होतो. **'बल'** म्हणजे **'सैन्य'** ! या आधारे तो **अद्वितीय 'सेनाधीश', सेनाध्यक्ष, सम्राट सैनिकी सामर्थ्याने प्रभावशाली होता**, हे स्पष्ट होते.

२) 'अति लुब्ध ' मधील 'लुब्ध' चा अर्थ,'लोभी' असा अभ्यासकांद्वारा सहजपणे स्वीकारला गेला आहे.

:परंतु तो 'लुब्ध' कशाचा, कशाविषयी, कोणावर लुब्ध याचा उलगडा करणारा शब्द 'विष्णु.' ने दिलेला नाही, तेव्हा 'लोभी' हा अर्थ स्वीकारणे सोयीचे वाटले तरी सुसंगत नाही.

३) 'लुब्ध' चा अर्थ 'charmed' असा शब्दकोशांत आहे. आणि यातील charming चे कोशदत्त **अर्थ -**

४) (1. attractiveness : आकर्षकता, विलोभनीयता, मनाला मोहविण्याचे सामर्थ्य, 2.magic power : जादूचे सामर्थ्य, वशीकरणात्मक सामर्थ्य).

५)' to charm ' = to attract; आकर्षिणे, आकर्षित करणे, जादूने भारणे! charming : (विशेषण), charmingly (क्रि.वि.)

- यांच्याविषयी विचार करावा लागतो.

६) महापद्म हा 'अतिलुब्ध' होता; म्हणजेच तो अतिशय आकर्षक, विलोभनीय अशा उक्ती-कृती-दर्शन व आचरणाचा-व्यक्तिमत्त्वाचा होता; मनाला मोहवून टाकण्याचे सामर्थ्य त्याच्या ठायीं होते; तो 'वशीकरण=मंत्रमुग्ध करणे' यांच्या सामर्थ्याने संपन्न होता; हे कळून येते.

७) ही,क्र. ४ मध्ये असलेली सर्व वैशिष्ट्ये मदनाची-'अनंग' -तरीही अंगभूत-गुणसंपन्न लक्षणे आहेत. (!) मदन-कंदर्प-हा मदोत्कट, मदयुक्त, 'दर्पसंपन्न', मानसंपन्न, अजेय-अजिंक्य असा सर्वश्रेष्ठ **धनुर्धरही** आहे, **'श्रेष्ठ बली'** आहे.

८) 'राजा' हा 'मदनाजसा'च नव्हे तर तो 'मदनही' आहे असे विपुल उल्लेख भारतीय साहित्यात मिळतात. **'क्षत्रियदर्पमानमदन !'**इ.(सातवाहन-लेख).

९. म्हणजेच 'महापद्म' (नंद) हा, मदनाच्या चरित्राचा-चारित्र्याचाही होता.

**७. 'शूद्रयोनयः'** :(मत्स्य-वायु-ब्रह्मांड.)

१) '' ततःप्रभृति राजानो भविष्या : **शूद्रयोनय :** ॥'' (तिन्ही पुराणांत).

-'तेथपासून पुढील राजे **'शूद्रयोनि'** असतील !'

: याचे दोन अर्थ होतात -

१. पुढे होणाऱ्या राजांच्या **माता 'शूद्रा'** असतील.

२. पुढे होणारे राजे स्वतः **'शूद्र'** असतील की जे त्यांच्या पुढील राजांचे **उत्पत्ति-कारण** असतील.

२) **'शूद्रा' म्हणजे 'पृथ्वी'**, आणि, सर्व क्षत्रिय आदित्य हे या 'शूद्रा' पृथ्वीचे पुत्र आहेत; व 'राजा' ('क्षत्रिय राजा') हा'शूद्रा' पृथ्वीपुत्र असणाऱ्या **'क्षत्रिय आदित्यां'** च्या अंशांपासून उत्पन्न होत असतोच असतो- शिवाय,

३) तो स्वतःही 'शूद्रा' पृथ्वीचा, जसा 'पुत्र' असतो-

४) तसाच तो या 'शूद्रा'-पृथ्वीचा 'पती', स्वामी, अधिपतीही असतो, उपभोक्ताही असतो. हे सर्व ध्यानात घेता-

५) तो स्वतःही 'शूद्रा' पृथ्वीचे, 'शूद्र' पूषन्चे; **'पूषा'** म्हणजे 'पोषण' करणे, हे व्रत आचरीत असल्याने; तो एकप्रकारें 'शूद्र'च असतो ! प्रत्येक राजा हा या अनुसार 'शूद्र'च ठरतो !

६) पृथ्वी ही 'शूद्रा' आहे, व तिचा पुत्र जो 'पृथ्वी-पुत्र', तोही 'शूद्र' ! प्रत्येक मानव, प्राणी 'शूद्र'! - **'शूद्रयोनी'** ठरतो !

७) पृथ्वी-पति राजा, पृथ्वी-पुत्रही राजा; आणि पृथ्वीचे प्रजापोषणाचे व्रत, धर्माचरण जे 'शूद्रा-कर्तव्य' ते आचरणारा प्रजापालक राजा; ह्या तिन्ही अंगांनी राजा हा 'शूद्र'च ठरतो. शिवाय त्याचे चौथे जे अंग की, 'शूद्रा' म्हणजेच पालनपोषण करणारी माता, तिचे जे मातृकर्तव्य-अपत्यांचे पालनपोषण करणे, तेच कर्तव्य व धर्म म्हणून यथोचितपणें पार पाडणारा राजा या 'शूद्रत्वा' चे निमित्त, मूलाधार, आश्रयस्थान, आधारस्थान असतो; म्हणूनही तो 'शूद्रयोनि' होय. या शब्दाचा क्षत्रिय राजांच्या जन्म देणाऱ्या मानवी मातेशी काडीचाही संबंध-'शूद्र ! वर्ण-वंश-जाती-कुलाचे दृष्टीने नाही!'हे स्पष्ट व्हावे!

**८) शूद्रयोनयः ।**

-"पुढील राजे 'शूद्रयोनि' असतील म्हणजेच ते, शूद्रत्वाचे आश्रयस्थान असतील- ते राजे -

१. "मूर्धाभिषिक्तस्य प्रजानां परिपालनम् । " चे मूर्तिमंत प्रतीक असतील. : (भविष्य पु.)

२. "एषा **धर्मस्य वो योनिः** ('धर्मयोनिः') समासेन प्रकीर्तिता॥"

:(मनु. २-२५)

=("आतापर्यंत मी 'धर्म जाणण्याचे साधन' / 'धर्माचे मूलाश्रयस्थान' संक्षेपाने सांगितले !")

३. प्रजापालनचे आश्रयस्थान **'धर्म'** होय ! या **धर्माचे आश्रयस्थान** ('धर्मयोनि'/'शूद्रयोनि') किंबहुना 'धर्म' म्हणजे 'राजाच' होय! आणि, राजा हाच सर्वंकष 'धर्माधिराज!' 'धर्मप्रतिपालक' ! धर्ममूर्ती! 'धर्मो राजकृतश्चयः ।'

(याज्ञवल्क्य. २.१८६)

४. **'शूद्रयोनय:'।**

१) 'योनि' म्हणजे 'कारण':, (गीता.५.२२; मनु.९.३२१)
Source, origin, fountain, Spring.

२) निमित्त; आदिकारण, प्रकृति.: (म.भा.१२.३०४.४).

- "कलापंचदशी **योनिस्तद्धाम** प्रतिबुद्धयते ।"

३) 'जाणण्याचे साधन.'

(मनु.२.२५)

४) आधारस्थान :

८. **'शूद्रयानया:'।**

१) 'शूद्रयोनय:'चा पाठभेद आहे - 'शूद्रया नय: ।'

२) 'शूद्रया:नय: ।' व 'शूद्रायाः नय: ।' यांतून 'शूद्रयोनय:।' ने निर्माण केलेले सर्व अनर्थ नष्ट होतात !

३) 'नय' म्हणजे राजनीती वा राजनीतिज्ञ ! राजकर्तव्य किंवा राजकर्तव्ये पार पाडणारा ! अर्थात -

४) 'शूद्रा' म्हणजे पृथ्वी । तिचीच सर्व प्रजाजनांविषयी; त्यांना आपल्या अपत्यवत् मानून त्यांचे भरणपोषण, पालनपोषण, अभिरक्षण, हितरक्षण- संवर्धन, कल्याण इ, सर्व काही उत्तम प्रकारे संगोपित करण्याचे राजकर्तव्य यथायोग्यपणे, अव्याहतपणे पार पाडणारा, राजकर्तव्यदक्ष वा प्रजाहितपरायण राजा होय !

५) तेव्हा, "तत: प्रभृति राजानो भविष्या: शूद्रयानया: ।" असे जेव्हा पुराण म्हणते, तेव्हा त्यात, त्या कुठल्याही राजाच्या मातेच्या शूद्र-वर्ण-जाती वा कुलसंबंधाचा उल्लेख केला जाण्याचे कारण उद्भवतेच कोठे !

६) हा **'यो'** की **'या'** -? अधिक समर्पक कोण ? सुज्ञजन निर्णय करू शकतात.त्यातूनही संभ्रम राहिलाच तर ?

७) यांपैकी कोणताही एक **'पाठ'** स्वीकारला, किंवा दोन्हीही पाठ स्वीकारले तरी, अर्थ एकच राहतो; आणि या शब्दांतून 'शूद्रवर्ण-वंश जातीचा' संबंध राजांच्या जन्मदात्या मातेशी मुळीच जोडला जात नाही, हे स्पष्ट आहे.

९. **'शूद्राभूमिपाला'**: (=शूद्रा भूमी(पृथ्वी) चे पाल असे राजे!) : (विष्णु.)

१) 'विष्णुपुराणा' ने म्हटलेय-

"शूद्राभूमिपाला भविष्यंति ।"

२) विष्णु. व भाग. ही दोन्ही पुराणे बऱ्याच शब्दांच्या बाबतीत (महामद्म-संबंधित तपशिलात) **'द्व्यर्थी'** आहेत, हे जाणून घेता यायला हवे ! त्या भूमिकेतून वरील शब्दांचा अर्थ निश्चित करताना अडचण उरत नाही.

३) 'शूद्रा' अशी 'पृथ्वी' /'शूद्रा' हीच 'पृथ्वी' ! आणि 'शूद्रा' अशा भूमीचा

(पृथ्वीचा) पालक/पाल/पती/पा-म्हणजेही राजा(क्षत्रिय राजा)च होय.

: शूद्राभूमि + पाल =शूद्राभूमिपाल.

४) उपलब्ध पाठभेद पुढीलप्रमाणे आहेत -

१. शूद्राभूमिपा : । शूद्रा (पृथ्वी) भूमि + पाः ।

२. शूद्राभूपालाः । शूद्रा (पृथ्वी) भू+पालाः ।

३. शूद्राभूपालाः । शूद्र (पृथ्वी) भू+ पालाः ।

४. शूद्राभिपाला : । शूद्रा (पृथ्वी) + अभिपाला :।

: (Protector,संरक्षक)

५. शूद्राभूमिजाताः । शूद्रा (पृथ्वी) भूमि+जाताः ।

५) यास 'पर्यायी' शब्द 'भाग.' ने योजिला आहे, **'शूद्रप्रायास्त्व'** म्हणजेच 'भाग.' कार या महापद्मोत्तर राजांना 'शूद्र' म्हणत नाही, तर त्यांना **'शूद्रप्राय अधार्मिक'** म्हणतोय. ती सोय आहे,'अधार्मिक' या शब्दाची आणि **'धार्मिकते'**च्या संरक्षणाची !

५) 'भविष्य पु.'मध्ये 'याविषयी' काहीही उल्लेख नाही; हेही लक्षणीय आहे.

**१०. राजे 'शूद्र' नव्हे, तर –कलियुगाच्या अंतापर्यंतचे राजे 'क्षत्रियच' होतील !** :(पुराण-वचने !)

१) '**शिशुनाका** भविष्यंति राजानः **क्षत्रबंधवः** ' ॥ (मत्स्य. २७२ - १२)

''एतैःसार्धं भविष्यंति **यावत्कलि नृपाः** परे ।

तुल्यकालं भविष्यंति सर्वे ह्येते **'महीक्षितः** ॥ १३ ॥''

= (''असे ते सर्व मिळून शिशुनाक वंशस्थ द्वादश **'क्षत्रिय' राजे,** ३६० वर्षे राज्य करतील. असेच त्या **'शिशुनाक राजा' सारखेच 'कलियुगाच्या समाप्तीपर्यंत'** पुढील अन्य ('क्षत्रिय राजे'= 'क्षत्रबंधव :'/'महीक्षित:'।) होतील. आणि सर्वांच्या राज्यकाली सुखदुःख एकसारखेच असेल.'' (१२ व १३).

२) ''**शैशुनाका** भविष्यंति राजानः 'क्षत्रबांधवाः' ।

एतैः सार्धं भविष्यंति **तावत्कालं** नृपाः परे ॥ ' (वायु. ९९.३२२)

.... तुल्यकालं भविष्यंति सर्व एव **'महीक्षितः ।'** ॥ ३२५ ॥

... उत्पत्स्यते महापद्मः **'सर्व क्षत्रांतरे** नृप : ॥'' (३२६) ॥

३) ''**शिशुनागा** दशैवैते राजानः **'क्षत्रबंधवः '।**

एतैः सार्द्धं भविष्यंति **तावत्कालं** नृपाः परे ॥ (बृह्मांड. १३५)

तुल्यकालं भविष्यंति सर्व एव**'महीक्षितः'** ॥ १३८ ॥

४) वरीलप्रमाणे तिन्ही पुराणांत नमूद आहे ते असे की - 'शिशुनाक' राजे हे **क्षत्रिय** होते आणि त्यांच्याप्रमाणे असणारे 'क्षत्रिय राजे' **कलियुगाच्या अंतापर्यंतचे** होतील. : **'क्षत्रबंधु'** आणि **'महीक्षितः' म्हणजेही 'क्षत्रिय राजे'** हेच येथे स्पष्ट

आहे. आणि म्हणूनच -

५) "ततः प्रभृति राजानो भविष्याः **शूद्रयोनयः ।**" यातील 'शूद्रयोनयः।' किंवा 'शूद्रयानयः ।' यातही 'शूद्रमातेपोटी जन्मणारे' असा कुठलाही शूद्रेपासूनच्या राजांच्या उत्पत्तीचा मुळीच संबंध नाही, हे स्पष्ट व्हावे !

६) 'भाग.'सुद्धा पुढील राजांना '**शूद्रयोनयः**' वगैरे काहीही न म्हणता '**शूद्रपायास्त्वधार्मिकः**' असे म्हणतेय. आणि हा सर्व विचार दुर्लक्षून विपरीत अर्थांचा पुरस्कार करण्यातील व्यर्थता ध्यानात येण्यास अडचणही राहत नाही. 'शूद्रप्राया'मध्ये 'राजांचे जन्मजात वा परंपरासिद्ध क्षत्रियत्व नाकारलेले नसून धर्मपालनातील कुचराई वा उणिवांचा तेथे संबंध आहे !

**११. भार्गवः।('द्वितीय भार्गव इव ।'):**

(फक्त 'भाग.पु.'):

१) "स एकच्छत्रां पृथिवीमनुल्लंघितशासनः ।
महापद्मो शासिष्यति '**द्वितीय इव भार्गव : ।**'
(भाग.)

२) हा '**भार्गव**' शब्द फक्त 'भाग.' मध्येच आला आहे; तो '**फसवा**' आहे.'दूव्यर्थी आहे.

३) '**भार्गव**' म्हणजे '**परशुराम**' हे चटकन ध्यानात येण्यास सोपे आहे आणि लगेच 'विष्णु .' प्रमाणे '**अखिलक्षत्रांतकारी**' ध्यानी येऊन समीकरण पूर्ण होते!

४) परंतु हा '**भार्गव**' नव्हे, तर येथे कुणीतरी '**द्वितीय भार्गव**' आहे; '**महापद्म**' त्याच्या जसे 'अनुल्लंघितशासन' साम्राज्य उपभोगतो म्हणजेच तो"**सार्वभौम सम्राट**" असा '**भार्गव**' आहे, 'जमदग्नीचा पुत्र **परशुराम भार्गव**' येथे नाही.

५) '**वरुण**' हाच '**भृगु**' आहे, '**भार्गव**' आहे. (प्रा. च. को. हिं. चित्राव) आणि 'वरुण' हाच 'सार्वभौम सम्राटही आहे'! 'विश्वसम्राटही' !

: वरुणाच्या आज्ञांचे उल्लंघन कोणीही करीत नाही.

६) तेव्हा हा '**वरुण**' व '**महापद्म**' नृपती एकरूप आहेत.

७) '**वरुण**' हा '**क्षत्र**' आहे. **क्षत्रिय** आहे, **पृथ्वी-पुत्र** आहे, **क्षुद्रापुत्र** आहे. तो स्वतःच '**शूद्र-योनि**' आहे; **शूद्राव्रतधर्माचरणाचे मूल कारण, आश्रयस्थान** आहे.

८) तशात असा हा '**वरुण**' **हाच** '**द्वितीय**'**भार्गव;** (प्रथम भार्गव परशुराम) होय.तो'**सार्वभौम सम्राट**','वरुण' आहे. व त्याच्याजसे 'महापद्माने' साम्राज्य उपभोगले आहे.

९) **वरुण हा** '**क्षत्ररूप अंतक,**' '**क्षत्ररूप कालदेवता**' (यमराज) आहे. प्रत्येक क्षत्रिय राजा सर्वभूतमात्रांचा '**विनाशक**' ही असतो. : (म. भा. शां. ९१.६).

१०) महापद्म हाही **'द्वितीय भार्गव'** जसा होता. म्हणजेच 'वरुण' राजाजसा होता; क्षत्रियरूप कालदेवता होता, सर्वक्षत्रियांच्या शत्रूंचा शत्रू होता; अर्थात 'क्षत्रियांचा हितकर्ता' होता; तो स्वत: क्षत्रिय वंशवर्ण कुलीन होता.

११) "**भृगुर्वे** वारुणिः **वरुणं** पितरमुपससार। अधीही भगवो ब्रह्मेति ।" : 'सैषा **भार्गवी वारुणी** विद्या ।,' (तै. उ. ३. २. ते. ३.५).

१२) असा **'वरुण'** हा पांचही पुराणांत साकार प्रत्ययास येतो आणि **'पृथ्वी'** या **'शूद्रमाते'चा पुत्र** हे त्याचेच लांछन की भूषण, हे सुनिर्णित होते !

**१२. 'परशुराम'** : ('अपरो परशुराम इव !):(विष्णु. पु. फक्त) : (अखिल क्षत्रिय + अंतक + अरी) ! अखिल क्षत्रांतकारी !

१) महापद्म राजा, 'परशुरामइवाऽपरो अखिल क्षत्रांतकारी भविता'असे विष्णु.'म्हणते. हे विधान स्पष्टतया 'द्व्यर्थी' आहे.

२) मत्स्य-वायु-ब्रह्मांड. मध्ये असणारे **'काल-वरुण-चंद्र व अंश'** हे उल्लेख वगळून येथे फक्त,**'सर्व क्षत्रांतक'** ऐवजी **'अखिल क्षत्रांतकारी'** म्हटलेय.' आणि त्या चार आदित्यांचे एकात्मरूप **'वरुण'** तेवढेच स्वीकारलेय. पण ते **'वरुण'** या शब्दात व्यक्त न करता त्यास **'परशुराम'** असे संबोधून **भारतीय पुराण इतिहास - परंपरेत सर्वांत पहिली, चाणाक्ष व खुबीदार पौराणिकाची क्लृप्ती योजून त्यास (भार्गव) 'परशुराम'** बनविले ! तोही **'दुसरा परशुराम'** ! (अपर !) तशात पुन्हा **'इव'**(जसा !).

३) जमदग्नीचा पुत्र हा एक **'परशुराम'** आणि हा येथे जो आहे तो दुसरा **'परशुराम'** ! - अर्थात **'वरुण'** !

४) **'परशु'** म्हणजे **'कोणतेही शस्त्र'** ! (फक्त कुऱ्हाड / कुठार नव्हे!)

५) **'वरुण'** हा **'धनुर्धर'** ही आहे. कारण **'प्रभुरामचंद्रा'**नेच त्यास 'धनुष्य' भेट दिले होते.

: वरुण हा **'पाशधर'** ही आहे. (**'पाश'** हे त्याचे आयुध/शस्त्र).

६) **'वरुण'** हा दिवसा **'सूर्य** आहे., **'राम'** आहे, प्रकाश/तेज आहे; आणि **'वरुण'** हाच रात्रींचा **'चंद्र'**ही आहे. तो दिवस व रात्री असा 'अहोरात्र' **कालाचा स्वामी** आहे. तो प्रत्यक्ष **कालदेवताच** आहे. तो 'दंडधर' ही आहे. **'अखिल क्षत्रियांच्या अंतकांचा शत्रू (अरी)** आहे.'

७) **'श्रीराम-चंद्र'** हाही 'राम' (सूर्य/तेज, प्रकाश) आहे. व **'चंद्र'**ही आहे. **'धनुर्धर/'परशुधर'** असा 'रामचंद्र'ही आहे!

८) अशा प्रकारे **'वरुण'** व **'श्रीराम'** हेच दुसरा **'परशु-राम'**होत. जमदग्नीचा पुत्र हा **पहिला परशुराम** ! **'अखिल क्षत्रांतकारी'** तोच **'सर्व क्षत्रियांचा विनाशकर्ता !'**

९) तेव्हा **'वरुण व श्रीरामचंद्र'** यांची एकरूपता ध्यानीं घेता **'परशुराम**

इवाऽपरो'- म्हणजे 'दुसऱ्या परशुरामाजसा' म्हणजे 'वरुणाजसा'/ 'श्रीरामांजसा' महापद्म हे स्पष्ट आहे.

१०) 'विष्णु.'ची क्लृप्ती पुढे 'भाग.' ने रंगविली. पण तेही त्या भार्गवाला उगाचच 'क्षत्रांतक' बनवायला धजावले नाही! अकालसमयी संभावितता लक्षणीय !

११) 'वरुण' हा पांचही पुराणांत भेटतो की जो 'शूद्रा' या पृथ्वी मातेचा पुत्र आहे!

**१३. 'सर्वं क्षत्रमथोत्साद्य'।** इत्यादी. (मत्स्य. / वायु. / ब्रह्मांड)

१) **'सर्वं क्षत्रमथा: ।'** (मत्स्य.) : मत्स्यपु. च्या प्रतींत हा **'मथ'** शब्द येतो.

: **'मथ'** म्हणजे फाटाफूट करणारे, विघटनकारी तत्त्व : (A Destroyer). घातक-विघातक तत्त्व अथवा घटक; विध्वंसक, (destructive).

: **'क्षत्र-मथ'** : क्षत्रियामंध्ये विघटन-फाटाफूट करणारे विध्वंसक घटक.

:'सर्व **क्षत्रमथ'** क्षत्रियांना विघातक ठरणारे सर्व घटक.

:'सर्व **क्षत्रमथोत्साद्य'** :(उत्साद्य=नष्ट करून) = क्षत्रियांना विघातक ठरणाऱ्या सर्व घटकांचा उच्छेद करून !

२) **'सर्वक्षत्रहरोद्धृत्य।'** (वायु.) क्षत्रियांना निष्प्रभ करणाऱ्या सर्व घटकांचा : नाश करून.

:('हर'=पराभूत करणारे, नामोहरम करणारे, निष्प्रभ करणारे.)

(**'उद्धृत्य'** = विनाश करून).

३) **'सर्व-क्षत्रहतोद्धृत्य'**:(वायु.)

('हत' = अपायकारक, विघटनकर्ता, विनाशकर्ता, मोहकर्ता, सत्तेपासून वा कर्तव्यापासून च्युत करणारा, दिशा- वा मार्गच्युत करणारा, आपापसांत फूट पाडणारा, कलह निर्माण करणारा; प्रभावशून्य बनविणारा; च्यावर जय मिळविणारा इ.)

: अशा प्रकारे क्षत्रियांना सत्तेपासून व कर्तव्यापासून ढळविणाऱ्या, क्षत्रियांमध्ये फाटाफूट - विघटन-कलह-प्रभावशून्यता - मोह निर्माण करणाऱ्या सर्व घटकांचा नाश करून, म्हणजे 'सर्व क्षत्रहतोद्धृत्य ।'

**:'सर्व क्षेत्रहतोद्धृत्य'** असाही एक पाठ ( वायु.) उपलब्ध होतो.

-यातील **'क्षेत्र'** चा अर्थ **'क्षत्रिय'** होऊ शकतो. तद्वत् **'क्षत्र'**चा अर्थ **'राज्य अंमल**, भूक्षेत्र'- असाही होऊ शकतो.

४) **:'सर्वक्षत्रं समुद्धृत्य'**.(ब्रह्मांड.)

१. यात 'हर', **'हत'**, **'मथ'** यांपैकी काहीही न योजितां सरळपणे **'सर्वक्षत्रं'** असे म्हटले आहे.

२. 'मत्स्य.' व 'वायु.' मधील 'उत्साद्य', वा 'उत्पाटच' हे 'विनाशक' पद

येथे योजिलेले नाही तर 'समुद्धृत्य' असे म्हटले आहे. ३.'सम् + उद्धृत्य ।' आणि 'उद्धृत्य'चे अर्थ पुढीलप्रमाणे आहेत:-

: **'समुद्धृत' :(pp):**(अ) Lifted up, Saved, rescued.

(ब) removed, set apart, divided, Possessed, behaved.

**: समुद्धरण** = (अ) upraising, lifting up, drawing or lifting out.

४. 'सर्व क्षत्रं समुद्धृत्य'चा अर्थ दोन्ही प्रकारे निघू शकतो. यातील सर्व क्षत्रियांचा चांगल्या अर्थाने, कल्याण-हिताच्या दृष्टीने अरिष्टांतून उद्धार करून, अनिष्टांतून बचाव - सुटका करून, सर्वांना योग्य प्रकारे साहाय्य करून, त्यांचे कल्याण साधून, हा अर्थ निश्चित होतो. (सम्=सम्यक्पणे, सर्वंकषपणे, अधिक चांगल्या प्रकारे; सर्व अर्थांनी, सर्व दृष्टींनी हितावह !).

**१४. ''भाविनोऽर्थस्य ।''**: (...वै बलात् ।):

: क्षत्रियांना विघातक ठरणारे जे घटक तेच, ''अर्थाचे, धनाचे 'भाविन्' (=लुब्ध, लोभी, निष्ठायुक्त. होत. अशा सर्वांचा विनाश करून, क्षत्रियांना त्यांच्या कपटजालातून 'महापद्म' ने वाचविले ते-

**१५. ''बलात्'':**

=सर्व शक्तिसामर्थ्यानिशी कठोरपणे, कर्तव्य कठोरतेने क्षत्रियांच्या सर्व हितशत्रू, धनलोभी घटकांचा 'महापद्म'ने उच्छेद केला.

१.) 'भाविनोऽर्थस्य वै बलात् उत्साद्य/ उत्पाटच' असा उल्लेख तीन पुराणांत आहे. :(मत्स्य./वायु./ब्रह्मांड.)

१. 'भाविनाऽर्थेच चोदित: । (मत्स्य.)

='अर्थ' वा 'धन'-लोभाने उदित होऊन पुढे सरसावलेले लोभी/ लुब्ध असे लोभी' हाही अर्थ यात निहित आहे.

२. याचेही काही 'पाठ', हस्तलिखितांतून उपलब्ध होतात. (वायु./मत्स्य.)

उदा: 'भवितार्थेन चोदित: ।' 'भवितोर्थस्य महाबलात् '।,

: 'भाविनोर्थ महाबलात् '। 'भाविनोर्थान्महाबलात् '।,

: 'भावितोर्थस्य महाबलात् ।',.... इ.

: मात्र, यांत नक्कलकारांचे हस्तदोष, नजरदोष यांस कारणीभूत असणेच अधिक संभवनीय होय. यांविषयी अधिक दखल घेऊन विचार व्हावयास पाहिजे.

**१६. 'वै':**

: 'वै' हे 'पादपूरणार्थक पद' होईल. तसेच त्याचा अर्थ 'खरोखर', 'खरोखरीच' असाही आहे.

**१७. 'अर्थ':**

-'अर्थ'चा 'अर्थ', 'राजनीती'/'राजसत्ता', असाही आहे. तेव्हा 'भाविनोऽर्थस्य' म्हणजे 'राजसत्तेचे' लोभी, असे मानल्यास, त्यांचा विनाश 'महापद्म' राजाकडून होणे

हे त्याच्या राजकर्तव्याचेच अनिवार्य अंग ठरते.

**१८. 'एकराट्'/'एकक्षत्र'/'एकछत्र'/'एकपद्य':**

**"एकराट् स महापद्म 'एकक्षत्रो' भविष्यति ।"** (मत्स्य./वायु.)

१) **'एकराट् स महापद्म एकक्षत्रो भविष्यति ।"**(वायु./मत्स्य.)

: **'एकराट्** स महापद्म **एकच्छत्रो** भविष्यति । (वायु./मत्स्य./ब्रह्मांड.)

: 'महापद्मः सचैकच्छत्रामनुल्लंघितशासनो पृथिवीं भोक्ष्यति ॥'(विष्णु.)

: "महापद्मो स एकच्छत्रां पृथिवीमनुल्लंघितशासनः ।
द्वितीय भार्गव : इव शासिष्यति । "(भाग.)

-याप्रमाणे - (अ) महापद्म हा **'एकछत्र'** (सार्वभौम राजा) होता; किंवा

(ब) महापद्म हा **'एकछत्र पृथ्वी'**चा राजा (सार्वभौम, चक्रवर्ती, सम्राट) होता.

(क) तो **'एकक्षत्र'** म्हणजे 'एकमेवाद्वितीय'/अनुपम / अतुलनीय **'क्षत्रिय'** होता.

२) **'एकराट्'** म्हणजे 'अद्वितीय' / ' एकमेव' /.'सर्वश्रेष्ठ' : **क्षत्रिय राजा** म्हणजेच 'सार्वभौम' / चक्रवर्ती / 'सम्राट' असा राजा.

१. 'एकराट्' - या शब्दाचे अनेक 'पर्यायी शब्द' / 'पाठ' हस्तलिखितांतून उपलब्ध आहेत. उदा. -

(अ) 'एकराजा', 'एकराजो', 'एकराज्य' ।

(ब) 'एकपद्म', । :(याचे स्वतंत्र विवेचन पुढे येईल.)

(क) 'सकराट्' । ('शकराट्' - ?). (स्वतंत्र विवेचन.)

: तद्वत् - २. 'एकछत्र' - या शब्दाचे अनेक 'पर्यायी शब्द' वा 'पाठ' हस्तलिखितांतून उपलब्ध होतात. उदा. -

(अ) 'एकराजा', 'एकछत्रौ'। (ब) 'एकत्रो'।

(क) 'एकक्षत्रो' । : (महत्त्वपूर्ण उपलब्धी).

● **तात्पर्य :**

: उपरोक्त क्र. (१०) : १) व (१०) : २) मधील दोन्ही शब्दांचे अर्थ, 'एकराट्' व 'एकछत्र' यांचे अर्थ समान/ एकच होतात; "सार्वभौम/ चक्रवर्ती/सम्राट राजा!" तेव्हा - 'एकराट् व एकछत्र' यांचा एकच अर्थ असता तर ते दोन्ही शब्द सलगपणे एकाच वेळी, एकाच ओळीत योजिण्याचे 'प्रयोजन' निरर्थक ठरते. आणि मग वेगळा विचार करणे प्राप्त ठरते. -

**३) 'क्षत्र'**चे, 'यजुर्वेदा'तील अर्थ **'एकक्षत्र'** शी संबद्ध आहेत:

: **'क्षत्र'** म्हणजे -

: १. दुष्टांचा नाश करणारे 'क्षत्रिय कुल.' : (यजु. १८.४०)

: २. विद्यावर्धन - संवर्धन करणारे 'राजकुल,' : (१८.४१)

: ३. 'चक्रवर्ती राजा' : (१८.४२)

: ४. 'धनुर्वेद' : (क्षत्रियांची विद्या) : (१८.४३)
: ५. राजधर्मामध्ये निरंतर स्थित 'क्षत्रिय' : (१८.४४)
: ६. शूर-वीरांचे कुल : (१८.३९)
: ७. राज्य, राजा वा क्षत्रियांचे कुल :(१८.३८)

**१९. महापद्म जो 'एकराट्' व 'यज्ञकर्ता' होता:**

(१) प्राचीन राजाची **'बिरुदे'** व त्यासाठी आवश्यक असणारे **'यज्ञ'**:
(ऐ.ब्रा.३.२.३.१५, श. ब्रा.५.४.३.१,११; श्रौ.सू.२०.१.१),
(ऋ.२.२८.१)

प्राचीन काळीं राजाने विशिष्ट **'यज्ञ'** केल्यासच त्यास विशिष्ट राजत्वसूचक **'बिरुद'** प्राप्त होत असे :-

| क्र. | केलेल्या यज्ञाचे नांव: | राजास प्राप्त होणारे बिरुद: |
|---|---|---|
| | | : (क्रमाने उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या राज-शक्तीचे प्रतीक !) |
| १. | 'राजसूय' | 'राजा'ने करावयाचा यज्ञ : (गोपथ ब्रा.) |
| २. | 'वाजपेय' | 'सम्राटा'ने करण्याचा यज्ञ. |
| ३. | 'अश्वमेध' | 'स्वराट' नृपतीने करण्याचा यज्ञ :(गो. ब्रा.). |
| ४. | .... | 'अधिराज'. |
| ५. | .... | 'राजाधिराज' |
| ६. | 'पुरुषमेध' | 'विराट'. |
| ७. | 'राजसूय' | 'एकराट्' : (श. ब्रा. ५.४.३.१,२१). |
| ८. | -,,- | 'सार्वभौम' : (For Sovereign : श्रौ. सू.:२०.१.१) |
| ९. | 'अश्वमेध' | 'स्वराट्' |
| १०. | 'सर्वमेध' | 'सर्वराट' : (गो.ब्रा.) |

(प्रा. भा. इ. / मो. बनारसी दिल्ली; Com.Hist.Of.Ind. पृ.११८-१९ ; A Mjd. Ind. Kshatriya Tribes." बी.सी.ला.)

(२) **'स्वराट'** : "इदं कवेरादित्यस्य 'स्वराजो' विश्वानि संत्यभ्यस्तु महना ।
अति यो मंद्रो यजथाय देव:सुकीर्ति भिक्षे 'वरुण'स्य भूरे: ॥"

=("स्वपराक्रमाने समस्त लोकांवर विजय प्राप्त करणाऱ्या 'कवी' आणि 'स्वराट्' (=स्वयंशास्त्या) आदित्याचे-वरुणाचे स्तोत्र मी गातो.भक्तांना संतोषकारक अशा श्रेष्ठ 'वरुण देवा'च्या सत्कीर्तीचे मी स्तवन करतो.") :(ऋ. २.२८.१)

: राजाच्या स्वरूपात 'वरुणा'स कुणावरही आश्रित राहावे न लागल्याने तो 'स्वराट' आहे.

: तेव्हा उपरोक्त विवरणाधारें 'यज्ञ-संपन्न करण्याचा अधिकार : हीनकुलीन,

जारज वा 'शूद्रां' सही नव्हता आणि 'महापद्म' हा तर 'यज्ञकर्ता' असल्यानेच 'एकराट्'/ 'एकछत्र' होता ; अर्थातच तो विशुद्धकुलीन औरसपुत्र व 'क्षत्रियच' होता, हे स्पष्ट आहे.

**२०. एकक्षत्र महापद्म :**

**'महापद्म'** हा **'एकक्षत्र'** होता, असे उल्लेख काही पुराणांच्या अनेक हस्तलिखितांतून उपलब्ध होतात, आजही उपलब्ध आहेत.

याची नोंद पूर्वी प्रारंभीच, एफ. ई. पार्गिटर यांनीही 'पुराण टेक्स्ट' (१९१३) च्या त्यांच्या ग्रंथामध्ये पृ.२५ वर केलेली आहे, **'तळटीपांमध्ये !'**

तसेच व्ही. एस. अग्रवाल यांनीही 'मत्स्यपुराण: एक अनुशीलन' (इंग्रजी) या ग्रंथात पृ. -३७५ वर तोच शब्द स्वीकारून मत्स्यपुराणातील श्लोकाचा अर्थ दिला आहे.तो मात्र 'एकछत्र' या शब्दाचा अर्थ 'एकक्षत्र'चा म्हणून दिला आहे.(!!)

: **'एकक्षत्र'** शब्दाची नोंद पुढील उपलब्ध पाच हस्तलिखितांत उपलब्ध आहे,

ती अशी:- (१) 'एकराट् स **एकक्षत्रो** ।' : (मत्स्य.) : (क्र. १२ (५)- १२-७८) आनंदाश्रम, पुणे.

(२) 'एकराट्र स **एकक्षत्रो** ।': (वायु .(क्र. १२ (५) - १९-१२२): आनंदाश्रम पुणे.

(३) एकराट् च **एकक्षत्रो** ।' : (मत्स्य. (क्र. १६४ of १८८७-९१): भां.ओ.रि.इं. पुणे.

(४) 'एकराट्र **एकक्षत्रो** ।' : (मत्स्य. 'मत्स्य पु. अनुशीलन, पृ. ३७५).

(५) 'एकराज्य **एकक्षत्रो**।' :(मत्स्य. (क्र. ४५/विश्राम/(ii)/B.O.R.I. :पुणे.

यांतील 'एकराट्' ('एकराजा', 'एकराज्य') चा अर्थ आहे, अद्वितीय सार्वभौम राजा ! वा 'सम्राट' !

आणि त्याच्याच पुढे जर 'एकछत्र' हा 'पाठ' स्वीकारला तर त्याचाही अर्थ आहे. 'अद्वितीय सार्वभौम राजा' वा 'सम्राट'!

तेव्हा ही एक प्रकारे, एकाच शब्दाची - 'सार्वभौम'ची, 'चक्रवर्ती'ची 'पुनरावृत्ती शेजारी-शेजारीच असणे' हे अप्रस्तुत ठरते !

या 'एकछत्र'च्या जागी **'एकक्षत्र'** हा जो 'पाठ' पांच 'पुराण'- हस्तलिखितांतून उपलब्ध आहे, तो मात्र पूर्णत: वरील 'अप्रस्तुतता' दूर करून 'राजाचे वेगळे वर्णन' देतो.

तेव्हा या **'एकक्षत्र'**चा अर्थ होतो. **'अद्वितीय क्षत्र'** म्हणजेच **'अद्वितीय क्षत्रिय' असा राजा, 'एकमेवाद्वितीय क्षत्रिय राजा !'**

**'क्षत्र'**चा **'क्षत्रिय'** (वर्ण वा जातीचा) असाच अर्थ अभ्यासकांनी पुराणांतील 'सर्व क्षत्रांतक', 'सर्व क्षत्रांतकृत्', 'सर्व क्षत्रांतरे,' 'सर्व क्षत्रमथोद्धृत्य,' 'सर्व क्षत्रं

समुद्धृत्य' 'सर्व क्षत्रहरोद्धृत्य,' 'सर्वक्षत्र हतोद्धृत्य' या सर्व शब्दांत स्वीकारलेला आहे. तोच 'क्षत्रिय' हा अर्थ 'एकक्षत्र'मध्ये स्वीकारण्यातही सुसंगतीच आहे, हे स्पष्ट होते. ही स्वीकारार्हता डावलता येणे येथे संभवनीय तरी आहे काय?

३. येथे या 'क्षत्र'चा अर्थ 'छत्र'/'भूक्षेत्र'/'अंमल/ अशांपैकी काही स्वीकारता येतो काय ? याचा विचार करता उपरोक्त क्र. (१०):२) मधील 'तात्पर्य' चा विचार होणे निर्णायक महत्त्वाचे आहे.

४. कारण -

(अ) 'सर्वक्षत्रांतरे, '(ब) 'सर्वक्षत्रांतको,' (क) 'सर्वक्षत्रांतकृत्' आणि, (ड) 'सर्व क्षत्रमथोद्धृत्य' - या चारही पदांमध्ये जर 'क्षत्र' म्हणजे 'क्षत्रिय' हा अर्थ स्वीकारला जातो, तर 'एकक्षत्र' मध्ये 'क्षत्र' म्हणजे 'क्षत्रिय' हा अर्थ डावलण्यामागचे प्रयोजनच शेष राहत नाही.

४) त्याचबरोबर 'राट्', 'क्षत्र' यांच्याशी 'क्षत्रिया'हून कोणा भिन्न घटकाचा सत्ता/अधिकार प्राप्तीविषयक 'अन्वय' (वंश-परंपरेने) जोडता येऊ शकतो याचे 'प्रमाण' संशोधक - अभ्यासक नोंदवून राहिल्याचे, नोंदवू शकल्याचे आढळत नाही. हा विचारही दुर्लक्षिण्यांतर्गर्भित हेतू वा साध्य ते काय ? याची स्पष्टता उपलब्ध होणे आवश्यक आहे.

५) उपरोक्त क्र. (१०):२) :(क)' : मध्ये उल्लेखित **'सकराट्'** हा 'पाठ', **'शकराट्'**चे 'प्राकृत'रूप आहे. अनेक प्राकृत शब्दरूपे पुराणांतून उपलब्ध होतात. असे विद्वान अभ्यासकांनीही म्हटलेले आहे. हे प्रस्तुत लेखात प्रारंभास यापूर्वीच नमूद केले आहे. **'शक' हे नाव काही 'क्षत्रियवंशीय' राजांचे विशेषनामही आहे,** (पुराणांत उपलब्ध). **'शक' -जनगणांचे 'क्षत्रिय' म्हणूनही उल्लेख आहेत.** अर्थात हा स्वतंत्र अभ्यासाचा विषय ठरतो.

६) (अ) उपरोक्त 'क्र. (१०) : २) :(ब)' मध्ये उल्लेखित 'एकपद्म' हा 'पाठ' वेगळेपण व्यक्त करणारा व महत्त्वाचा आहे. : 'पद्म' 'अथवा 'कमल' म्हणजे 'ब्रह्म'/ब्रह्मन्/'ब्रह्मण' तेव्हा 'एकपद्म'म्हणजे 'एकब्रह्मन' ! 'एकब्रह्मण' । 'ब्रह्मण' या शब्दाचे 'प्राकृत'-रूप 'बम्हण !' (म.भा.शां. ५९-१०३ ते १०७).असा हाच 'एक बम्हण' शब्द सातवाहनांच्या कोरीव लेखांत गौतमीपुत्र सातकर्णी या सम्राटाची वैशिष्ट्ये सांगताना योजिलेला आहे. (''राज्या/यज्ञाभिषिक्त पृथिविपती'' म्हणजे 'ब्रह्मन्') आणि त्याचा अर्थ आहे, 'अद्वितीय प्रजाप्रतिपालक !' तरीही त्याचा अर्थ ( बम्हण=ब्राम्हण) 'ब्राह्मण' असा स्वीकारून केवळ या एकाच आणि विसंगत संबंध जोडू पाहणाऱ्या शब्दाधारे डॉ. वा. वि. मिराशी आदि थोर संशोधक 'सातवाहन हे 'ब्राह्मण' (वंश-वर्ण-जाती चे) होते' असे निर्णित, संशोधित करू धजलेत ! रीतिनीतिभिन्नत्वापुढे सर्व कोणी विमूक ! अद्वितीय श्रीराम ! (ब) 'पद्मकं' म्हणजे, 'श्रीराम'! 'एकपद्मकं', एकपद्म म्हणजे सर्वात्मक श्रीराम

ठरतात हेच खरे !

**२१. 'महापद्म'-नृप संबद्ध विषय (पुराणांधारे):**

येथे 'महापद्म'च्या 'वर्णा' विषयीचा विचार पूर्ण होतो. आणि त्याच्याशी संबद्ध अशा काही बाबी उपचारापुरत्या शेष राहतात:

(१) महापद्म/ त्याचे पुत्र व कौटिल्य व मौर्य ! (सुमाल्य वा सुकल्प/सहस्र इ.)

१. महापद्मास ८ पुत्र होते, व ते त्याच्या नंतर क्रमाने सत्तेवर आले व १२ वर्षांची राजसत्ता त्यांनी उपभोगिली.

२. त्यांपैकी कोणा एकास तरी, किंवा शेवटच्यास, किंवा सगळ्यांनाच एकदमच 'कौटिल्याने' सत्तेवरून दूर केले. :(मुद्राराक्षस)

३. 'मत्स्यपुराण'म्हणते की, नंदांनतर 'कौटिल्य हा राजा होईल व तो १०० वर्षे राज्य करील व नंतर (मगधची) राजसत्ता मौर्यांकडे जाईल.

४. कौटिल्य हा 'नरेंद्र/नंदेंद्र' होता, म्हणजेच तो 'नंदवंशीय' 'क्षत्रिय' होता, 'राजा'. होता.

५. त्याने 'चंद्रगुप्तास राज्याभिषेक' केला, राजसिंहासनावर त्याची स्थापना केली. :(वायु,/ब्रह्मांड,/विष्णु,/भाग.)

६. 'मुद्राराक्षस'मध्ये म्हटलेय तो 'बटु' (ब्रह्मचारी !) होता: (गो. के. भट त्यास 'भटुर्गा' म्हणतात, वारंवार!).:('मुद्राराक्षस' नाटक, सार्थ मराठी.)

७. फक्त 'ब्रह्मांडपु.'च त्यास 'द्विजर्षभ:' म्हणते. (द्विजर्षभ:म्हणजे फक्त 'ब्राह्मण'च असा अर्थ सुतराम नव्हे !) तरीही !

८. फक्त 'विष्णुपु.'च त्यास 'ब्राह्मण' म्हणते. ('ब्राह्मण' म्हणजेही फक्त 'ब्राह्मण' वर्णाचाच असा अर्थ नाही! 'ब्राह्मण' म्हणजे 'वेदविद्याविद तत्त्ववेत्ता'हा अर्थ ऋग्वेदात व अन्य वेदांच्याही अनेक ऋचांत विद्यमान आहे ! ).

९. फक्त 'भागपु.' यास त्याचे नांवही माहीत नाही ! त्यामुळे ते पुराण त्यास 'कश्चित् द्विज: ।'असे दोन वेळा म्हणते.
"चंद्रगुप्तं स एव वै द्विजो राज्येऽभिषेक्ष्यति ।" (भाग.) येथेही 'द्विज' म्हणजे केवळ 'ब्राह्मण' वर्णीयच असा अर्थ सूचितही होत नाही.

१०. कौटिल्यांच्या अर्थशास्त्रात त्यांस 'ब्राह्मण' वर्णीय संबोधल्याचे उपलब्ध नाही.

असो ! अधिक विचार, अभ्यास कौटिल्यांविषयी व्हावा, व तो निर्णायक व्हावा, यासाठी तो स्वतंत्र चर्चेचा विषय ठरतो.

**२२. 'महापद्म' राजा शिशुनाक वंशीयच ! होता:**

"शिशु नाक' राजे हे " हे पहिले नंद" राजे होते. आणि महापद्मादि राजे हे नवीन नंद ('नवनंद' हे नंतरचे नंद) राजे होते. (१+८=९ असे 'नव (नऊ)

नंद' नव्हेत !). कारण नंदपरंपरा खंडित झालेली नाही. 'कदंब हे स्वतःस नंदान्वय' संबोधीत.

**(१) 'शिशुनाक' : यातील 'नाक' म्हणजे 'नंद' / 'आनंद' (मोद / प्रमोद) होय.** (६-१२३.५) : : (अथर्ववेद ६-८४.४)

१. **"अयस्मये द्रुपदे बेधिषे हहाभिहितो मृत्युभिर्ये सहस्रम !**
**यमेन त्वं पितृभि : संविदान उत्तमं नाकमधि ॥** " (अथर्व. ६.८४.४)

"हे मनुष्य यहाँपर मृत्युके कारणोंसे जो सहस्र प्रकार हैं। घिरा हुआ तू लोहेसे जकडे हुए एक काठके बंधन में बंध रहा है। नियम से (= यमेन।) पालन करनेवाले ज्ञानियोंसे ( पितृभिः) मिला हुआ ( =संविदानः ।) तू इस पुरुषको उत्तम 'आनंद', 'नंद' में (="नाक मधि ।") उपर चढा ! (अधिरोहय !)।"

:(अनु. दयानंद सरस्वती)

२. **"नाके राजन प्रतितिष्ठ ततैतत् प्रतितिष्ठतु ।**
**विद्धि पूर्तस्य नो राजन्त्स देव सुमना भव ॥'** (अथर्व. ६.१२३.५)

=('राजन ! अर्थात हे समर्थ मनुष्य ! सुखस्वरूप परमात्मा में -आनंदमें नंदमें (='नाके') प्रतिष्ठा, उसी नंदरूप परमात्मामें यह तेरा पुण्य कर्म प्रतिष्ठा पावे । हे राजन् अर्थात विद्यासे प्रकाशमान (राजा) ! हमारे लिए आदि पुण्यकर्म का ज्ञान कर, वह तू, हे गतिशील (=देव) प्रसन्नचित्त (=सुमनाः ।) हो!") : (अनुः दयानंद सरस्वती) : (अथर्व. ६.१२३.५)

३. 'नाक' म्हणजे 'नंद', आनंद, या अर्थापोटीच 'महापद्म' या शिशुनाकवंशीय नृपतीस 'महापद्म नाक' असे न म्हणता 'महापद्म नंद' असे भविष्य./विष्णु./भाग. पुराणांनी संबोधले, आणि त्यांना 'नव नंद' बनवून नंदींची परंपरा सुरू करून ठेवली. 'शिशुनाक' या क्षत्रिय राजवंशापासून 'महापद्मा' दिकांस अकारणच अलग केले आणि त्यांवर 'शूद्रत्व'ही लादले. 'नव' म्हणजे 'नऊ' की 'नवीन/नूतन' यावरही संशोधकांचे अनंत श्रम खर्ची पडलेत. ग्रंथांची कित्येक पाने विभूषित झालीत, किंबहुना शतकांनुशतके वाया व्यर्थच गेली वस्तुतः शिशुनाक हे पूर्वनंद म्हणजे आधीचे पूर्व-नाक होते आणि महापद्मादि नृपती हे उत्तर-नाक (नंद) म्हणजेच नंतरचे नवीन नंद होते !

४. याच वंशात **'महानंद'**ही कुणी तरी झाला.'भविष्यपु,) असे मानले जाऊन; 'महानंदा' ही सर्वख्यात 'गणिका',जी परम 'शिवभक्त' होती. तिच्यापर्यंत 'नंदोत्पत्ती' पोहोचविण्यात आली की कसे ? हेही जरूर शोध्य आहे . नामसाधर्म्य अगाध आहे हेच यावरून कळून येते. अंतिमतः अगाधतेचा 'बळीच' 'महापद्म हा नृपती' होय ! हेच खरे आहे.

५. अशाच प्रकारे 'महापद्मास', 'महापद्म-संख्यक सैन्यांचा अधिपती', 'महापद्म संख्यक धनाचा अधिपती', असे विष्णु./भाग. पुराणांच्या टीकाकारांनी

'बनविले, आहे. (श्रीधर व रत्नगर्भ भट्टाचार्य)

'नंद' या शब्दाचाच एक अर्थ आहे, 'नऊ' ही संख्या. तेव्हा 'नव नंद' चा अर्थ होईल 'नऊ नऊ' अर्थात तो 'अग्राह्य' ठरतो. त्यामुळे 'नंद' म्हणजे 'नाक' (आनंद) हा अर्थ सिद्ध राहतो. परंतु 'नाक' व 'नंद' हे भिन्न दाखविण्यास 'नव' (नवीन) नंद !- हा प्रयोग प्रचलित केला गेला.

**२३. 'महापद्म' : नृपतीच्या कुलोत्पत्तीविषयीच्या असंस्कृत, अभिरुचिहीन व विवेकदुष्ट प्रवादांची विफलता ! (त्यांच्या बादरायणि/असंबद्ध मूल स्रोतांसह ):** प्रस्तुत लेखात क्र. (३) मध्ये नमूद केलेले 'कुलोत्पत्ती' विषयीचे प्रवाद कसे तयार करण्यात आलेत ते उमजले तर कणवेचे दानही सर्वार्थी अनाथ ठरते! पुराणवर्णनांनुसार महापद्म हा विशुद्ध क्षत्रिय, औरस संतती असून त्याचे पुत्रही औरस पुत्रच होते.

**१) 'नापित' माताः (?)** : (नव्हे ! नाम-साधर्म्याचा अगाध महिमा !) : आंग्लीय, विधर्मीय असहिष्णु असमंजसतेचे अनौरसीय, व्रात्य लाडके अपत्य म्हणजेच हे कुलोत्पत्तिशोधाचे **'ना-पितायनी शौद्रायन'** अर्थात अनर्थमूलक कुभांड-भाण ! नटहीन नाटक ! ते कसे ? ते पुढीलप्रमाणेः (महापद्म हा **वरुण** वर्णिला गेल्याने):-

१. **'वरुण'** या आदित्यदेवाच्या जीवनात एक **'भद्रा'** नामक स्त्री येऊन परत गेली. आणि **'भद्रा'** त्याची तर माताच आहे, **'पृथ्वी !'** ती आहे **'शूद्र'!शूद्रा, शूद्री !**

३.**'भद्राकृ'** म्हणजे डोके भादरणे ! त्याचा अधिकारी 'नापित' !'मद्राकृ' म्हणजेही तेच ! 'भद्रा,''शूद्रा,' 'खला' या चौघीही सख्ख्या बहिणी व तशातच त्याही 'वरुण' शी संबंधित ! म्हणून 'महापद्म'च्या कुलोत्पत्तीच्या छायानाट्यरंगमंचावरील त्याही कळसूत्री पात्रे बनून नाचत नि नाचवीत राहत्या झाल्या.

४. 'एकछत्र' होता 'महापद्म' ! म्हणून 'छत्र'पासून बनला 'छत्रिन्'!(चक्रः 'चक्रिन्')! आणि 'छत्रिन्' म्हणजे 'नापित' ! म्हटलेच तर 'छत्रिण'= 'नापित' स्त्रीही ! शिवाय -('छत्र' चे वंशज ते 'छत्रिन्' !)

५. 'वरुण' हा स्वतःच कसा आहे, आहे माहीत? तो आहे 'चक्क' टक्कल असणारा ! (गंजा ! मुंडन केलेला, डोके भादरलेले !) त्याचा सदैवसाठी त्या 'भद्रे'ने व 'छत्रिण' नेही जणू 'शिरस्थाना'चाच 'भद्रा' करून ठेवलाय ! त्याला 'उजळ' माथ्याने, ताठ मानेने-अभिमानाने आपले कुलगोत्रही सांगता येऊ नये अशीच तिने तरतूद करून ठेवली व ती परतून गेली ! वरुणाने तिचे 'अपहरण' केले, त्याचा शाप भोवत राहिला महापद्मकुलास ! इथेही 'नापित' व 'नापित स्त्री' - कुलानेही व व्यवसायाने दोघेही आवश्यकच ! भद्रेने वरुणाच्या कुलोत्पत्तीचेच वस्त्रापहरण केले !

: महानंदिपुत्रा ! अगम्य तुझी कुलदैवलीला !

(१. 'छत्रिन् = नापित = a barber, २. भद्राकृ = to shave; ३. मद्राकृ= to shave; ४. भद्रा = नापित स्त्री, ५. भद्राकरणं = मद्राकरणं, shaving, भादरणे, जमालगोटा करणे, मुंडन करणे).

महापद्म-जीवनात असा अवतरला ' नापित' आणि 'सहचरीभाव !' जैनीय व आंग्लीय साहित्यासाठी; शोधासाठी !

**२). 'शूद्रा' : माता (?) / 'शूद्रा': पत्नी ? :**

१. वरुणाने पळवून आणलेल्या 'भद्रा' ची एक सख्खी बहीण होती 'शूद्रा' ! पण त्या 'शूद्रे' च्या ना 'मद्रे' च्याही 'वरुण' वाटेलाही गेला नव्हता ! पण 'महापद्म' च्या जीवनाशी मात्र कायमची लिपटून राहिलीय मात्र 'शूद्रा !' वरुण आणि महापद्म यांच्या चरित्र-चारित्र्य यांच्या एकात्मतेमुळे हे सर्व घडलेय ! पांचही पुराणांत महापद्मास 'वरुण' या स्वरूपात वर्णिलेले आहे !

२. दुसरी 'शूद्रा' म्हणजेच प्रत्यक्ष 'पृथ्वी' च! ती त्याची माता, म्हणून तो 'शूद्रा-पुत्र !' पुराणवर्णित 'महापद्म' हाही 'वरुण' म्हणूनच तोही. 'शूद्रा मातेचा पुत्र !' अभ्यासकांना भावला ! पुराणांची प्रामाणिकता न कुणाला भावली ना कोणा उमगली!

३. अशी ही 'शूद्रा' पृथ्वी ! आणि 'महापद्म' हा सम्राट 'पृथिवी पती ' म्हणून ठरविला गेला 'शूद्रा' राणीचा दुर्दैवी 'राणा' ! चारित्र्यलांछितांनी दूषितविलेला ! त्याच्या 'राणी' चे वर्णन तर काय सांगावे ? कुचाळक्या नि कुलंगडी, जारकर्मे, पतिहत्त्या इ.इ.सर्व अनैतिकतेच्या नागिणींचे डंखही तिला 'संजीवनी' चे वरदान देते झालेत !

: वस्तुतः पृथ्वी मातेचे मातृत्व जसे यच्चयावत प्राणिसृष्टीशी अनुबंधित आहे, तद्वत ते 'काल-वरुण-चंद्र-अंश' इ. आदित्य देवतांशी सर्वप्रथम निगडीत आहे; हे सर्वजण त्याच 'शूद्रा' 'पृथ्वी' मातेचे पुत्र आहेत. (शूद्रायां कलिकांशजाः /शूद्रायाः कालसंवृतः ।)

४. सहाही पुराणे महापद्मास 'शूद्रामातेचा सुत' म्हणत नसून ती त्यास 'महानंदीचा सुत' संबोधतात, सुनिर्णित करतात. आणि महानंदिन हा कुलदृष्ट्या शिशुनाकवंशीय क्षत्रिय होता.

**३), 'गणिका,' माताः (?) : (मत्स्य. २७२.३१)**

१. "दशैते ('शुंग') 'क्षुद्र' राजानो भोक्ष्यंतीमां वसुंधराम् ॥"

: या 'क्षुद्र' चे स्त्रीलिंग रूप 'क्षुद्रा । ' आणि त्याचा अर्थ : 'वेश्या' /'गणिका'.

- 'शुंग', मौर्य हे 'नंद'- शिशुनाक' यांजसे 'मगध' चेच राजवंश ! तेव्हा कुठला संदर्भ कुठे / केव्हा जोडला जाऊ शकतो नि अनर्थ उधळता येतो, याचेच हेही एक निदर्शक ठरते !

२. "क्षुद्रा व्यंगा नटी 'वेश्या' सरघा कंटकारिका ॥" :(अमरकोश)

४). **'खला'** :'खला' ही 'भद्रा' चीच बहीण ! ''खला' म्हणजेही 'पृथ्वी',earth, आणि 'खल' म्हणजे 'सूर्य (the sun.)'
: भद्रा= खला= शुद्रा=पृथ्वी ! आणि भद्रा =मद्रा= नापित स्त्री ही !

५). **'ताम्ररसा' / 'तामरसा'** (तामरस = कमल, पद्म ) ही देखील 'भद्रा' चीच एक बहीण; तीही 'पद्मा', 'पृथ्वी' अशा अन्वयार्थाने 'महापद्म' राजाशी संलग्न आहेच. 'तामरस' : कुमार. ८.३२; रघु. ६.३७; ९.१२, ९.३७. 'हेमतामरस' : कुमार. ८.२६)

**६) अन्यही वायफळ मुक्ताफळे !**

१. उपरोक्त तीन लांछनांशी संबंधित व आधारित अन्य सर्व मुक्ताफळे 'वांझ'! 'बीजहीन' असून ती उधळण्यास कोणासही काही प्रयास पडत नसतात, कालनिरंतरपणे ! कल्पना नि रसना दोघींचेही ठायीं स्रवणक्षमता अल्पशी असली तरीही ती हवा तसा इतिहास विटंबित करू शकते, हे येथे पटते !

२. हा सारा ज्याचा-त्याचा कल्पनाविलास ! अविवेकाचा विखार आहे ! यांपैकी एकासही सहाही पुराणांत कसलेच प्रमाण उपलब्ध नाही.

**७) तात्पर्य :**

महापद्म कुलवंशाविषयी प्रसृत करण्यात आलेले सर्व प्रवाद हे प्रमाणहीन असून, पुराणांच्या एकमुखी प्रामाणिकतेच्या कसोटीवर, तो शुद्ध कुलीन औरस संततीयुक्त व परंपरेने राजवंशीय क्षत्रियच होता हे समजून घेणे कुणासही जडभारे वाटू नये ! त्याचे भव्य-दिव्य कर्तृत्व, प्रजाहितदक्ष प्रजापालकत्व, भेसळहीन स्वर्ण-शलाका जसे **'हिरण्य तेजोगर्भ'** होते, न की 'शूद्रीगर्भ' (हीनत्वार्थी वा वर्ण-कुलनिदर्शक ) ! ते तसे जे भासले तसे कधीही नव्हते !

८) : **'परी हे बहु असो !'** (क्षत्र/क्षात्रं) : (गीता/ज्ञानेश्वरी):
**''शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।**
**दानमीश्वरभावश्च 'क्षात्रं' कर्म स्वभावजम् ।।''** :(गीता. १८.४३)
= ''परी हे बहु असो देख । शौर्यादि गुणात्मक ।
कर्म गा नैसर्गिक । 'क्षत्र-जातीसी !' ।।'' :(ज्ञानेश्वरी : १८.८७८)
= (''परंतु हे फार वर्णन राहू दे ! अर्जुना, पाहा ! शौर्यादि गुणांनी युक्त असे हे कर्म, 'क्षत्रिय जातीला' स्वभावतःच, जन्मतःच आहे ! '')

**२४. .महापद्मविषयक पुराण - श्लोकांचा अर्थ:** (१)(मत्स्य वायु., ब्रह्मांड.)

-'' शिशुनाक'' ('शिशुनाग'-ब्रह्मांडः अनुसार फक्त ) हा 'क्षत्रिय' राजा होईल. त्या वंशात बारा राजे ३६० वर्षे राज्य करतील. पुढे कलियुगाच्या अंतापर्यंत शिशुनाकासारखे (क्षत्रियवंशी व प्रजाहितदक्ष) 'राजे' होतील.

त्याच वंशात 'नंदिवर्धन' होईल त्याचा पुत्र 'महानंदी' हा 'राजा' होईल, 'महानंदीचा पुत्र महापद्म' हा 'राजा' 'सर्व क्षत्रियांमध्ये श्रेष्ठ असा एक"क्षत्रिय राजा' ''चंद्र-वरुण-काल (यम) व अंशच"असेल तो ''सर्व क्षत्रियरूप अंतक'' म्हणजेच, ''कालदेवता रूप वरुण'', असून तो ''सर्व विश्वाचा सम्राट'' असेल !

त्यांच्यानंतरचे राजे, 'शूद्रा या पृथ्वीचे व्रत अर्थात् 'पार्थिव व्रत' म्हणजेच सर्वांचे योग्य प्रकारें पालनपोषण व रक्षण करणे या 'शूद्रव्रतधर्मा' चे आश्रयस्थान शोभतील !

तो महापद्म राजा, सार्वभौमसत्ताधारी सम्राट असा '' अद्वितीय क्षत्रिय चक्रवर्ती'' होईल. (''एकक्षत्र''), (१९) तो (पृथ्वीतलावर) अठ्ठावीस (वा अठ्ठयाऐंशी) वर्षे राज्य करील. तो क्षत्रियांना अपायकारक ठरणाऱ्या विध्वंसक व विघटनकारी प्रवृत्तींचा, धनाच्या व राजसत्तामिषांच्या जोरावर डोके काढू पाहणाऱ्या अशा सर्व उपद्रवकाऱ्यांचा उच्छेद सर्व सामर्थ्यानिशी करून क्षत्रियांचे कल्याणकारी हित साधेल.

त्याचे 'सुकल्प' या ज्येष्ठपुत्रासह आठ पुत्र त्याच्यानंतर क्रमाक्रमाने राजे बनतील व ते एकूण १२ वर्षे राज्य करतील. ('सुकल्प' वा 'सहस्र'), (२१ )

त्या सर्वांचा उद्धार करून 'कौटिल्य' हा 'राजा' होईल व तो शंभर वर्षे राज्य करील. त्याच्यानंतर तेच मगधचे राज्य मौर्यांकडे जाईल, 'कौटिल्य' हा 'नंदेंदु', 'नरेंद्र', 'नंदेंद्र' शोभेल. (२२)

कौटिल्य हा (शतधन्वा, वा ) ' चंद्रगुप्त' मौर्य यास राज्यावर बसवून त्यास राज्याभिषेक करील / करवील.''

**२५./ महापद्म-विषयक पुराण-श्लोकांचा अर्थ : (२)**

(विष्णु.भाग. भविष्य. प्रमाणे ):

-'' शिशुनाक''(शिशुनाभ,शिशुनाग) वंशातील महानंदीराजाचा पुत्र 'महापद्म' (हा महापद्म नंद/ महापद्मपति) कोणी एक नंद राजा होईल तो सर्व क्षत्रियांच्या शत्रूंचा शत्रू सिद्ध होईल. तो 'शूद्रा' या पृथ्वीच्या-पोटी जन्मलेला सर्व क्षत्रियरूप कालदेवता-वरुण आणि चंद्रच जन्मास येईल; तो मदना जसा विमोहनकारी व अत्यंत सामर्थ्यवान महाबलवान, 'बली' अजिंक्य-अजेय, सर्वजेता धनुर्धर 'द्वितीय परशुराम' त्या श्रीरामचंद्रा-जसा अर्थात विश्वसम्राट वरुणा जसा शोभेल. तो 'क्षत्रियरूप कालदेवता' असेल. ('क्षत्र-विनाशकृत् !')

त्याच्या नंतरचे राजे (पृथिवीपालक - 'शूद्रा' त्याच 'पृथ्वी'चे पती), 'पृथ्वीच्या' 'शूद्रत्व'-व्रतधर्माचे-प्रजाप्रतिपालन-पोषण व अभिरक्षण आणि संरक्षणादि - कर्तव्यधर्माचे परिपालन योग्य प्रकारें करणारे प्रजाहितदक्ष राजे होतील.

महापद्म हा द्वितीय भार्गवाप्रमाणे म्हणजे श्रीरामचंद्राप्रमाणे / वरुणराजाप्रमाणे या ''एकछत्र पृथ्वीचे - सार्वभौम राज्य'', जेथे कोणाहीकडून राजशासनादेशांचे उल्लंघन अर्थात त्यांच्या विरुद्ध आचरण केले जात नाही, असे राज्य तो उपभोगील.

या 'महापद्म' याचे 'सुमाल्य' इत्यादी आठ पुत्र (१. नंद सुत, २. प्रनंद, ३. परानंद, ४. समानंद, ५. प्रियानंद, ६. यज्ञभंग, ७. मौर्यानंद, ८. महानंद, इ. - भविष्यपुराणानुसारच फक्त.) त्याच्या नंतर क्रमानेच बारा वर्षे पर्यंत राज्य करतील.

त्यांचा उद्धार 'कौटिल्य' हा कोणी एक 'द्विज'। 'ब्राह्मण' (म्हणजे वर्णजातीचा नव्हे , तर वेदविद्यासंपन्न असा तत्त्ववेत्ता) करील. नंदांअभावी मगधची राजसत्ता या कलियुगात मौर्यांकडे जाईल. चंद्रगुप्त' या (विद्वान/प्रवीण/समंजस अशा) व्युत्पन्नास तोच 'द्विज' (द्विजर्षभ) **कौटिल्य असा तो** राज्याभिषेक करील.''

**२६. पूरके :**

## (१) पूरक १ ले.

**१.'काल (यम) देवता'संबद्ध 'गणिका':** (ब्रह्मपु.अ. ८६. १ ते ५०):

: 'महापद्मास' वायु. व ब्रह्मांड पुराणांनी 'कालसंवृत्त' ('कालदेवता' व 'संवृत्त (वरुण) देवता' ) असे म्हटलेलेच आहे. तेव्हा, 'काल'-'यम' शी संबद्ध 'गणिका'-प्रकरण (ब्रह्मपु. ८६. १ ते ५० ) जोडून त्याची 'माता', त्याची 'महाराणी' यांनाही जैन- ग्रंथांनी 'गणिका' बनवून टाकले आहे, भावी संशोधकांच्या हेतुपूर्तीसाठी ! ते कथा-सूत्र / तो कथा- स्रोत येणेप्रमाणे आहे :-

: '' एकदा एका वयोवृद्ध माता-पित्याचा वयोज्येष्ठ पुत्र अचानक मृत्यू पावला. त्यांचा शोक पाहून यमास पश्चाताप झाला; व तो पुण्यसंचयार्थ महाराष्ट्रात (?) गोदावरी तीरीं तपश्चर्येस बसला. त्यामळे पृथ्वीतलावरील सजीवांचा नाश थांबला, मात्र त्यांची उत्पत्ती तर होतच राहिली; त्यामुळे सर्वत्र बेदिली माजली, या गोष्टीचे दुःख घेऊन पृथ्वीमाता इंद्राप्रत गेली. इंद्राने 'यमाचे' (कालाचे) तपश्चर्येचा भंग करण्यासाठी **''गणिका''** पाठविल्या; त्याही जैन-ग्रंथांनी 'महापद्म नंदा' च्या कुल-मूलत्वास व कुलहीनत्वास कारणीभूत होण्यास जोडल्या. हे **'गणिका-संदर्भ'** असे आहेत :-

-'' **'गणिका'**-संगमे स्नात्वा प्राप्नुयादक्षयं पदम् ! (ब्रह्म.८६.२ )

'' 'अथेंद्रं ' मेनका' प्राह शंकितेति वचस्तदा । (३०)

**''मेनकोवाच -**

**कालावलोकने नालं काचिदास्ति सुरेश्वर ।**
**मरणं च वरं देव भवतो न यमात्पुनः ॥ ३१ ॥**
'रूपयौवनमत्तेयं **गणिकायाचनं** प्रभो ।
प्रेषणं तत्प्रयच्छैषा स्वामित्वं मन्यते त्वया ॥ ३२ ॥

'' **ब्रह्मोवाच -**

इति श्रुत्वा वचस्तस्याः शक्रः सुरवरेश्वर : ।
आदिदेशाबलां क्षामां सत्कृत्य **गणिकां** तथा ॥ ३३ ॥

'' **शक्र उवाच -**

**'गणिके'** गच्छ मे कार्यं कुरु सुंदरि मा चिरम् ।
कृतकृत्याऽऽगता भूयो वल्लभा मे यथा शची ॥ ३४ ॥
''**ब्रह्मोवाच-**
इत्याकर्ण्य वचाः शक्रादुत्पत्य **'गणिका'** दिशः ।
क्षणेन **यम**-सांन्तिध्यमायाता चारूरूपिणी ॥ ३५ ॥
**यमान्तिकमनुप्राप्ता** द्योतयन्ती दिशो दश ।
सलीलं ललितं बाला जगौ हिंदोलकंकलम् ॥ (चंचला । ) ॥ ३६ ॥
ततश्चचाल **कालस्य** मनो लोलं चलाचलम् ।
अथोन्मील्य **यमो** नेत्रे कामपावकपूरिते ॥ ३७ ॥ ...
'' **गौतम्यां** तु समागम्य **'गणिका -गण-** किंकरै : ।'
''गच्छन्तीं **गणिकां** दृष्ट्वा विमनस्थां दिवं प्रति ।
विस्मयं परमं प्राप्तः **कालस्तरललोचन :** ।
अथाऽऽ दित्येन चा ऽऽगत्य एवमुक्तो **यमस्तदा** ॥ ४० ॥
''**यम उवाच -**
... किं नाम गर्हितं कर्म तव कर्तुमलं **यम** ॥ ४४ ॥
किं न दृष्टा त्वया यान्ती ' **गणिका-गण-किंकरैः** ॥ ४५ ॥
... यमोऽपि संगमे स्नात्वा ततो निजपुरं ययौ ॥ ४७ ॥''

●●●

## २. पूरक : २ रे :

**१. 'चोरपूर्व :' महापद्म : !**                    :(१) (वा.रा.२.१०९.३४).

**१) बुद्ध : २ रा :**

१. : 'महापद्‌ नंदा' स **'परिशिष्टपर्वन'** या जैन ग्रंथात ), (६.३३६; ७-८१), **'चोर-पूर्व;'** असे म्हटले आहे, असे इंग्रज संशोधक आवर्जून सांगत राहतात. तो 'चोर-डाकूंचा शक्तिशाली नायक' होता असेही **'महावंश-टीका'** या ग्रंथात म्हटलेय म्हणे ! : '' प्रथम नंद शासक हा एक योद्धा होता. तो चोर-डाकूंच्या शक्तिशाली नायकाजसा ' भासत' होता ! हाही त्याच्या हीन-कुलीनत्वाचा संकेत आहे !'' ही ही संशोधनगर्भ टिप्पणी आहेच.

२. महापद्‌म नंदाचा पूर्वज (अथवा'पूर्वपुरुष'); 'बुद्ध'/'गौतमबुद्ध' संबंधात श्रीरामाने **'यथा हि चोर : तथा हि बुद्ध : !'** म्हटले आहे;

:(वा.रा.२.१०९.३४)

: म्हणून बुद्ध-समकालीन 'बिंबिसार' : (महापद्‌माचा पूर्वज ) जो स्वतःही

बुद्ध/बौद्ध : (नास्तिक मतावलंबी/ वेदप्रामाण्य नाकारणारा) असल्याने **'यथा हि चोर : ।'** गणला गेला !

**-" यथा हि 'चोर': स तथा हि 'बुद्धः'**

स्तथागतं नास्तिकमत्रं विद्धि ।
तस्माद्धि यः शक्यतमः प्रजानां
स नास्तिके नाभिमुखो बुधः स्यात् ॥" : (वा.रा.२.१०९.३४)

● (श्रीराम, 'तथागत' या बौद्धमतावलंबी नास्तिका विषयी म्हणत आहे !):-

(१) = (जसा'चोर' दंडनीय असतो, तद्वत 'बुद्ध','बौद्ध' ही (वेद-विरोधक व बौद्धमतावलंबन करणारे ! ) दंडनीय आहेत.

-"तथागत" (=१. तशा स्थितीतला, २. तसला, ३. बुद्ध साधू,

४. एक विशिष्ट नास्तिक, ५. स्वतःबुद्ध !) व 'नास्तिक' ('चार्वाक', 'चार्वाकमतावलंबी' ! ) यांनाही येथे याच श्रेणीचे मानले पाहिजे. म्हणूनच प्रजेवर अनुग्रह करण्यासाठी राजाद्वारा त्या नास्तिकाला जितका दंड दिला जाऊ शकेल तितका जास्तीत जास्त असा, त्याला तर 'चोरा ' इतका/जसा दंड देवविलाच पाहिजे; परंतु जो दुर्दम्य ('वश के बाहरवाला') असेल, अशा नास्तिकाविषयी 'शहाण्यांनी/ विद्वानांनी/ बुद्धिवंतांनी (★) सन्मुख न व्हावे ! त्याच्याशी तर संभाषण ही करू नये . (★ हिंदी अनुवादकाने 'ब्राह्मण'-कल्पिलेला आहे ! ).

(२) "जसा 'चोर', तसाच 'बुद्ध' ! त्या 'तथागता' ला तुम्ही 'नास्तिक' च समजा. म्हणून लोकांमधल्या शहाण्या माणसाने शक्य तितके करून 'नास्तिका' च्या सन्मुख जाऊ नये."

(३) " हा सबंध परिच्छेद 'क्षेपक' असावा," असे विद्वान मानतात.

: कारण, श्रीराम-कालात, 'बुद्धा' चे अस्तित्व कसे ? कोठून ?

(४) त्याचे कारण असे की -

:" सुगतादिक जे बौद्धधर्म प्रवर्तक आचार्य ते 'सर्वज्ञ' स 'बुद्ध' असे समजतात.

-व 'सर्वज्ञ' म्हणजे 'ऋषभदेव' असे ते मानतात. त्याने बाह्यात्काराने तत्स्वरूपच जाणून आपणांसही 'सुगत' संज्ञक 'बुद्ध' म्हणविले: तो श्रीरामावताराच्याही फार पूर्वी होऊन गेला.

(५)"जसा 'चोर' हा, राजदंडास योग्य होय, तसाच 'बुद्ध' व 'तथागत' इत्यादिक 'नास्तिक' ही होत.

- अन्यायाने परद्रव्यापहरण करणारा जसा 'चोर' म्हटला जातो, तसाच 'वेदप्रामाण्याचा अन्यायाने अपहार करणारा 'बुद्ध' वा 'तथागत'ही 'चोर' च म्हटला पाहिजे.!!

**(६)'बिंबिसार' श्रेणिय 'शिशुनाक' :** (शिशुनाग/शिशुनाभ):

:(प्रा.च.को./चित्राव), (भा.अ.च.को./ गोडबोले)

: 'बुद्ध' व 'बौद्ध' हे दोन्ही शब्द एकाच अर्थाने अनेकदा वापरलेले आढळतात.

: 'बिंबिसार' हा मगधदेशचा एक सुविख्यात सम्राट होता. तो अनेकांप्रमाणे स्वत:ही ' गौतमबुद्ध' व 'वर्धमान महावीर' यांचा समकालीन व अनन्य उपासक होता. (इ.स.पू.५२८-५००)

: बौद्धसाहित्यमतें- बिंबिसार व गौतमबुद्ध (२ रा) प्रारंभापासूनच अत्यंत परममित्र होते. तसेच सारनाथ येथे केलेल्या 'धर्मचक्रप्रवर्तन'च्या प्रवचनानंतर गौतमबुद्ध, सर्वप्रथम या बिंबिसारासच भेटण्यास आला. त्यानंतर तो आपल्या परिवारातील अकरा लोकांसह 'बौद्ध' बनला. तो जीवनभर बौद्धधर्मास सहाय्य करीत राहिला. : (विनय. १.३५)

त्याने बौद्ध वा जैन धर्म स्वीकारला नव्हता. तो सर्वधर्मसहिष्णू होता.

**(७) : अजातशत्रू- उदयन - 'महापद्म' नंद- चंद्रगुप्त मौर्य;** हे बौद्धकालीन सम्राट, जैन -बौद्ध- वैदिकांचा समानरूप आदर करीत.

(८) अर्थात- ' महापद्म नंद' हा 'शिशुनाक - बिंबिसार' - वंशीयच असलेने व 'बुद्ध'-'बिंबिसार' हे " महापद्म-नंद- पूर्व" असलेने, महापद्मास जैन ग्रंथांनी " बुद्धपूर्व:" व म्हणूनच "**चोरपूर्व:**" असे म्हटले झाले. विद्वानांकडून या वास्तवाचा विचार व्हावा.

**२) बुद्ध: १ ला : ('जार चौरा') :** (भा.अ.च.को./गोडबोले. पृ. ३३४.)

१. 'बोध' प्राप्त 'साधक' व्यक्तीस 'बुद्ध' असे, बौद्ध वाङ्मयात मानलेले आहे. तसेच : 'बुद्ध' : पहिला- दुसरा-तिसरा असे तीन झाले. बुद्धांची संख्या बौद्धवाङ्मयात- २५, दीपवंशामध्ये - ७, व 'बुद्धवंश' मध्ये - २५ अशीही उपलब्ध आहे (नांवांसह):

**-" यद्यपि भगवान बुद्ध एक एव बोधयिता**
**तथापि बौद्धव्यानां बुद्धिभेदा ! " श्चातुर्विध्यं !**
**: "यथागतोऽ स्तमर्क इत्युक्ते ' जार चौरा ' -**
**नूचानादय : स्वेष्टानुसारेणाऽभिसरण**
**परस्वहरण सदाचरणादि समयं बुध्यंते ! "**

:(सर्वदर्शनसंग्रह)

=("जरी या चौघांस 'भगवान बुद्ध' हा एकच 'बोधकर्ता' होय. तथापि ते बोधग्राहकांच्या बुद्धिभेदाने चातुर्विध्य झाले. जसे, 'सूर्य अस्तास गेला', इतके म्हणतांच, **'जाराची व्यभिचाराकडे'**, व **'चोरांची परद्रव्य-हरणाकडे'** आणि सदाचार संपन्नांची सदाचरणादिकांकडे प्रवृत्ती होते, तसे हे बौद्धमतांतील तात्पर्य समजावे.")

२. उपरोक्त श्लोकांतील **'जार'**, व **'चौरा'** हे दोन्ही संदर्भ, बुद्धसंदर्भात जसे आहेत, तसेच ते **'महापद्मनंदा'** सही जोडले जाऊन त्यास व त्याच्या वंशजांसही

'जारज'-संतती, 'चोर-पूर्व:' असे संबोधले गेले व, त्यांचा कुलेतिहास किती हीन पातळीवर नेऊन ठेवण्यात 'इंग्रज'-संशोधक कसे व किती मोठ्या प्रमाणात 'यशस्वी' ठरलेत, ते पाहिले तर मती गुंग होऊन जाते ना ?

## ३. पूरक : ३ रे :

१. **'नापित'** : (आणि 'उपासक':) :(मृच्छकटिक : प्रक. ८ वे.)

१) 'मृच्छकटिक'-नाटकात 'भिक्षू, शकार व विट' यांचा एक संवाद आहे:-

-" **भिक्षु**- स्वागतम् 'प्रसदितूपासक: ।, (उपासक प्रसन्न राहो ! )

: **शकार** - मित्र, पश्य - पश्य ! आक्रोशित माम् !

(मित्रा, बघ-बघ ,हा मला शिवी देतोय !)

: **विट** - किं ब्रवीति ? (हा काय म्हणतोय?)

: **शकार** - **'उपासक'** इति मां भणति ! **किमहं 'नापित :' ?**

: (हा मला उपासक म्हणतोय ! मला याने **'उपासक'** असे म्हणायला, मी **काय 'नापित' (नाई/न्हावी/** barber) आहे की काय ? याने मला **'नापित' म्हणावे** की काय ?)

: **विट** - **'बुद्धोपासक'** इति भवन्नं स्तौति ! (अरेरे ! हा तर तुला खरे म्हणजे **'बुद्धाचा उपासक'** म्हणवून तुझी प्रशंसाच करतो आहे !)"

-या एकंदरीत प्रकारावरून दिसून येते ते असे की : जे-जे म्हणून 'बुद्धा'चे/ बौद्धांचे/ बौद्धांविषयी सहानुभूती असणारांचे 'उपासक'/'चाहते' असतील ते-ते सर्व **'उपासक'** याच शब्दाने संबोधल्यानेच तेही **'नापित'**च मानण्याची प्रवृत्ती पूर्वी या देशात अस्तित्वात होती, कार्यरत/ कार्यक्षम होती ! अर्थात (बौद्ध) **'उपासक'** हेही **'नापित'**ही व **'शूद्र'** ही ! गणले जावेत, हे दुर्दैव नव्हे ?

२)'उपास्'(२ आ.):

= १. to sit near to (with acc.)

२. to sit at the side of.

३. to serve (as shudras -?)

३) 'उपासीन' = १. sitting near to,

२. attending on, serving.

४) 'उपासक' = 'नापित' : (मृच्छ. ८ वे प्रक.)

= १. जो जवळ बसतो (with acc...?) तो उपासक !

: sitting near to.

: sitting at the side of.

२. 'नापित' सर्वांच्या जवळ बसतो. सर्वांची सेवा / शेव्हिंग करतो, म्हणून 'उपासक'/'शूद्र' ?
३. 'जवळ /बाजूस बसणारा'.
४. भजणारा, ५. सेवक, ६. शूद्र,
७. 'बुद्धाचा संसारी भक्त.' (म्हणून का तो : 'नापित' ?)
(A worshipper of Buddha as distinguished from 'भिक्षु'! ??)
८. 'नापित' : (?) (नाई, न्हावी, A barder : उपासक)

५) ही सर्व जंजाळे, "नापित-पुराणे", महापद्मनंदाच्या कुलमूलत्व-इतिहासास कशी भोवली आहेत याचाही साक्षेपी व शांति-सापेक्षी पूर्ण विचार, विचारवंतांकडून होणे महत्त्वाचे ठरेल !

## ४) पूरक : ४ थे :

**१. अष्टलोकपाल स्वरूप 'क्षत्रिय राजा':**

'क्षत्रिय राजा' वैदिक परंपरेनुसार 'अष्टलोकपाल स्वरूप असतो ! :(मनुस्मृती)

**'सोमा ग्न्यर्कानिलेंद्राणां वित्ताप्पत्योर्यमस्य च ।**
**'अष्टानां लोकपालानां' वपुर्धारयते नृपः ॥** :(मनु. ५. ९६)

= (:'राजा हा-

१. चंद्र, २. अग्नी, ३. सूर्य, ४. वायू, ५. इंद्र, ६. कुबेर, ७. वरुण, तथा ८.यम - या आठ लोकपालांच्या अर्थात जगताच्या आठ संरक्षक देवतांच्या शरीरांना धारण करतो, त्यांचाच तो अवतार धारण करीत असल्याने पवित्र असतो. !)'

२) **"चंद्राग्नि सूर्यवायु शक्रयमानां वित्तस्यपां च पत्योः कुबेर वरुण यो रेवमष्टानां लोकपालानां संबंधि देहं राजा धारयति !"**

३) राजा, अष्टलोकपालांचे गुणधर्मांनी युक्त असल्याने तो प्रजेविषयी त्या अष्टलोकपालांचीच यच्चयावत कर्तव्ये, त्यांच्याच रीति-पद्धतींनी पार पडीत असतो.

४) ही संकल्पना भारतीय साहित्यात विपुलतेने ठायी-ठायी वर्णिल्याचे आढळून येते.

: या वास्तवाकडे भारतीय संशोधकांचे दुर्लक्ष का? कसे ?

## ५. पूरक : ५ वे :

'काल' ( देवता ) हा शूद्रा पुत्र कसा ? (धर्मराज=यमराज=यमधर्म):
:(स्पष्टीकरण/आधार.):

"शूद्रमातेच्या पोटी तू जन्म घेशील"-मांडव्यऋषींचा शाप (दंड !) यमास- कालदेवतेस. (म.भा.आ. ६३.९३ ते ९७; १०१.२५ ते २७)

-तोच अवतार : 'विदुर' (?) (दासी/ शूद्राणी-पुत्रः ? ?)

-'धात्री' म्हणजे, माता-उपमाता-पृथ्वी-भूतधात्री.

-'पृथ्वी' हीच धात्री, माता, उपमाता, भूतधात्री, शूद्रा, दासी, अदिती, !

-कालदेवता (यमधर्म) हा 'पृथ्वी' या धात्रीचा-मातेचा-उपमातेचा-भूतधात्रीचा-शूद्रेचा/शूद्रीचा, दासीचा, अदितीचा, संपोषणकारीणी धरणीचा पुत्र !

म्हणून 'दासीपुत्र' = धात्रीपुत्र = शूद्रापुत्र = पृथ्वीपुत्र !

- तेच अंबया, अंबा, अंबिका, अंबालिका, अंबि, यांचा अर्थ 'माता' असाच आहे. त्यातून विदुरजन्मसंबंध जोडला गेला.

- तोच संदर्भ 'महापद्मास'ही जोडला गेला.

●●●


The
EMPIRE OF ASOKA
Rock Edicts
Pillar Edicts
Hindu Kush
GANDHARA
KASHMIR
ARACHOSIA
GEDROSIA
ASOKA'S EMPIRE
MALAVA
MAGADHA
PUNDRA
SURASTRA
PULINDAS
MAHARASTRA
ANDHRAS
KALINGA
KERALAPUTRA
PANDYAS
TAMRAPARNI
(CEYLON)
Longitude East of Greenwich

# ३. सातवाहन : शककर्ता सम्राट सातवाहन यांच्या क्षात्र-वंश-वर्णाविषयी एकसत्य संशोधन !

★ सातवाहन हे 'क्षत्रिय'च होते, अर्थात ते 'क्षत्रियेतर' अशा कोणत्याही वर्णाचे नव्हते. असे मत डॉ. (मिस) भ्रमर घोष, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, वि. का. राजवाडे, भगवानलाल इंद्रजी यांनी मांडले आहे. 'भारतीय संस्कृति कोश, खं. ९, मध्येही याच मतास पुष्टी देण्यात आलेली आहे.

सातवाहनांच्या कोरीव लेखांत अथवा अन्य क्षत्रिय राजांच्या अभिलेखांत ते सातवाहन हे कुणी 'ब्राह्मण', 'वैश्य', 'शूद्र', 'अनार्य' आहेत; अशी एकही नोंद उपलब्ध झालेली नाही.

पुराणांतही सातवाहनांना 'क्षत्रियेतर' असा कोणताही 'वर्ण' जोडलेला नाही.

प्राचीन काळापासून भारतीय इतिहास परंपरा सांगते की, 'क्षत्रिय' हाच पूर्व प्रजामान्यतेने 'राज्याभिषेक' करवून घेतल्यानंतरच राजपद उपभोगण्यास 'अधिकारी' आहे. अर्थात, 'सातवाहन' हे 'सार्वभौम सम्राट'होते, त्याअर्थी मूलतःच 'क्षत्रिय वर्णीय' होते, 'वंशपरंपरेने राजकुलीन' होते।



★'वितंड': (सातवाहन - वर्ण-कुलाविषयी)
१) तीन कांट्यांचे कुलूप,
२) 'हत्ती' (स्त्री.)
३) 'खोटा स्व-पक्ष प्रस्थापिणे':(म. भा. २)
४) 'खोटा वादविवाद.'
५) 'पोरकट कोटी.'
६) 'चर्चा'

★ **अनुक्रम:**
-सातवाहनांच्या 'सात्' -रंगी 'इंद्रधनुष्या'तील-

■ **पूर्वरंग:**

१) पार्श्वभूमी: व 'एक-शोधन'
२) सम्राट सातवाहन : वेगळेपण
३) सातवाहन : वंश व वर्ण कोणता ?
४) सातवाहन : 'कोरीव लेख'
५) सातवाहन : नाणी व चिन्हे
६) सातवाहन : 'सूर्यवंशत्व'
७) पुराणे, कथा व सातवाहन.



■ **उत्तररंग :**

१) प्रास्ताविक
२) दृष्टान्त-बोध
३) राजपद- परंपरा
४) सातवाहन: 'वर्ण'
५) 'सातवाहन' - व्युत्पत्ती
६) तात्पर्य व निर्णय
७) पूरके .

## ● १: पूर्वरंग :

**(१) पार्श्वभूमी:**

१. 'सातवाहन' महाराष्ट्राच्या ज्ञात इतिहासातील पहिला 'क्षत्रिय'राजवंश आहे. त्यांनी सुरू केलेला **'शक'** आजही महाराष्ट्रात प्रचलित आहे. त्यांच्या नांवाने गेली १९१९ वर्षे महाराष्ट्रात घरोघरी 'गुढी', 'तोरण' उभारण्यात आले.

डॉ. वा. वि. मिराशींच्या मते सातवाहनांचा राज्यकाल सुमारे इ.स.पू. २३० ते इ.स. २३० मानण्यात येतो. यातही संशोधकांच्यामध्ये मतभिन्नता आहे. त्यांची राजधानी 'पैठण' मानली जाते.

२. सातवाहन-नृपतींना 'पुराणे' ही 'आंध्र' संबोधतात. सातवाहनांच्या शिलालेखांत हा 'शब्द' आढळत नाही. पुराणांतील सातवाहनांचा तपशील व शिलालेखांतून मिळणारा तपशील यांचा मेळ बसविणे संशोधकांना अवघड होऊन बसले आहे. सातवाहन नृपतींची संख्या सुमारे ३२ इतकी उपलब्ध आहे. (पुराणीं ३० वा कमी जास्त).

३. **'हाल'** नामक सातवाहन-नृपतीने **'गाथासत्तसई'** नामक ग्रंथात ७०० हून अधिक तत्कालीन **'गाथा'**चे संकलन केले आहे. त्यांत तत्कालीन समाजजीवनाचे सर्वांगीण दर्शन घडते. त्याचबरोबर इतिहास-दर्शनही घडते. गाथासंख्या : (१) १००६: संपा. स. आ. जोगळेकर : (२) १००४; काव्यानुवाद : राजा बढे.

४. या सातवाहन-नृपतींचे शिलालेख, नाणी इ. महाराष्ट्रात, आंध्रप्रदेशाव, कर्नाटकात उपलब्ध झालेले आहेत. त्यांच्या इतिहासाची ही साधने इ. स. १८३७ पासून आजवर वेळोवेळीं इंग्रजी, हिंदी, मराठी व भारतीय अन्य भाषांतूनही प्रकाशित झालेली आहेत.

५. अशा उपलब्ध लेखांचे संकलन व अभ्यासपूर्ण संपादकीय विवेचन डॉ. वा. वि. मिराशींच्या 'सातवाहन व पश्चिमी क्षत्रप यांचे कोरीव लेख आणि इतिहास' (१९७९), या ग्रंथात उपलब्ध आहे.

६. या ग्रंथात (पृ. १२९ वर) डॉ. वा. वि.मिराशी म्हणतात. ''(सातवाहनकालीं भारतात).... त्याने (ब्राह्मणाने) आपले आयुष्य वेद-अध्ययनात, यज्ञ-अनुष्ठानात व धर्म-उपदेशात घालवावयाचे असे. त्याला (ब्राह्मणाला) व्यापार, सावकारी, वैद्यकीय इ. व्यवसाय करता येत नसत.'' :(आपस्तंब धर्मसूत्र: १-६-१८-२१ ते २३).

-'' आपत्कालीन मात्र हे निर्बंध शिथिल केले जात. सामान्यतः ब्राह्मणाने पाहण्याकरिताही शस्त्र हातात घ्यावयाचे नसे. ''

– **''परीक्षार्थोपि ब्राह्मण आयुधं नाददीत।''** : (आ. ध. सू. १.१०. २९६)

''पण समाजात बंडाळी माजून धार्मिक जीवन अशक्य झाल्यास 'क्षत्रियां'प्रमाणे 'इतर 'द्विजातींनीही' शस्त्र हाती ग्रहण करावे; असे 'मनुस्मृती' (८.३४८ ते ३५१) म्हणते.''

''त्याला अनुसरुन 'अनेक ब्राह्मणांनी वर्तन केल्याचे प्राचीन भारतीय इतिहासात नमूद आहे.''

''शुंग, काण्व, सातवाहन, वाकाटक, कदंब (व मुंड !) इ. प्राचीन भारतातील प्रथित राजवंश 'ब्राह्मण -जाती' चे होते (!)

:(पृ. १३० वरून): 'क्षत्रिय वर्णाची कर्तव्ये, वेदांचे अध्ययन, यज्ञानुष्ठान, दान,

शस्त्रग्रहणआणि प्रजारक्षण ही होत.''

७. डॉ. वा. वि. मिराशी यांनी, 'सातवाहन हे ब्राह्मण होते.' या आपल्या मताच्या पुष्टिकरणार्थ 'मनुस्मृती'चा दिलेला आधार सर्वथा अप्रस्तुत आहे. ब्राह्मणांनी आपत्कालीं शस्त्र धारण केले तर त्यांना 'हिंसे'च्या दोषाच्या पापापासून ती सोडवणूक आहे. यात 'हार्ती' शस्त्र धारण करून, 'राज्याभिषेक' करवून घेऊन, 'राजपद' उपभोगण्याचा अधिकार 'मनुस्मृती' क्षत्रियेतरांना देते; असा येथे कसलाही संकेत नाही.

८. डॉ. वा. वि. मिराशींनी इतरही काहींच्या प्रमाणे अभिनिवेशपूर्णतेने ज्या 'कदंब' व 'सातवाहनांना', 'ब्राह्मण' मानले आहे ते राजवंश 'क्षत्रियच' होते. असे काही संशोधकांचे प्रतिपादन इतिहासात नमूद आहे. उदा:-

१) 'सातवाहनांविषयी : १. डॉ पु. ग. सहस्रबुद्धे, २. डॉ. (मिस) भ्रमर घोष, ३. भगवानलाला इंद्रजी, ४. वि. का. राजवाडे, ५. रा. रा. भागवत, ७.वि. रा. शिंदे, इ.

२) 'कदंबांविषयी : १. भारताचार्य चिं. वि.. वैद्य इ. (म. यु. भा. २ ).

९. वस्तुतः कोणताही भारतीय राजवंश, 'ब्राह्मण' असणे संभवनीय नसे. पण प्रत्येक अभ्यासकाने आपले संशोधनाचे वेगळेपण सिद्ध करण्याकरिता 'या राजवंशांच्या'विषयी त्यांचा 'वंश' व 'वर्ण' या संदर्भात 'क्षत्रियेरत्व' जोडण्याच्या आटोकाट खटपटी केल्या आहेत.

१०. (१) 'कदंब, पल्लव, चालुक्य' हे राजवंश क्षत्रिय होते, असे चिं. वि. वैद्य यांनी 'मध्ययुगीन भारत'मध्ये प्रतिपादित केले आहे.

(२) 'कदंब क्षात्रकुलाचे होते.' ले. रा. आ. कदम. (पाहा: 'पैलतीर' : दिवाळी अंक - १९९३: पृ. ११३ ते १३१; संपा. प्रा. कृष्ण सदाशिव गुरव, कोल्हापूर, लेख शीर्षक : ''कदंब क्षात्र-राजकुलाच्या वंशवर्णाविषयी ऐतिहासिक सत्याचा विपर्यास ! '') तसेच प्रस्तुत ग्रंथातील लेखांक १ ला.

११. 'सातवाहन' राजकुल वंश व वर्ण-दृष्टया कोण होते?

- याविषयी संशोधकांनी काय म्हटले आहे?

- त्यांच्या शिलालेखांतील महत्त्वपूर्ण शब्दांचे अर्थ संशोधक कोणते देतात ? व -

- त्याच शब्दांचे **'वास्तव अर्थ'** कोणते आहेत? त्यांतून सातवाहनांचा 'वर्ण' निश्चित होतो किंवा कसे? व -

-प्रत्यक्ष भारतीय राजनैतिक परंपरांविषयी समाजमान्यता काय होती?

- यांविषयी संक्षेपाने प्रस्तुत लेखात विचार करावयाचा आहे.

**(२) 'सम्राट सातवाहन' : वेगळेपण :**

**१) सातोस्कर, बा.द.** :(गोमं. इति. खं. २: पृ. ९६):

१. उत्तर भारतीय राजवंशीय परंपरा मोडून, सातवाहनांनी साम्राज्य स्थापिले व सर्व दक्षिण तथा उत्तरेतही काही भागांत ते सत्ताधीश बनले.

२. पुराणांत वर्णिलेल्या राजवंशांपैकी फक्त 'सातवाहन' या राजवंशाचेच कोरीव लेख, नाणी, मुद्रा इ. साधन-संचय उपलब्ध आहेत. त्यांतून त्यांची माहिती मिळते.

३. प्राचीनांपैकी 'सातवाहन'हेच फक्त सर्वांत अधिक दीर्घकाल अर्थात सलग ४५० वर्षे राजसत्तेवर होते.

४. नाणी पाडून प्रचलित करणारे व नाण्यांवर राजाचे नांव कोरणारेही तेच सर्व प्रथमचे राजे होते.

५. कोरीव लेण्यांची प्रथा सातवाहन कारकीर्दीतच सुरू झाली.

६. 'संस्कृत' ऐवजी 'महाराष्ट्री प्राकृत'चा 'राजभाषा' म्हणून स्वीकार व पुरस्कार सातवाहनांनीच केला.

८. बौद्धांचे धार्मिक वर्चस्व झुगारून सनातन वैदिक धर्माला प्रतिष्ठा सातवाहनांनीच प्राप्त करून दिली. यज्ञसंस्कृतीचे समर्थ पुनरुज्जीवन केले, इतर कोणत्याही राजवंशापेक्षा संख्येने अधिक व विभिन्न प्रकारांनीही अधिक असे यज्ञ यांनीच केलेत.

९. बौद्ध व जैन धर्मांविषयी सातवाहन सहिष्णू होते.

**(३) सातवाहनांचा, तज्ज्ञ-मतें 'वर्ण' कोणता?:**

१. महानुभावीय 'हत्तीच्या दृष्टान्ताप्रमाणे विदेशी व देशी अभ्यासक सातवाहनांना वेगवेगळे वंश व वर्ण, प्रादेशिकता इ. जोडतात. अंधांच्या समूहातील ज्याला जो हत्तीचा शरीरावयव हातीं लागला त्याप्रमाणे हत्ती आहे, असे प्रत्येकाने म्हटलेय. (पाहा : दृष्टान्त पाठ : संपा. रा. शं. नगरकर.)

२. 'सातवाहन' 'क्षत्रिय होते : (डॉ. रा. गो. भांडारकर (?), डॉ. (मिस) भ्रमर घोष, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, ना. य. मिरीकर, बा. द. सातोस्कर, भगवानलाल इंद्रजी.)

[Ind. Cul. 1934, P. 513-15, महाराष्ट्रसंस्कृती, पृ. ५८, गोमं. १, पृ. ९९, Trans. int. Cong. Ori. London, 1874, p. 310-311] : (वि. का. राजवाडे : ज्ञाने. प्रस्ता. पृ. ७९)

३. 'सातवाहन' हे 'ब्राह्मण' होते. (विदेशी व एतद्देशीय संशोधक : जसे डॉ. वा. वि. मिराशी, 'महाराष्ट्र परिचय-पृ-४८७; सेनार्ट, बुह्लेर, डॉ. हेमचंद्रराय चौधरी, डॉ. रतिभानुसिंह 'नाहर', मुजुमदार आर.सी., आळतेकर अ. स. )

४. 'सातवाहन' हे 'वैश्य' होते : (वि. का.राजवाडे, ज्ञाने. प्रस्ता. , जी. कृष्णा.)

५. ''सातवाहन हे 'शूद्र' होते.'' : (चिं. वि. वैद्य, डॉ. डी. सी. सरकार, डॉ. श्री. व्यं. केतकर,डॉ. एच. सी. राय चौधरी,बा. द.सातोस्कर)

६. 'सातवाहन : हे 'द्रवीड' होते : (व्हिंसेंट स्मिथ).

७. 'सातवाहन : हे 'मातृगोत्रनामधारी' होते : (डॉ. केतकर, डॉ. मिराशी, चिं. वि. वैद्य)

८. 'सातवाहन : हे 'अनार्य' होते : (आधुनिक भारतीय अभ्यासक).

९. 'सातवाहन' हे 'जैन' व 'जैन- समजाती'चे होते. : (जैन ग्रंथ : 'तीर्थकल्प', : प्रा.म. १ पृ. ३५).

१०. 'सातवाहन' : हे 'सूर्यवंशी' (Solar Stock) होते. : (स. आ. जोगळेकर)

११. ''सातवाहनांचा वंश व वर्ण हे 'अनाकलनीय' आहेत.''
:(अ. स. आळतेकर : महा. स्टेट गॅझे. १९६८ पृ. ७.५८, ७११)

१२. ''सातवाहनांविषयीच्या अनेकविध उपपत्त्या अंतिमतः 'अग्राह्य'च आहेत.
:(गोपालाचारी)

१३. ''सातवाहनांची व्युत्पत्ती काहीही असो.' (डॉ. रा. श्रीं. मोरवंचीकर, 'सातवाहनकालीन महाराष्ट्र': १९९३ पृ. ५१; डॉ. वा. वि. मिराशी.)

१४. "the Final Decision Must await future discoveries." : (Dr. H.C.R. Chaudhari: p. 415) 10 P.)

१५. 'सातवाहन'-व्युत्पत्ती हे 'न सुटलेले कोडे'; एक कूट प्रश्न आहे.'
: (स. आ. जोगळेकर)

१६. एक विद्वान संशोधक म्हणतात.: ''सातवान व सातकर्णि'' या नांवांचे अन्वयार्थ लावण्याचे अनेक संशोधकांचे विविध दृष्टिकोनातूनचे प्रयत्न म्हणजे, एक प्रकारे निरर्थक, निरुद्योगी, निष्फळ, बेकार (idle) आहेत. (Indian Culture II, P. 552).

**(४) सातवाहनांचे शिलालेख :**

१) सातवाहनांचे एकूण ३४, व चुटुकुलानंद सातकर्णी यांचे ३ असे ३७ शिलालेख उपलब्ध आहेत; ते सर्वच, 'प्राकृत'; 'महाराष्ट्री' मध्ये आहेत.

२) सातवाहनांचे शिलालेख (महाराष्ट्रात) २३ ठिकाणी व महाराष्ट्राबाहेर ३ ठिकाणीं उपलब्ध झाले आहेत.

३) सातवाहनांचा 'ताम्रपट' एकही उपलब्ध नाही. तसेच त्यांचा संस्कृतमध्येही एकही 'लेख' उपलब्ध नाही.

४) एक 'अशुद्ध संस्कृत' व एक 'आधी संस्कृत रचनेचा व नंतर तोच प्राकृतमध्ये रूपान्तरित करण्याचा प्रयत्न केलेला, असे दोन शिलालेख मात्र (सातवाहनांचे) आढळतात.

५) प्रस्तुत लेखात विवेचनासाठी मुख्यतः -

– '' सातवाहन आणि पश्चिमी क्षत्रप यांचा इतिहास आणि कोरीव लेख,' संपा. डॉ. वा. वि. मिराशी; १९७९. या ग्रंथातील शिलालेखांचा विचार केलेला आहे.

६) सातवाहनांच्या ३४ कोरीव-लेखांतील इतर महत्त्वपूर्ण शब्दांपैकी काही लक्षणीय शब्द पुढीलप्रमाणे आहेत.:-

१. सिद्धं (१९ वेळा), २. सातवाहन (५), ३. सादवाहन (१), ४. सादवाहन

कुल (१), ५. सातकणि (४), ६. सदकणि (१), ७. सातकणिस (६), ८. महारठी (थी) (५), ९. आर्य (५), १०. गोतमीपुत्र (८), ११. कोसिकिपुत्र (३), १२. माठ (  ढ) रिपुत्र (१), १३. वासिठीपुत्र (११), १३. रञो, राञो रणो, राजिनी ('राजा, राज्ञः) (२०) १५. सिमुक (श्रीमुख) (१), १६. कुमारवरस (३), १७. महामाता (१), १८. महादेवी (५), १९. राजमाता (१), २०. राजरञो (१), २१. गोतमीबलश्री (१), महादेवी (१) २२. महाराजमाता (१),२३. महाराजपितामही (१), २४. दक्षिणापथेश्वर (१),२५. नायनिका (१):(हिच्या नांवाची नाणीही आहेत.)

**(५) सातवाहनांची नाणी : त्यांवरील लेख व प्रतीक-चिन्हे :**

१) सातवाहनांच्या नाण्यांवर पुढील 'प्रतीक-चिन्हे'आढळतात. (एकूण २७ पैकी). : (स.आ. जोगळेकर) व (डॉ. रा. श्री. मोरवंचीकर)

| क्र. | चिन्हे | संख्या |
|---|---|---|
| १. | वर्तुळात वर्तुळ व बिंदू | (४):(४) |
| २. | उज्जैनचिन्ह | (११):(२८) |
| ३. | स्वस्तिक | (४):(५) |
| ४. | हत्ती | (८):(१४) |
| ५. | छ-कारचिन्ह | (१):(१) |
| ६. | त्रिकोणी ध्वज | (४):(३) |
| ७. | ध्वजस्तंभ | (..):(१) |
| ८. | कठडा व वृक्ष | (३):(२) |
| ९. | टेकड्या : पर्वत | (१०):(१६) |
| १०. | नदी-माता | (५):(१०) |
| ११. | बैल | (३):(३) |
| १२. | नंदीपाद | (-):(१) |
| १३. | पांचपर्णीवृक्ष | (१):(१) |
| १४. | त्रिरत्नचिन्ह | (१):(१) |
| १५. | अष्टार-चक्र (१२ अरे) | (१):(१) |
| १६. | चंद्रकोर | (५):(११) |
| १७. | मत्स्य व नदी | (२):(१) |
| १८. | भाला(अंकुश) | (१+१):(१+१) |
| १९. | अश्व | (३):(२) |
| २०. | वर्तुळात स्वस्तिक | (१):(.) |
| २१. | स्त्री (संमुखी) | (१):(-) |
| २२. | सिंह (शार्दूल) | (१):(२) |
| २३. | नृप-मुखवटा | (५):(५) |

| | | |
|---|---|---|
| २४. | 'सूर्य' | (३):(५) |
| २५. | नौका | (१):(-) |
| २६. | दोन शिडांचे जहाज | (१):(२) |
| २७. | समुद्र | (१):(-) |
| २८. | शंख | (१):(३) |
| २९. | कमल | (-):(२) |
| ३०. | वेदिका | (-):(२) |
| ३१. | मानव (उभा) | (-):(१) |
| ३२. | मानव (दंडधारी) | (-):(१) |

**(६) 'सातवाहन व सातकर्णी' : 'सूर्यवंशत्व' !**

१) 'सह्याद्री' : (पृ. १७२-१७३) : :(स. आ. जोगळेकर)

१. सातवाहन = सप्तवाहन = 'सूर्य': (असे जोगळेकर मानतात.) :(ऋ.८.७२-१७३)

२. सूर्योपासककुलीन असे सातवाहन होते.

३. भाजे : सूर्यगुंफा - लेणी : शोध : इ.स. १८७९ प्रतिमा : इंद्र व सूर्याच्या: ऐरावतावर आरूढ इंद्र हाती अंकुश; 'पताका' हाती' घेऊन सेवक उभा.

दुचाकीरथात 'सूर्य' : दोन पत्नींसह; छत्र व चवरीधारी: रथांना ४ घोडे जुंपलेले: 'राहू'ला तुडवणारे.

: (Journal of the indian Society of Oriental Art. June - Dec. - 1939.).

४. नायनिकेच्या शिलालेखात आरंभी 'इंद्र, संकर्षण (=बलराम), वासुदेव (=केशव, श्रीकृष्ण)' यांनाही वंदन आहे. 'लोकपालां'ना वंदन आहे. सूर्य व चंद्र यांसही वंदन आहे.

**२) सातवाहन व सातकर्णी : लेख 'सूर्यवंशत्व':**

(B.O.R. Annal : 27-1946. P. 247-287) S. A. Jogalekar.).

१. 'बाणा'च्या 'हर्षचरिता'त, 'गाथा सत्तसई' (हाल-कृत)च्या कर्त्याविषयी म्हटले आहे:-

''अविनाशितम ग्राम्यमकरोत् सातवाहन: ।

**विशुद्धजातिभि:** कोष: रत्नैरिव सुभाषितै: ॥'' (= क्षत्रिय ?)

२. 'राजशेखर' हा सातवाहनांविषयी म्हणतो : -

-''जगत्यां ग्रथिता गाथा **'सातवाहन भूभुजा'**' (=क्षत्रिय राजा)

व्यधुर्धुतेस्तु विस्तारमहो चित्रपरंपरा ॥''

**३. यज्ञ व सातवाहन: 'अश्वमेध'** यज्ञ व **'अश्व'** हे 'सूर्यप्रतीक' आहे; हा यज्ञ, फक्त सूर्यवंशीय क्षत्रिय-नृपतीसच करण्याचा अधिकार आहे; आणि तो सातवाहन

नृपतींनी केला होता. (Crooke : Religion Folklore of Northern india : P. 30).

- (Hewitt:History and Chronology of the Myth Making Age:P 99).

4. I am inclined to connect it with the **'Sun,'** with the Solar-**Stock,** and not yet with the **Solar-Line'.** - S. A. Jogalekar.

५. 'सातकर्णी' = 'सात किरणांनी युक्त सूर्य' = वा 'सूर्यकिरणे' = सूर्यशर =सूर्याच्या सात कर्णिका, = कमळ = सूर्योपासना प्रतीक = सूर्यप्रतीक = सूर्यकिरणरूपी बाण !

**६. सातवाहन-नाण्यांवरील चिन्हे:**

उज्जैन-चिन्ह, स्वस्तिक, भाला (=अंकुश), अश्व, सूर्य कमल, इ. ही 'सूर्यवंशाची' प्रतीके आहेत.

**३) अशा प्रकारे -**

१. प्रदेश व धर्म, २. सोयरे व स्पर्धक, ३. राजधानी व बिरुदे, ४. पूर्वज व वंशज (वारस), ५. पूर्वाधिकारी व उत्तराधिकारी, ६. दंतकथात्मक मूळ व वंश; आणि ७. विवाहसंबंधजन्य नातलग, व पुरोहित -

**- अशा सर्वांगांनी सातवाहनांच्या कुलाचा विचार करता, 'सातवाहन' हे 'सूर्यवंशाचे' (of Solar-Stock, but not of solar -Line) होते, असेच सिद्ध होते.**

**(७) पुराणे, जैनग्रंथ, दंतकथा : व 'सातवाहन' :**

१. अनेक पुराणांत सातवाहनांचा तपशील येतो. पण कोणत्याही एका पुराणातील त्या तपशिलाचा दुसऱ्या पुराणातील तपशिलाशी मेळ बसत नाही.

:(डॉ. केतकर, जोगळेकर).

२. जैनकथांचे परीक्षण : (डॉ. केतकर):

- ''जैनकथा अनुकरणात्मक आहेत. शालिवाहन-जन्माची कथा 'गुणाढ्य' - कथेचे अनुकरण आहे. शूद्रक-कथाही अनुकरणच आहे. त्या कथा बृहत्कथेत (कथासरित्सागरात) येऊन गेल्या आहेत. **जुन्या कथा नवीन पुरुषांना चिकटविणे ही त्यांची प्रवृत्ती आहे. अर्थात यास ऐतिहासिक महत्त्व नाहीच.**

**:(पूर्वरंग : पूर्ण)**

## ● २: उत्तर रंग :

**(१) प्रास्ताविक :**

१. युरोपीय तथा भारतीय अभ्यासकांनी सातवाहनांचा 'वंश' व 'वर्ण' याबाबतीत अनेक मते व्यक्त केलेली आहेत. त्यापैकी काही मते संकलितपणे या

लेखाच्या '**पूर्वरंगा**'त दिलेली आहेत. त्यावरून सर्वसामान्य वाचकांना 'निश्चित' असा कोणता 'बोध' होतो, हे लक्षात येतही नाही. चक्रावादळाने उठलेल्या धूलिकणांच्या आवर्तांत गुरफटल्याची फरपट मात्र त्यांच्या पदरी येते; जीव गुदमरून जातो.

२. आता '**उत्तररंगा**'त जे विवेचन आहे ते 'सातवाहनांचा वर्ण' व 'वंश' निश्चित करण्यापुरतेच मर्यादित आहे. त्यातून 'वर्णव्यवस्थेतचा पुरस्कार' किंवा 'विशिष्ट वर्णाची श्रेष्ठता' अथवा 'कनिष्ठता' यांच्याशी कोणतीही बांधीलकी प्रस्तुत लेखकाने बाळगलेली नाही. 'आमचे,' आम्हां भारतीयांविषयीचे इतिहाससंशोधन व इतिहासलेखन आजवर कोणत्याही दिशेने घडले, घडते आहेही, त्याची 'सत्यासत्यता' येथे फक्त पडताळली आहे. आणि सातवाहनसंदर्भात हे एक प्रकारें सुवर्ण-'शोधन'-कार्य मानून त्यातील संभवनीय 'हिणकस', 'अशुद्ध', 'तर्कदुष्ट', 'कल्पित', 'असत्य' व 'असंबद्ध' असे ते ते काढून टाकण्याचा येथे यथाशक्ती प्रयत्न केलेला आहे. तो कितपत 'निर्णायक' व 'निश्चितीपूर्ण' साधलेला आहे ते वाचकांनी, जाणकारांनी व इतिहासलेखनाचे व्रत उचललेल्यांनीही ठरवावयाचे आहे.

### (२) दृष्टान्त बोध:

१. प्रस्तुत लेखाच्या 'पूर्वरंगा'त 'हत्तीचा दृष्टान्त' उल्लेखिला आहे. त्यावरून ज्याला जसा 'हत्ती' जाणवला, तसा-तसा त्याने-त्याने वर्णिला. तीच स्थिती 'सातवाहन' राजवंशाविषयीच्या वंश व वर्णाविषयी इतिहास-संशोधकांकडून घडलेली दिसते.

### (३) राजपद-परंपरा:

#### १) 'राजा' व 'क्षत्रिय' :

१. 'राजा' व 'क्षत्रिय' या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. संस्कृत भाषेचे शब्दकोशकार '**राजा**' शब्दाला '**पर्यायी**' शब्द म्हणून '**क्षत्रिय**' हा शब्द देतात. जसे :-

२. राज, राजा = राट्, क्षत्रिय,
- राजन्य = क्षत्रिय : (वै. १.२५),
- राजन्यकं = क्षत्रियसमूह. "राजन्यानां समूहो राजन्यकं ! "
- राज्यं = राजत्व, क्षत्रियत्व.
- विराज = (विराट), क्षत्रिय : (भा ४. २७.६.)
= ब्रह्मांडाभिमानी आदिपुरुष.
-राजपुत्र = क्षत्रिय राजकुमार.
-धनुर्वेद = राजविद्या = क्षत्रियविद्या. (छां. उप. ७.१२.).

३. हे तसे खरे असले, तरी त्या 'क्षत्रिया'ला; परंपरागत पात्रता पूर्ण केलेल्या

क्षत्रिय पुरुषाला प्रजेने मान्यता दिल्यानंतरच त्याला 'राज्याभिषेक' होत असे व त्याला 'राज्यकर्ता राजा' ही पद्वी प्राप्त होत असे.

४. 'मनुस्मृती' म्हणते -

-''**ब्राह्मं प्राप्तेन संस्कारं 'क्षत्रियेण' यथाविधि ।**
**सर्वस्यास्य यथान्यायं कर्तव्यं परिरक्षणम् ॥**''

(मनु. ७.२)

= (वेदाध्ययनाकरिता 'क्षत्रिया'चा उपनयन संस्कार यथाविधी आटोपला म्हणजे सर्वांचे धर्मोक्त रक्षक होणे, हे त्याचे कर्तव्य ठरते.)

५. 'क्षत्रिया'चे समानार्थक पर्यायी शब्द: (अमरकोश : ७६७): -

''**मूर्धाभिषिक्तो राजन्यो बाहुजः 'क्षत्रियो' विराट् । (=क्षत्रिय)**
**राजा, राट्, पार्थिव - क्ष्माभृन् - नृप- भूप- महीक्षितः ॥**''

२) **परंपरेने राजपदाधिकारी कोण ?** : ('दासशूद्रांची गुलामगिरी', शरद पाटील : भा. २, पृ. ४३ ते ४८) : -

१. चातुर्वर्ण्य समाजात 'जन-गण' हा केवळ आपल्या 'क्षत्रिय'-वर्णाच्या - राजन्य-कुला'तूनच 'राजा' निवडू शकत असे. २. प्रजापालनाचे -राजत्वाचे काम क्षत्रियांचेच-

-''**क्षत्रियोश्वाश्रितो धर्मः प्रजानाम् परिपालनम् ।**
**क्षत्राद्वृत्तिर्ब्राह्मणानाम् तैः कथं ब्राह्मणो वरः ॥**''

:(कार्तवीर्योवाचः १५३-१७,१८)

=( प्रजेचे परिपालन व धर्माचे संरक्षण करण्याचे काम **क्षत्रियांमुळेच** होते.)

३. 'राजत्वा'चा मान '**कृषिकर्मविद्यापारंगत**' अशा '**क्षत्रियांचाच**' आहे.

४. 'क्षत्रिय राजा' व 'ब्राह्मण राणी' यांच्या संततीस 'क्षत्रियजनगण' हे 'क्षत्रियाभिषेका' ने 'अभिषिंचित' करणार नाहीत; असे अंबट्ठ माणवक हा गौतमबुद्धास सांगतो. त्याचे कारण देताना तो म्हणतो - 'मातेकडून त्याचा वंश शुद्ध नाही !' :(अंबट्ठ हा 'ब्राह्मण' होता ! ) : :(पृ. २१७.)

५. 'ब्राह्मण पिता' व 'क्षत्रिय माता' यांच्या पुत्रासही 'क्षत्रिय जनगण' हे 'क्षत्रियाभिषेका' ने 'अभिषिंचित' करणार नाहीत. असेही अंबट्ठ हा गौतमबुद्धास सांगतो. याचे कारण देताना तो म्हणतो-''पित्याकडून त्याचा वंश शुद्ध नाही.''

:(पृ. २१८)

**६. क्षत्रियत्व व राजपद :** :( चातुर्वर्ण्य : तळवळकर : पृ. १०३)

**(१) ''आ राजानां ... क्षत्रिया यातमर्वाक् !''** :(ऋ. ७-६४-१)

= (पृथ्वी आणि आकाशातील उदकांचे स्वामी, अशा हे उदकप्रेरक, अर्यमनसहित मित्रावरुण 'राजांनो' (क्षत्रियांनो !) तुम्ही आमची हविर्द्रव्ये भक्षण

करा.).

२) **"धृतव्रताः क्षत्रियाः .....क्षत्रमा शतुः ॥"** :(ऋ. ८.२५.८)

= (सृष्टिसामर्थ्याधिपति क्षत्रिय, सत्यनिष्ठ-कर्तृत्ववान आणि नियामक 'मित्रावरुण' सृष्टीवर 'राज्य' करतात.)

३) **'क्षत्रिय-यज्ञे' :**

**- "क्षत्रिय-यज्ञे क्षत्रिय : यजमान : स्वान्यायुधानि ।**
**निधान 'ब्रह्मण' आयुधानि स्वीकरोति ॥ "** :('ब्राह्मण' : नव्हे ! )
:(ऐत. ब्रा., आर. ३४-१-१९), (पृ. ३५-३६)

**(४) 'क्षत्रियस्य अभिषेकान्ते':**

"क्षत्रियस्य अभिषेकान्ताग्निष्टोमयागोदाहरणं जनमेजय : पारीक्षित : ॥'
: (ऐत. ब्रा. ३७.७.७ ते ९)

७) 'आंगिरस', अत्री, कण्व : हे क्षत्रियच ! : :(पुराणे)

१. आंगिरस - कुल हे 'क्षत्रिय' होते. : (ऋ. मंडल ९ वे चा कर्ता. ) त्याचा पूर्वज **'रथीतर'** हा होता.

'एते क्षत्रप्रसूता वै **पुनश्चांगिरस** : स्मृतः ॥' : (विष्णुपु. अ.३.)

= (म्हणजेच यांचा जन्म 'क्षत्रिय-कुलात झाला आणि पुढे त्यांस 'आंगिरस' असे नांव प्राप्त झाले. 'आंगिरस'-घराणे 'राजर्षि'चे होते.

२. आंगिरस-कुलोत्पन्न 'शौनाक' हा'क्षत्रिय'च होता; तो वसिष्ठ-गोत्रात गेला.

३. अत्री व आंगिरा हे परस्परांचे 'साडू' होते.

४. अत्री-ऋषी हा 'क्षत्रिय' होता; 'राजर्षि' होता. या 'अत्री'चा पुत्र क्षत्रियकुलोत्पन्न 'सोमराजा' हा 'चंद्रवंशी क्षत्रिय' घराण्याचा मूळ पुरुष होय. याने 'राजसूय'-यज्ञ केला होता. (हा ऋ. मंडल ५ वे कर्ता आहे.):
: (विष्णुपु.)

५. 'कण्व' हाही क्षत्रियराजा पुरुचा वंशज, 'पौरव कुलोत्पन्न क्षत्रिय' होता. ( ऋ. मंडल ८ वे चा कर्ता ), अप्रतिरथ (किंवा अजमीढ) चा तो पुत्र होता.
: ( विष्णुपु., भाग. पु.)

६. 'रथीतर' हा 'अंबरीष' राजाचा पणतू होता.

७. 'आंगिरस हारित' यांचा जन्म, 'इक्ष्वाकू' (सूर्यवंशी क्षत्रिय) कुलातला होता.

८. सातवाहन हे , आपले कुल 'आंगिरस' हेच सांगतात. 'आंगिरस-कुल - विवर्धन' असे सातवाहन होते.

९. 'नाभाग .... अंबरीष' 'इ. सम - तेजस' असा गौतमी पुत्र सातकर्णी होता, असे क्र. १८ (नाशिक लेणी - लेख) या लेखात नमूद आहे.

**८) 'क्षत्रिय हाच राजा !' :** (साहित्य समीक्षण : ना.गो. चापेकर. पृ. ३१३)

**-"क्षत्रियैर्धार्यते चापो नार्तशब्दो भवेदिती !"**

९) 'भृगू', इत्यादी घराणी : (प्राचीन भारत इतिहास:आर. सी. दत्त) :

१. भृगू , कण्व, वामदेव, भारद्वाज, आंगीरस या वेदसूक्तद्रष्टयांची घराणी 'राजर्षी' ची अर्थात 'क्षत्रिय ऋषी' ची होती." : (विष्णु पु. ४.१०.; भाग. पु. ९.२०. ६ व ७)

१०) 'क्षत्रिय'च 'राजा': इति कौटिल्य : (कौ. अर्थ. १७)

"रक्षितो राजा राज्यं रक्षत्यासन्नेभ्य : परेभ्यश्च ।
पूर्वं दारेभ्यः पुत्रेभ्यश्च ! " ...... (इति भारद्वाजः ।)

- "नृशंसमदृष्टवध : 'क्षत्रबीजं' विनाशश्चेतिः" (विशालाक्ष : ।)

= (अंत:शत्रू व बहि:शत्रू यांच्यापासून सुरक्षित असा राजा न्यायाने राज्याचे रक्षण करू शकतो. अंत:शत्रूंत स्त्रियांपासून व राजपुत्रांपासून संरक्षण-विचार हा मुख्य होय.

- 'राजपुत्रां'चा (अर्थात क्षत्रिय राजांच्या संततीचा) गुप्तपणे वध करणे, अन्यायाने त्यांना वधिणे, हे राक्षसी कृत्य आहे. व तसे केल्यामुळे, 'क्षत्रिय-कुला'च्या 'बीजाचाच' नाश होईल. म्हणून 'राजपुत्रा'ला अंत:पुरात एखाद्या निर्दिष्ट ठिकाणी बंदीत ठेवणेच श्रेयस्कर होईल.)

३) महाराष्ट्र व 'ब्राह्मण' :

: (हाल : गाथासत्तसई : संपा. स. आ. जोगळेकर) :(पृ. २८६)

१. 'गाथा सप्तशती'च्या संपादन-कालापूर्वी समाजात ४ किंवा ३ 'वर्ण' अस्तित्वात होते. पण या सर्वांचा किंवा वर्णांचा मागमूसही 'हाल'च्या गाथासप्तशतीत आढळत नाही.

२. येथे 'वर्ण' (= रंग)- क्रम आहे. पण तो केवळ भित्तिचित्रांत ! सामाजिक जीवनात नव्हे ! (गाथा क्र. ६१२, ७३२).

३. हे. स. आ. जोगळेकर लिखित विवेचन जिज्ञासूंनी पृ. २७३ ते २७६ वर सविस्तर वाचावे, व ब्राह्मणांचे अस्तित्वच मूळात सातवाहन नृपतींच्या काळात महाराष्ट्रात नव्हते याचा बोध घ्यावा.

४. अशा स्थितीत 'सातवाहन' हे क्षत्रिय असणार, की ब्राह्मण असू शकतात याविषयी साधारणपणे तरी विचार करावा.

५. महाराष्ट्रात सातवाहन-सत्ताकाळात 'ब्राह्मण'वर्णीय जनसमूह हे दक्षिणापथात (महाराष्ट्रात) निवासासाठी आलेले दिसत नाहीत, असे अभ्यासकांचे विवेचन आहे.

:(पाहा : मऱ्हाट संस्कृती : शं. बा. जोशी. पृ. ६०)

६. 'शालिवाहन वंशातील राजाने 'अश्वमेध' केल्याचे, किंवा 'ब्राह्मणां' स जेवू घातल्याचे कोठे शिलालेखात नाही, व तशी दंतकथाही नाही."

: (रा. रा.भागवत : नि. सा. /आ. २. १९७९: पृ. २९)

७. गाथासप्तशती'चे संपादक स. आ. जोगळेकरही याच मताचे दिसतात. (पाहा:

: उपरोक्त १ ते ३ शी संदर्भित विवेचन):.

**४) संकलन :**

'राजा हा 'क्षत्रिय'च असे. याचे विवेचन पाहिल्यानंतर त्याचे सैनिक 'क्षत्रिय' वर्णाचेच असावेत, असे कौटिल्यानेही म्हटल्याचे आढळते. उदा. : (कौटि. अर्थ.)

**१. क्षत्रिय सैन्यच व्यवहारात: व फलत: सर्वश्रेष्ठ :**

**''- ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र सैन्यानां 'तेज' प्राधान्यात्**
**पूर्वं पूर्वं श्रेय: संनाहयितुम् इति आचार्या : नेति कौटिल्य ।**
**प्रणिपातेन ब्रह्मबलं परां ऽभिहास्येत् ।**
**प्रहरण-विद्या-विनीतं वा 'क्षत्रिय-बलं' श्रेय: ॥''**

= (चार वर्णांचे सेनेत 'तेजस्विते'च्या गुणाने 'ब्राह्मणसेना श्रेष्ठ ! हे आचार्यांचे मत होते ! पण -

''ब्राह्मणांना 'नमन' करून शत्रु-लोक आपल्या पक्षात ते सैन्य वळवून (फितवून) घेतील !' अशी भीती (!) वाटून चाणक्यांनी 'शस्त्रविद्या शिकलेले क्षत्रिय सैन्यच श्रेष्ठ !'' असा आपला अभिप्राय व्यक्त केला आहे.

२. चाणक्य-काळात, क्षत्रियांचे भयाभावाने, 'परशुरामाने नि:क्षत्रिय पृथ्वी बनविल्याची कथा महाभारताचे पुन:संस्करण करणाऱ्या भार्गव-कुलोत्पन्नांनी महाभारतात सर्वत्र पेरून दिली व लोकप्रिय केली.

:(अशोक ते कालिदास १९६२ : पृ. ४२; अ.ज. करंदीकर.)

३. 'ऐतरेय ब्राह्मण' : (३४.१.२९. व ३७.७.७ ते ९):

-जसे सैन्याच्या बाबतीतले 'क्षत्रियसेनाश्रेष्ठते'चे धोरण, तसेच; 'क्षत्रियालाच राज्याभिषेक करावा' असे 'ऐतरेय ब्राह्मणात' ही म्हटलेले आहे. हे प्रस्तुत लेखात क्र. (३) (२) ६ (३), व (४) मध्ये स्पष्ट केलेले आहे.

४. 'मनुस्मृती' : (अ. ८. ३४८ ते ३५१):

-क्षत्रियांच्या गुणधर्मांची श्रेष्ठता विशद केल्यानंतर - द्विजांनी आपत्कालींच हातीं शस्त्र धरावे, ग्रहण करावे, त्यात हिंसेचा दोष लागत नाही. असे 'मनुस्मृती' म्हणते.जसे: (मनु.८.३४८ ते ३५१), हेही लक्षणीय आहे. यात राजपदप्राप्तिअधिकाराचे विवेचन नाही.

५. **'तांडच-ब्राह्मण'** : (नवा हिंदुधर्म : म. शास्त्री दिवेकर : पृ. ११६): 'तांडच-ब्राह्मण-मतें-

'ब्राह्मण' हे 'राजपदाला' अधिकारी नाहीत, 'राज्य करण्याला योग्य नाहीत, कारण त्यांचे शौर्य वाणीत प्रकट होते. तो क्षत्रियापेक्षा दुबळा, अकिंचन, परावलंबी असतो असेही सांगितले जाते.

- हा 'अन्वय' आणि 'व्यतिरेक' अभ्यासकांच्या सहज नजरेत भरणारा आहे !

६. 'ब्राह्मण' हे, 'राजे' झाले नाहीत !

:(भारतीय साम्राज्य' -११, पावगी : १८९३. (पृ. ५२ ते ५४)

"In arrogating the priestly Function,they (the indian Brahmanas) gave up all claims to the " Royal Office." they were divinely appointed to be the guides of nations and the counsellors of " kings " but they could not be " **kings themselves** " :(P. 52): (Dr. Hunter's Indian Empire. pp. 94).

- ("ब्राह्मणांनी अंगी योग्यता असूनही धर्मकार्ये ज्ञानोपासना, ग्रंथनिर्मिती व राजांना सल्ला देणे यांतच आपले जीवन वेचिले, पण ते स्वत: कधीच 'राजपदस्थ' बनले नाहीत").

**(४) 'सातवाहन' यांचा 'वर्ण' कोणता ?**

**१) 'सातवाहन' क्षत्रिय होते :**

१. सातवाहन हे क्षत्रियच होते. अर्थात ते 'क्षत्रियेतर' अशा कोणत्याही वर्णाचे नव्हते, असे मत डॉ. (मिस) भ्रमर घोष, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, वि. का. राजवाडे, भगवानलाल इंद्रजी यांनी मांडले आहे. 'भारतीय संस्कृती कोश, खं. ९, मध्येही याच मतास पुष्टी देण्यात आलेली आहे.

२. सातवाहनांच्या कोरीव लेखांत अथवा अन्य क्षत्रिय राजांच्या अभिलेखांत ते कुणी 'ब्राह्मण', 'वैश्य', 'शूद्र', 'अनार्य' आहेत; अशी एकही नोंद उपलब्ध झालेली नाही.

३. पुराणांतही सातवाहनांना क्षत्रियेतर असा कोणताही 'वर्ण' जोडलेला नाही.

**२) जैन साहित्य व दंतकथा :**

जैन साहित्य, कथासंग्रह, दंतकथा यांतून सातवाहनांचे वर्णन 'संकरज', 'जारज' असे स्वरूप जे दर्शविले आहे, तो तपशील ऐतिहासिक विश्वसनीय साधनांच्या दृष्टीने महत्त्वहीन आहे. :(डॉ.श्री. व्यं. केतकर: प्रा.म. १)

**३) एकवाक्यतेचा अभाव :**

"आजवरच्या भारतीय इतिहास संशोधक व अभ्यासक यांच्यांत सातवाहन-वर्णासंबंधी एकवाक्यता आढलेली नाही; " हे मत अनेक संशोधकही मान्य करतात.

**४) सातवाहनांची वर्ण-विभिन्नता :**

१. असे विवेचन असले तरीही अभ्यासकांनी सातवाहनांचा 'वर्ण' निश्चित करताना वेगवेगळी मते आजवर वेळोवेळी मांडलेली आहेतच. म्हणजेच हा विषय तसा बहुचर्चित, दीर्घचर्चित व तरीही अनिश्चित व अनिर्णितच राहिल्याची स्थिती आहे.

२. सातवाहनांच्या वर्णनिश्चितीचे संदर्भात, 'सातवाहनशिलालेख' व 'नाणी-लेख-चिन्हे' यांच्या आधारें सर्वविध संशोधकांनी ठरविलेला त्यांचा वर्ण:-

अ) १. क्षत्रिय, २. ब्राह्मण, ३. वैश्य, ४. शूद्र - असा वेगवेगळा नोंदविलेला आहे.

आ) काहींनी तर त्यांना -

१) आंध्र, २) अनार्य, ३) द्रवीड, ४) नाग, ५) जारज, ६) संकरज, ७) मातृवंशनामधारी, ८. परकीय- असेही म्हटल्याच्या नोंदी इतिहासात आढळतात.

इ) बा.द. सातोस्कर तर आपणांस अशा संभ्रमाच्या भोवऱ्यात सोडून देतात की -''सातवाहन हे गोव्यातील देवदासींची संतती असतील काय ?''

: (गोमं.इति.भा.१ व २ सातो.)

**५) सातवाहनांचा 'वर्ण' : त्यांच्याच लेखांधारे :**

**१. 'सिद्ध' हे शब्दपदः**

१) प्राचीन व मध्ययुगीन भारतीय राजकुलांच्या अभिलेखांच्या प्रारंभीं 'सिद्धं' हे शब्दपद येते. हेच पद सातवाहनांच्याही सर्व शिलालेखारंभीं येते.(='सत्य',सूर्य,'ब्रह्मः')

२) क्षहरात, कार्दमक, वाकाटक, कदंब, चालुक्य, इक्ष्वाकू, चुटुकुल, खारवेल, गंग, राष्ट्रकूट, होयसळ, यादव, शिलाहार, पल्लव ही सर्व राजकुले 'क्षत्रिय' आहेत. यांपैकी काही राजवंशांचे रक्तसंबंध वा विवाहसंबंध सातवाहनांशी होते. तेव्हा वरील प्रकारची समानता आढळणे हेच नैसर्गिक ठरते.

**२. 'देवता-वंदने':**

१) सातवाहनांच्या लेखारंभी पुढील दैवतांना वंदने आली आहेत : १. प्रजापती, २. धर्म, ३. इंद्र, ४. संकर्षण (=बलराम), ५. वासुदेव (श्रीकृष्ण), ६. चंद्र, ७. सूर्य, ८. चार लोकपाल, ९. कुमारवर (कार्तिकेय), १०. भगवंत. ही आर्य संस्कृतीची **क्षत्रियांची** दैवते होत.

**३. 'राजा' हे शब्दपद :**

१) सातवाहन नृपतींच्या नांवांपूर्वी, 'रञो', 'वीर', 'शूर', 'रथी' -'रठी', 'महारठी' 'महारथी' - इ. 'क्षत्रियत्व'-बोधक पदे आलेली आहेत.

२) या संदर्भात कालिदासाच्या 'रघुवंशा'तील पुढील उदाहरणे लक्षणीय ठरतातः-

१. ''दशरथः प्रशशास 'महारथो' यमवतामवतांच धुरि स्थितः ॥''

:(रघु.९.१)

२. '' स किल संयुगमूर्ध्नि सहायंतां मघवतः प्रतिपद्य 'महारथः'।'' : (रघु.)

३. ''कुतः प्रभावो धनंजयस्य 'महारथ' जयद्रथस्य विपतिमुत्पादवितुं।'' :(वे. २)

४. ''महारथ''=''एको दशसहस्राणि योधयेद्यस्तु धन्विनां ।

शस्त्रशास्त्रप्रवीणश्च विज्ञेयः स 'महारथ': ॥ : ('महारथ': ची व्याख्या)

**४ . यज्ञ-पुरस्कर्तेः सातवाहन :**

सातवाहनांइतके वेगवेगळ्या नांवांचे व संख्येने कुणांहीपेक्षा अधिक असे यज्ञ अन्य कोणीही राजाने केल्याचे आढळत नाही. अर्थात 'सातवाहन' हे सनातन वैदिक आर्य संस्कृतीचे पाईक, पुरस्कर्ते होते, अर्थात ते स्वतः वंश-वर्ण-कुलदृष्ट्या 'आर्य' होते; 'राजे व सम्राट' होते.

**५. 'आर्य शब्दपदे :**

१) सातवाहनांच्या लेखांत ४-५ वेळा 'आर्य'-अर्थक शब्दपदे (उदा. राजा अर्यक, आर्य महत्तर) आली आहेत, अर्थात सातवाहन हे 'आर्य' होते. ('आर्य': 1. Name of Brahmana, Kshatriya or Vaishya., २. 'मनु' सावर्णाचा पुत्र : 'आर्य', ३. राजा : (संबोधन.)

२) 'आय्यक' = आर्यक, (लेख क्र. ३०),

३) 'आय्यकेन', (लेख क्र. ३१),

४) पुढील वचन या संदर्भात लक्षणीय ठरते : -

१. ''इक्ष्वाकुवंशप्रभव : कथं त्वां त्यजेदकस्मात्पतिरार्यवृत्तः ॥''

:(रघु. १४.५५)

६. **'क्षत्रियत्व'-बोधक शब्दपदे :** (सातवाहनांची : त्यांच्याच लेखांतील):

(येथून पुढील विवेचनार्थ घेतलेली 'शब्दपदे' लेख क्र. १८ मधील आहेत. संपा. डॉ. वा. वि. मिराशी, १९७९) : -

१. **''दिवसकर (क) रविबोधित कमलविमल सदिस वदनस'':**

१. =(ज्याचे वदन 'सूर्या'च्या किरणांनी उमललेल्या 'कमला' सारखे 'विमल' व 'तेजस्वी' होते.)

२. येथे गौतमीपुत्र सातकर्णी याच्या मुखाची तुलना कमलाशी आहे. 'मुख' हे मनुष्याचे सर्वश्रेष्ठ अंग. त्याच्याच योगाने व्यक्तीची समर्पक ओळख पटते. त्याचा 'वर्ण' कळतो आणि तेच 'वदन' येथे, 'सूर्यकिरणांनी' उमललेल्या 'कमला'प्रमाणे आहे. अर्थात 'कमल' हे 'सूर्यप्रतीक' आहे आणि 'सूर्य' हा 'आर्य क्षत्रिय' वंशाचे प्रतीक आहे. तेव्हा हा नृपती 'क्षात्रवंशीय' व विशुद्ध वंशाचा आहे, हे सुस्पष्ट आहे. (तो कुणी संकरज, जारज, नाग-ज (सर्प-ज), अनौरस, विधवापुत्र, ब्राह्मणी-पुत्र, देवदासी (?) -पुत्र असा विभिन्न संशोधकांनी कल्पिलेला कुणीही-काहीही नव्हे !) त्याचबरोबरीने - या राजाचे 'प्रियदर्शनकारी' मुख होते, असेही पुढील शब्दपदात उल्लेखिलेले आहे : -

२) **-''पटिपुणचदमडलसासिरीकपियदसनस ।''** -

१. =(ज्याचे 'मुख' पूर्णचंद्रमंडलाप्रमाणे शीतल सुंदर व आनंददायक प्रियदर्शन स्वरूप मनोहारी होते.)

२. हे दोन्ही अर्थ या नृपतीचे 'सूर्य-सोम' वंशांनुसारी 'क्षत्रियत्व' दिग्दर्शित करतात. या शिवाय या पुढील दोन्ही पदांतील 'नाग' (=हत्ती) व 'भुजग' (नाग, सर्प) यांची त्याच्या चालीशी व 'भुजां'शी (=बाहूंशी) केलेली तुलनाही सूचक आहे. यातूनही पुराणकारांनी कल्पिलेला 'नागवंश' हाही 'क्षत्रिय'च होता, हे स्पष्ट आहे.

३. अशा या तुलनांतील सूचकता हे 'केवळ काव्य' नव्हे की 'नीरस गद्यही' नव्हे ! तर असे हे काव्याच्या विविध गुणवैशिष्ट्यांनी विनटलेले, काव्यलंकारसंपन्न, यमकानुप्रास-श्लेषपूर्ण 'काव्य' आहे, हे समजून घेणे अगत्याचे आहे.

४. 'सातवाहन'-नृपतीस जी-जी विशेषणे (क्र. १८ : नाशिक-लेणे:) लेखात आलेली आढळतात, तशीच विशेषणे कालिदासाने 'रघुवंशा'तही इक्ष्वाकुवंशीय नृपतींसाठी वापरली आहेत. (पाहा: रघु. ९.१६, ९.२०, १६.३०, १६.५३, १७.७७, १८.११, ११.४६, ५.६३, ७.४०.)

**३.) "वरवारण विकम चारु विकमस !"**

१. =(ज्याची चालण्याची ढब उत्कृष्ट 'हत्ती'च्या चालीप्रमाणे होती.)

२. येथे 'हत्ती' (=नाग) हे 'इंद्राचे प्रतीक; आणि 'इंद्र' हाच 'चंद्र'-वंश-प्रतीकांत अभिव्यक्त होतो. तो क्षत्रिय असून, क्षत्रियांचे दैवतही आहे.

**४.) "भुजगपति भोग पीन वाट विपुल दीघ सुदर भुजस !"**

१. =(ज्याचे 'बाहू' 'शेषा' (=भुजगपती) च्या शरीराप्रमाणे पीळदार, पुष्ट, लांब, सुंदर होते.).

२. येथे 'बाहू' हेच 'क्षत्रियत्व' - बोधक असून त्यांचा संबंध 'शेषा 'शी जोडलेला आहे. (शेष=नागराज,. हा श्रीविष्णूचे अभिन्न अंग आहे.)

('भुज=बाहू.'क्षत्रियत्वा''चे प्रतीक; रघु.९.२०)

३. उपरोक्त तुलनेत आलेला 'नाग' हा शब्दही 'सूर्या'शी (नग=सूर्य) संबंधित आहे, सूर्य-प्रतीक, सूर्य -वंश-प्रतीक, चंद्रवंशप्रतीक आहे. ते पुढीलप्रमाणे होते : -

- 'नग' = १. सूर्य, २. पर्वत, ३. वृक्ष, ४. सात (७) ही संख्या.

- 'नाग' = ('नग' चे वंशज, संतती वा संबंधित; ते सर्व 'क्षत्रिय'च होत.)

म्हणून १. सूर्य-ज, २. पर्वत -ज, ३. वृक्ष-ज; - हे सर्व, 'नाग'च ठरतात. शिवाय - ४. 'नाग' = चंद्र; चंद्रज.

:(गीर्वाणलघुकोशाधारे):

४. यावरून ही सर्व विशेषण-पदे व विवेचने पूर्णत्वाने 'क्षत्रिय'-वर्णाकडे झुकणारी सिद्ध होतात.

५. भुज+ग= 'भुज' हेच ज्यांची गती (जीवनवृत्ती, जीवन इतिकर्तव्यता,शौर्य, पराक्रम) आहेत, असे ते 'भुजंग' (भुजगपती = श्रीविष्णरूप परब्रह्म ।) = क्षत्रिय =भुजंग.

५. **"खतिय दपमान मदनस !"** (=क्षत्रिय दर्पमान मदनः ।):

१. डॉ. मिराशी या पदाचा अर्थ देतात, तो असा आहे: (पृ. ४३) वर =("जो क्षत्रियांच्या गर्व आणि अभिमान यांचे 'दमन' करीत असे.")

२. त्याच पृष्ठावर 'तळटीपे'त डॉ. मिराशी सुचवितात ; 'या शब्दपदात 'मदन' ऐवजी 'दमन' वाचावे, मात्र, याला ते कोणतेही कारण देत नाहीत. शिवाय इतर कोणत्याही अभ्यासकाने याविषयीचे कारण दिलेले आढळत नाही.

३. 'क्षत्रियां'चे 'दमन' करणारा असे म्हणवून घेणारा तो नृपती स्वत: 'क्षत्रिय-वर्णा'चाच कसा असेल ?

अशी शंका स्वतःच निर्माण करून तिचे उत्तर म्हणून काही अभ्यासक 'गौतमीपुत्रा'ला 'क्षत्रिय' न मानता, त्यास, तो 'क्षत्रियेतर' कुणीतरी असावा, असे मानतात.

४. आणि 'खतिय' म्हणजेही, 'क्षत्रिय'असाच अर्थ न घेता, 'क्षत्रिय' जसे इतर कुठल्यातरी जाती-जमातींचे (वन्यदेखील) कुणीतरी 'क्षत्रियेतर' जनसमूह असावेत,- असेही काही 'अभ्यासक' स्पष्टीकरण देतात. तर मग -

५. असा तो 'क्षत्रियेतर' कोण ? तर -

१) तो 'गोतमीपुत्र', 'ब्राह्मण'-वर्णीय होता, असे डॉ. मिराशी व अन्य काही अभ्यासक मानतात. मात्र -

२) तो 'क्षत्रियेतर'-गोतमीपुत्र, 'ब्राह्मण' च कसा गृहीत धरून निश्चित करता येईल?

- असा प्रश्न निर्माण करून, तो 'गोतमीपुत्र' स्वतः 'क्षत्रिय' ही नाही, वा 'ब्राह्मण' ही नाही, तर तो कुणीतरी 'अन्य वर्णीय', वा यवन, म्लेंच्छ, परकीयही असू शकतो!

- असे त्यांचे प्रतिपादन आहे !

(उदा. डॉ. भ्रमर घोष).

६. तेव्हा, 'मदन' या शब्दाचे जागी, 'मदन'हाच शब्द निश्चितपणे मानून लेख क्र. १८ मधील 'खतियदपमानमदनस' या पदाचा अर्थ स्पष्टपणे समजून घेऊन स्वीकारण्यात कोणास, काय व कां अडचण आली हे शोधता व सांगताही येत नाही आणि तसा खुलासाही कुठे उपलब्ध झालेला नाही.



७. आणि, अर्थातच 'क्षत्रिय-दर्पमान-मदनः !'' असे शब्दपद स्वीकारून या पदाचा अर्थ पुढीलप्रमाणे स्पष्ट करता येतो:

-१) 'जो क्षत्रियांच्या दर्प व मान या गुणांचे प्रत्यक्ष मदनरूप होता''. तरीही-

-२) 'क्षत्रिय दर्पमान मदन' यात - जशी-

'क्षत्रिय+दर्प मान +मदन'- अशी चार पदे मानता येतात, किंवा तीच -

- ३) 'क्षत्रिय-दर्पमान - मदन' - अशी तीनच पदेही मानता येऊ शकतात.

- येथे 'दर्पमान'चा अर्थ होईल, 'दर्पयुक्त', 'दर्पसंपन्न,' 'दर्पमंडित' !

- आणि या शब्दपदाचा अर्थ होईल -

''दर्पसंपन्न मदन !'' असा तो'क्षत्रिय' होता; गोतमीपुत्र सातकर्णी नृपती !

४) 'दर्प-संपन्न' (=दर्पमान) असा तो मदनरूप क्षत्रिय नृपती होता, असा अर्थ घेतल्याने मूळ शब्दपदाच्या अर्थामध्ये काही विशेष फरक न पडता, त्याचे एक गुणवैशिष्ट्य, जे की, 'मदना'चे आहे आणि तेच जे 'क्षत्रिय' या पदावरही आरोपित केले आहे ते म्हणजे, 'मान' (=१. युक्त, संपन्न, २. अभिमान) हे यातील 'अभिमान' या अर्थी वगळले जाते. पण येथे महत्त्वाचे हे आहे की, तरीही तो 'मान'चा 'अभिमान'

हा अर्थ 'दर्प' या शब्दाच्या अर्थामध्ये शिल्लक राहतोच. तेव्हा-

- ५) 'क्षत्रिय दर्पमान .... !" यातील दर्पमान' या शब्दापुढे 'मर्दन', 'दलन' वा 'दमन' हे तिन्ही शब्द अप्रस्तुत, असंबद्ध, विसंगत ठरतात. कारण 'दर्पमान' हे विशेषण ज्याचे आहे अशा कुणाचा तरी सूचक, समर्पक शब्दच या ठिकाणी असणे सर्वतोपरी उचित होय. शिवाय -

- ६) यापुढील शब्दपद आहे, 'सकयवनपल्लव-निसूदन'! यातील 'निसूदन'मधील 'दन' व 'मदन'मधील 'दन' या पदांच्या योगाने समुचित 'यमकसिद्धी' साधलेली आहे. हे पुष्टिप्रद ठरते.

-७) 'मर्दन' चा 'मदन' हा शब्द ही ग्राह्य धरता येत नाही, कारण तोही 'दलन', 'दमन' या शब्दांप्रमाणे वर्ण-कर्कशतेमुळे रसहानीस कारण ठरून काव्यात्मकतेस बाधक ठरतो.

'मदन' चे जागी 'मर्दन' असा शब्द काही अभ्यासकांनी 'सुचविला ' आहे. कां ? सातवाहानांना क्षत्रियेतर ठरविण्यासाठी !

८) या सर्व विवेचनाधारे 'क्षत्रियदर्पमानमदन' हाच शब्दबंध स्वीकारणें अपरिहार्य ठरते. तेव्हा याचे स्वीकारार्ह दोन्ही अर्थ पुनरावृत्त केले असतां-

१. क्षत्रियांच्या दर्प व मान या गुणांचे प्रत्यक्ष मदनरूप असा तो गोतमीपुत्र सातकर्णी होता. म्हणजेच-

- मदनाच्या दर्प व मान या गुणांचे प्रत्यक्षरूप (मूर्तिमंत साकारस्वरूप) असा तो 'क्षत्रिय' होता.

२. दर्पसंपन्न मदनाचे प्रत्यक्ष मूर्तिमंतरूप असा तो क्षत्रिय होता.

- वरील विश्लेषणाने गोतमीपुत्र सातकर्णी या, सातवाहन नृपतीचे स्वतःचे 'क्षत्रियत्व' निर्विवाद सिद्ध होते.

८. 'दर्प' व 'मान' या शब्दांचे कोशगत अर्थ पुढीलप्रमाणे आहेत :-

१) 'दर्प'= १. गर्व, २. ताठा, ३. मान, ४. उत्साह, ५. Pride (in good Sense), ६. अहंकार, ७. रोब (रुबाब, प्रभाव), ८. अहं !

-'दर्पक'=१. मदन, २. सिंह, ३. कामदेव, ४. कंदर्प, ५. मन्मथ, ('माद्यति अनेन!'), ६. मद निर्माण करणारा !

२) 'मान' = १. आदर, गौरव, सन्मान, २. अभिमान, स्वाभिमान,३.गर्व, ताठा, ४. प्रतिष्ठा, ५. Pride, (in good Sense).

३) 'मदन' = १. कंदर्प, २. प्रेम, ३. वसंत, ४. भ्रमरः (a bee), ५. मदवर्धकः (मदोत्पादक), मदनिर्माणकर्ता; ६. उत्साहवर्धक.

९. तेव्हा या सर्व अर्थांचा विचार करतां, 'दर्प' आणि 'मान' किंवा 'दर्पमान' ही पदे दोन्ही प्रकारे स्वीकारली तरी ती 'गोतमीपुत्र सातकर्णी' या नृपतीस 'अवमानकारक' ठरणारी नसून, ती 'मदना'च्या व पर्यायाने 'क्षत्रिया'च्या व्यक्तिमत्त्वाची

उचित परिचायकच ठरतात.

१०. उपरोक्त क्र. ७ (७) मध्ये नमूद केल्यानुसार, काही अभ्यासकांनी सुचविले आहे, की 'मदन' चे जागी 'मर्दन' वाचावे ! पण हा शब्द घेण्याने या पूर्ण शब्दबंधाचा अर्थ सुस्पष्ट न होता, संभ्रम मात्र वाढतो. 'मर्दन' चे कोशगत अर्थ आहेत :- १. चोळणे, २. कुटणे, ३. दळणे, ४. रगडणे, ५. घासणे, ६. धुव्वा उडविणे, ७. अंग रगडणे.

- अशा प्रकारे, अशा 'नको त्या अर्थांना सामोरे जावे लागते !

११. **'दर्पमान मदन'** विषयी : ('कंदर्पदर्प'):

१) 'दर्प' हा 'कंदर्पा' चा (म्हणजेच 'मदनाचा') मूलभूत गुण आहे. जसे की, 'कंदर्पदर्प' हा शब्दबंध संस्कृत साहित्यात वैपुल्याने आढळतो.

उदा. १. **"सन्त तमन्तः करणं दिव्यं भव्यं भुजंगगिरिसंगि ।**
**धाम श्याममयेयं विन्दतु 'कंदर्प-दर्प-हररूपम् !"**
: (अलंकार मणिहार : ४ पृ. ७-८, श्लो. १७२).

२. **"जहित्वं सदृशेष्वेव मानं दर्पंच मागध!"** : (म. भा. सभा. जरा. २२ २३).

= (हे मगधराज ! तू आपणांसमान 'वीरां'च्या बरोबरचा 'अभिमान' व 'घमेंड' करणे सोडून दे.)

३. 'मदन' या शब्दाद्वारे 'क्षत्रिय'-वाचक गुणवैशिष्ट्ये सांगणारे अनेक श्लोक संस्कृत साहित्यात आढळतात -

उदा. **कलावैदग्ध्यभिमानो, यथा -**

- **"तव प्रसादात्कुसुमायुद्धोऽपि सहायमेकं मधुमेव लब्ध्वा ।**
**कुर्यां हरस्यापि पिनाकपाणेर्धैर्यच्युतिं के मम धन्विनोऽन्ये ।।"**
(: शृंगार प्रकाश : ३ भोज : प्र. १९, पृ. ७२४ )

४. 'मदना' ने जन्मल्याबरोबर लगेचच मदपूर्वक म्हटले की,
-"मी कोणाचे ठायीं मद-'दर्प' निर्माण करू ?"
-त्यामुळेच 'ब्रह्मा'ने 'मदना'चे नांव 'कंदर्प' असे ठेवले !

- **"कं दर्पयामि इति मदाज्जातमात्रो जगाद च ।**
**तेन 'कंदर्प' नामानं तं चकार चतुर्मुखः ।।"**

५. वरीलपैकी, 'मदन' शब्दाच्या अर्थां पैकी-

१) मदवर्धक, २) मदोत्पादक, ३) मदनिर्माणक, ४) उत्साहवर्धक या चारांपैकी कोणताही एक किंवा चारही अर्थ एकत्र घेऊनच 'क्षत्रियदर्पमानमदनः ।' या शब्दपदाचे स्पष्टीकरण अत्यंत सुसंगतपणे, समर्पकपणे संयुक्तिक ठरते, शोभूनच दिसते.

६. कोणताही विनयशील, वेदविद्याविद, प्रजावत्सल, हिंसापराङ्मुख, शुश्रुषा-तत्पर, एक सम्राट, "संपूर्ण 'क्षत्रिय' जातिवर्णाचे दर्प व मानाचे मी 'मर्दन'-'दमन'

केले.'' - अशा प्रकारची भाषा मग्रूरतेने, उद्धटपणे वापरू वा उच्चारू वा शिलालेखरूपाने अंकित करू शकणे असंभवनीय आहे. यात तर 'अतिव्याप्ती'चाही दोष आहे हे कळण्याइतका तो नृपती नक्कीच सुज्ञ आहे. अर्थात 'क्षत्रियदर्पमानमदन' या शब्दपदात 'मदन' शब्दाचे जागी 'मर्दन' वा 'दमन' वाचून जो अर्थ संशोधकांनी प्रसृत केलेला आहे, तो पूर्णतः अप्रस्तुत व विसंगत होय.

७. तशातच, बऱ्याच संशोधकांना उत्कटतेने प्राथम्याने या लेख क्र. १८ मध्ये 'क्षत्रियान्तक परशुरामा' चीही आठवण झाल्याचेही या लेखाच्या स्पष्टीकरणात, इतिहासात नोंदले गेले आहेच. जसे:-

१) गोतमीपुत्र सातकर्णी हा 'प्रति परशुराम' जसा 'क्षत्रियदर्पमानान्तक होता.'(!)

२) गोतमीपुत्र सातकर्णी हा 'एक ब्राह्मण' असून तो 'परशुराम' जसा अतुलनीय 'ब्राम्हण' होता (!)

३) 'या लेखातील 'एक बम्हण' (=ब्राह्मण) या शब्दापदास जोडून लगेच पुढे 'राम-केशव-अर्जुन- भीमसेन' यांतील 'राम' हा जो शब्द आहे, तो म्हणजेच 'परशुराम' ! आणि या 'राम' रूप परशुरामाजसा 'क्षत्रियान्तक ब्राह्मण' असा 'गोतमीपुत्र सातकर्णी' होता..(!!) असेही काही संशोधकांचे प्रतिपादन आहे.

४) वस्तुतः 'परशुरामा'चे 'राम' त्व हे 'राघव रामा' शी त्याची भेट झाली त्याचवेळी संपुष्टात आल्याचे त्यानेच सांगून टाकल्याचे कथारूपाने संस्कृत साहित्यात नमूद आहे. शिवाय -

५) हा 'राम', केशवाचा (श्रीकृष्णाचा) ज्येष्ठ बंधू 'बलराम' आहे; याची 'समज' वरील विधानाशी संबंधित अभ्यासकांनी दुर्लक्षिल्याचे दिसते.

८. 'मदन' हा सौंदर्यदेवता जी 'रती,' 'तिचा 'पती' परंपरेने मानलेला आहे. तो तर जितका सुंदर, त्याहूनही अधिक सुंदर कोणी नायिका वा नायक आहे; असे सांगायचे झाल्यास 'कोटिकंदर्पलावण्यसुंदर' असा शब्दबंध वापरल्याचेही संस्कृत साहित्यात विपुलतेने आढळून येते. पण, 'क्षत्रियदर्पमानमदन' या शब्दपदात जो 'मदन' असा (दर्पसंपन्न असा) 'कंदर्प' अर्थात 'मदन' आहे. तो येथे 'सर्वश्रेष्ठ धनुर्धर' स्वरूपात आहे. येथे तो 'एक अद्वितीय योद्धा'(एक सूरस) स्वरूपात आहे. तो पुष्परूप अशा अमोघ पांच बाणांचा स्वामी आहे. तोच 'सर्वश्रेष्ठ दंडनविधीचा प्रथमप्रणेतास्वरूप प्रणेताही आहे. तो ब्रह्मा-विष्णू-शिव इत्यादिकांसह सर्व मनुष्यमात्रांस सहजलीलया जिंकतो, ते लढून किंवा जखमी करून नव्हे तर मनामनांना 'विकारवश' बनवून, मोहवश करून जिंकीत असतो !

९. 'मदन' हा प्रत्येकाच्या मनात जन्मतो. मनामनांवर आपले अधिराज्य गाजवितो; जसा की 'क्षत्रिय' राजा गोतमीपुत्र सातकर्णी हाही आपल्या सर्व प्रजाजनांच्या मनांत वास करतो. त्यांच्या मनांवर अधिसत्ता चालवितो; आणि म्हणून तो 'मदनस्वरूप क्षत्रिय' आहे, किंवा 'क्षत्रियस्वरूप' मदन आहे; 'क्षत्रियवर्णीय' सम्राट आहे.

१०. गाथासप्तशतीमध्ये हाच 'अजेय-अजिंक्य धनुर्धर' योद्धारूप 'मदन' अनेक गाथांतून वर्णिलेला आढळतो. तो 'दुर्जय', 'अपराजित' आहे. पराभव त्यास माहीतच नाही, जसे की 'कंदर्पदर्पदलने विरला मनुष्या : ॥ '

११. कालिदास म्हणतो, 'क्षत्रियराजा हा मदनच होय !'

-"**रम्यां रघुप्रतिनिधिः स नवोपकार्यां ।**

**बाल्यात्परामिव दशां 'मदनो'ऽध्युवास: ।"** :(रघु.५.६३).

=('रघुराजाचा प्रतिनिधी असा तो 'अज' नृपती,रम्य अशा नवीन राजमंदिरात; तारुण्यात ज्याप्रमाणे'मदनाने'वास करावा, त्याप्रमाणे अधिवास करता झाला !')

१२. मत्स्यपुराणातही 'झषकेतन' = मकरध्वज = मदन = मत्स्यध्वज याच्याविषयी 'क्षत्रिय' संदर्भित असाच उल्लेख आहे. :(मत्स्यपु. १५३-२१०)

**१३. 'मदना' ची वैशिष्ट्ये :-**

१) मदन हा धनुर्धर, अपूर्व धनुर्विद्यानिष्णात महात्मन आहे :

"**अपूर्वोयं धुनर्विद्या मदनस्य महात्मनः ।**"

२) मदन हा 'भूप' (राजा) आहे. : "**कंदर्पभूप रचिता नव कार्मणस्य ॥**"

३) मदन हा भुवनत्रय जेता' आहे : '**न कठोरं न वा तीक्ष्णमायुधंपुष्पधन्वनः । तथाऽ पि जितमेवा ऽऽ सीदमुनाभुवनत्रयं ॥**"

४) 'राम' हा 'मदन' आहे. : "**राममन्मथशरेण ..... ॥** " :(रघु.)

५) मदन हाच 'दर्पनिधी' आहे. त्रैलोक्यवीर 'स्मर' ही तोच आहे.

६) मदन मत्स्यकेतन, झषकेतन, मकरध्वज आहे, म्हणजेच मदनाचा संबंध मत्स्याशी अभिन्न असा आहे.

७) 'शल', 'सात्', 'हल' चे अर्थ एक 'मत्स्यभेद'- विशेष असे आहेत.

८) हेच 'मत्स्य-चिन्ह' सातवाहन - नाण्यांवरही आहे.

९) तेव्हा मत्स्य, मत्स्यध्वज-मदन, मदन, मदनरूप क्षत्रिय राजा गोतमीपुत्र,सातवाहन-नाण्यांवरील मत्स्यचिन्ह, कुंतल देश ही (महाराष्ट्र) मदनाची विलासभूमी आहे. मत्स्यावतार कथासंदर्भित चिन्हप्रतीके सातवाहन - नाण्यांवर असणे (नदी, पर्वत,नौका, मत्स्य इ.) या सर्वांचा संकलित समन्वय सातवाहनांच्या 'वर्णा' वर समुचित प्रकाश टाकणारा ठरतो. त्या दृष्टीतून विचार व अभ्यास झाल्याचे आढळत नाही.

७. "**सकय वन पल्हव निसूदन**" : = (सकल वन पल्लव निसूदन)

(डॉ. मिराशी पृ. ४३)

१) याचा अर्थ डॉ. मिराशी देतात, तो असा : -

"ज्याने शक यवन पल्हव यांचा उच्छेद केला होता."

- परंतु याच लेखात, आधीच "कितापराधे पि सतुजने अपाण हिसारुचिस ।"

या अशा गोतमीपुत्राच्या ध्येयधोरण, जीवननिष्ठा व गुणवैशिष्टयांशी डॉ. मिराशी देतात तो अर्थ सर्वथः विसंगत ठरतो, विरोध-वैगुण्य निर्माण करतो. वस्तुतः 'ज्याला अपराधी शत्रूंचेही प्राणहरण करण्यातील हिंसासुद्धा मुळीच आवडत नसे,'' असे हे गोतमीपुत्राचे गुणधर्म सांगणारे वाक्य आहे. त्यामुळेच या वाक्याचा संबंध कोणत्याही राज्यकर्त्यांशी वा जनसमूहांशी संबंध जोडणे अप्रस्तुत आहे. तसेच अन्य कोणत्याही राजवंशांचा या शब्दबंधांत उल्लेख नसणे,हेही त्या दृष्टीने निश्चितच सूचक व महत्त्वाचे आहे. म्हणून या शब्दबंधाचा अर्थ वाक्यपूर्णतेच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे करता येतो.-

-''सकय (=सकल) वनपल्लवनिसूदन ।'' म्हणजेच वनातील सर्वच्या सर्व पल्लवांनादेखील तो संपूर्णत : 'प्रिय' (='सूदन') होता. यावरून सर्व वनश्रीला 'प्रिय' असणारा तो गोतमीपुत्र सातकर्णी नृपती, जो 'क्षत्रियदर्पमानरूप मदन आहे.' तो, 'मदन' ठरतो किंवा 'वसंत ऋतू' ही ठरतो.

२) 'क्षत्रियदर्पमानमदन' या शब्दसमूहातील 'मदना'चा सखा 'वसंत आहे. मदनाचे एक 'बिरुद' आहे, 'पल्लवास्त्र'! 'तेव्हा 'सकल वन पल्लव निसूदन' या शब्दबंधातील 'पल्लव' शब्दाशीही मदनाचा असणारा अनुबंध स्पष्ट दृग्गोचर होणारा आहे. जिथे मदन तिथे वसंत आणि पल्लवही !

'निसूदन' किंवा 'निषूदन' म्हणजे -

-'सूदन' = १. ठार करणे. २. प्रिय; ३. अंगीकरण :

(''लखन, शत्रु-सूदन एक रूपा !'' - रामा.)

- 'निसूदन' = १. पूर्णतः ठार करणे; किंवा- २. संपूर्णपणे प्रिय.

- वरील (पूर्वनिर्दिष्ट) शब्दपद जे आहे की, 'कितापराधे पि सतुजने अपाणहिसारुचिस !''(म्हणजे, ज्याला अपराधी शत्रुजनांचेही प्राण हरण करण्यातील, त्यांना ठार करण्यातील हिंसा आवडत नसे).

- तेव्हा अशा प्रकारची अपराधी शत्रुजनांचेही प्राणहरण करण्यातील हिंसासुद्धा न आवडणार हा सम्राट 'शक-यवन-पल्हवां' ना ठार करतो, असा अर्थ सिद्ध करण्यात विसंगती व आंतर्‌विरोध निर्माण होतात, याचा विचार 'शक'-पक्षी अभ्यासकांकडून झालेला आढळत नाही.

येथे याच पदाचा दुसरा लक्ष्यार्थही अतीव लक्षणीय व महत्त्वाचा आहे :-

- ''जो आपल्या राज्यातील (वन = देश, प्रदेश : जसे : 'आनंदवन भुवन', म्हणजे महाराष्ट्र, वृंदावन, दंडकवन, कदंबवन, इ.) सर्वच्या सर्व (= 'सकल') प्रजाजनांना (='पल्लव', तरुपर्णे) प्रिय असा 'मदन' ही होता व पर्यायाने वसंतरूप असा सम्राट होता.''

- आपल्या प्रजाजनांच्या मनामनांवर त्या सम्राटाचे साम्राज्य होते. त्याची अबाध राजसत्ता - अधिसत्ता-सार्वभौम सत्ता होती. शिवाय तो आपल्या सर्व प्रजाजनांना मदन व वसंताप्रमाणे सौख्य, आनंद, कल्याण, मांगल्यादि नवनवोन्मेष सातत्याने बहाल

करीत असे.

३) पाकृतात 'पल्लव' आणि 'पल्हव' हे समानार्थक शब्द आहेत व ते दोन्ही पद्धतींनी वाचता-लिहिता येतात व त्यांचा अर्थ एकच, म्हणजे पालवी, कोवळी पाने, तरुपर्णे हाच आहे.

४) **'सकयवन':**

मूळ शब्दपदातील 'सकयवन' या शब्दाची फोड डॉ. मिराशींनी 'सक' - 'यवन' अशी केलेली आहे, व अर्थ सिद्ध केला आहे. शक आणि यवन जन-गण !

- पण, त्याऐवजी हीच फोड 'सकय' - 'वन' अशीही होऊ शकते. आणि 'सकय' या शब्दाचा अर्थ 'सकल' असा होतो.

कारण याच 'सकल' मधील 'ल'चे स्थानी 'य' येऊन प्राकृतात 'सकय' हा त्याच अर्थाचा पर्यायी शब्द बनू शकतो.

उदा. 'कलंब'चे रूप 'कयंब' असे होते.

जसे : १. ''जंबीरव 'कयंब' लिंब कदालीक पुगी खजुर ।''

('कयंब' = कलंब, कळंब)

(वर्णकसमुच्चय : भा.२. : संपा.डॉ.भो.जा.ज.सांडेसरा -१५५६ पृ.११३)

२. आभाय = आभाळ !

आणि - म्हणूनच-

-''सक यवन पल्हव निसूदन', - असे नव्हे, तर -

-'सकय-वन-पल्हव - निसूदन', अर्थातच-

=(''सकल -वन - पल्लव--निसु (षू) दन!'') असेही होऊ शकते.

८) **''खखरात वसनिरवसेसकरस । ''**

= ('क्षहरात -वश निरवशेषकरः ।')

= (ज्याने 'क्षहरातां' ना संपूर्णतः 'वश' केले होते)! मात्र-

१. येथे, डॉ. मिराशी याचा अर्थ देताना 'वस' ऐवजी 'वंस' वाचून अर्थ 'वंश' असा करतात. - म्हणून पूर्ण अर्थ ते असा देतात.-

- ''ज्याने क्षहरात वंश समूळ नष्ट केला होता.''

२. मात्र हा अर्थ अयोग्य ठरतो. कारण-

३. 'खतियदपमानमदन' या शब्दपदातील 'मदन'चा संदर्भ, व त्यानंतरचा - 'सकल वन पल्लव 'निसूदन' या शब्दपदातील 'मदन' तथा 'वसंत' यांचा संदर्भ, आणि त्यानंतर या दोघांच्या कर्तृत्वातून घडून येणारा 'वश' (=आपलेसे करणे) याच्याशी येतो.

-'खखरात-वश' म्हणजे 'क्षहरातांना' वश; अर्थात 'क्षहरातां' ना पूर्णपणे आपलेसे करणे, आत्मीय बनविणे.

४. 'वश' शब्दाचा, 'आपलेसे करणे', 'आपल्याशी सामावून घेणे' हा अर्थ

स्वीकारण्यातील वस्तुस्थिती अशी आहे की, सातवाहन नृपतींनी क्षहरात- कार्दमक यांच्या कुलांशी विवाह-संबंध जोडले होते. हा उल्लेख शिलालेखांतून उपलब्ध झालेला, अभ्याससकांना ज्ञात आहे.

१)"विनिवतित चातुवणसकरस" ! (सातवाहनसत्ता उत्तरभारतातही होती.)

= ('विनिवर्तित चातुर्वर्ण्यःकरः ।') : (विनियंत्रित- ?)

= (ज्याने चातुर्वर्ण्य- (संकर) थांबविला होता .) :

१) वर्णाश्रमधर्माचे रक्षण करणे, विनियंत्रण करणे, हे राजाचे कर्तव्य होय, हे कालिदासानेही सीतेच्या मुखातून स्पष्ट केले आहेः -

"नृपस्य वर्णाश्रमपालनं यत्स एव धर्मो मनुना प्रणीतः ॥"

:(रघुः १४.६७, १४.८५)

= ( सीता लक्ष्मणाजवळ रामासाठी म्हणते, "वर्णाश्रमांचे रक्षण म्हणून जे म्हणतात, तोच राजाचा 'धर्म'मनूने सांगितला आहे".)

२) सातवाहनांच्या कोरीव शिलालेखांचे अवलोकन (नाशिक लेणी लेख-संदर्भात) कालिदासाने 'रघुवंशा'ची रचना करण्यापूर्वी, मात्र 'मनुस्मृति' - रचनेनंतर केले असले पाहिजे, त्यामुळेच 'रघुवंशात' नाशिक लेखातील (लेख क्र. १८ डॉ. मिराशी संपादित : १९७९) बहुतेक सर्व महत्त्वपूर्ण शब्दपदे (शब्दपदानुबंध) कालिदासाने उपयोजिलेली आढळून येतात. (इक्ष्वाकुकुल-नृपतींसंदर्भात.)

३) सातवाहनांनी क्षत्रियांखेरीज अन्य कुणा वर्णीयांस विवाहसंबंधाने आपल्या मुली दिल्याची, किंवा त्यांनी क्षत्रियांखेरीज इतर वर्णीयांच्या मुली विवाहसंबंधाने आपल्या घराण्यात आणल्याची नोंद मुळीच उपलब्ध नाही. या वास्तवातच हे सिद्ध होते की, सातवाहन हे क्षत्रियच होते. अर्थात त्यांनी क्षत्रियांनाच मुली दिल्या, तथा क्षत्रियांच्याच मुली केल्या आहेत.

४) असे असूनही -

काही अभ्यासक असे लिहितात की, " सातवाहन हे सत्ताधीश राजेच असल्याने त्यांना इतर वर्णांच्या मुली मिळण्यास अडचण आली नसावी !"

- पण मग त्या 'क्षत्रियच' कशा ? कां ? याचे विश्लेषण कोणीही अभ्यासक देत नाही, तेही स्वतःचे उत्तरदायित्व आहे, हे त्यांना भासलेही नाही ?

५) सातवाहनांना 'ब्राह्मण' मानणाऱ्यांच्या दृष्टीने अशा विवाहाने, तथा सातवाहनांना 'शूद्र' इ. (क्षत्रियेतर) मानणाऱ्यांच्या दृष्टीनेही अशा विवाहाने उत्पन्न होणारे या संततीचे सामाजिक स्थान काय ठरते? तसेच-त्यांच्या वर्णजाती कोणत्या? याविषयी कोणीही अभ्यासक विश्लेषण देत नाही हे लक्षणीय ठरते !

६) 'चातुर्वर्ण्या' चा 'नियंता' राजाच 'चातुर्वर्ण्याचा भंजक-भंगकर्ता' (संशोधकांच्या सोयीसाठी) ठरवून, त्यालाच 'जारज,' 'संकरज', 'शूद्र', 'वैश्य', 'ब्राह्मण' असे सर्व काही ठरवून टाकले आहे !!

७) सातवाहन-कुलात पित्यानंतर पुत्रच सातवाहनवंशीयच (पितृप्राधान्याने) राजसत्तेवर आलेले दिसतात. त्यासाठी ते पुत्र 'औरस'(एकाच वर्णाचे माता-पिता' यांची संतती) असणे राजनीतिपरंपरेनुसार आवश्यक आहे, हे वास्तवही अभ्यासक दुर्लक्षिताना दिसतात.

८) 'धर्म-राज-अर्थ-वर्ण-दंड-न्याय-भूमि'' अशा सर्व प्रकारच्या सत्ता ज्या केवळ क्षत्रियांच्या, क्षत्रिय राजांच्या (राज्याभिषेकासही प्रजेच्या मान्यतेउपरान्त) स्वाधीन होत्या, तोच 'क्षत्रिय वर्ण' सातवाहनांचाही होता, हे अबाधित सत्य ('सत्' नि 'सात्-सात'ही !) न स्वीकारण्यातील संशोधक- अभ्यासकांची 'अडचण' कोणत्या प्रकारची होती हे समजत नसले तरी 'गूढ' वा 'कूट' नक्कीच नाही ! मात्र याचा स्वतंत्रपणे शोध घेणे आवश्यक आहे.

**१०) ''एककुसस, एकधनुधरस, एकसूरस, एकबम्हणस !'':**

१. 'एककुसस' : (एककुशः /एकांकुशः ) = जो असामान्य नियंता होता.
२. 'एक धनुधरस' : ( एक धनुर्धरः ।) = जो अप्रतिम धनुर्धर होता.
३. 'एक सूरस' : (एक शूरः ।) = जो अद्वितीय शूर (योद्धा) होता.
४. 'एक **बम्हणस**' : (एक **ब्राह्मण** : ।) जो अनुपम '**ब्राह्मण**' होता ।

: (डॉ. वा. वि. मिराशी).

१) अशी स्पष्टीकरणे डॉ. मिराशी देतात आणि म्हणूनच स्वतः त्यांनी व त्याच मताच्या इतर काही अभ्यासकांनी मानले की, 'सातवाहन राज 'कुल-वंश-वर्ण-जाति'दृष्ट्या मूलतः 'ब्राह्मण' होते,

- आणि पुढे केव्हा तरी ते सर्वच, क्षत्रियांशी लग्ने करून 'क्षत्रियां'मध्ये गणले जाऊ लागले, सामावले गेले, संबोधले गेले.

२) 'बम्हण' किंवा 'ब्रह्मन्' या शब्दाचा 'ब्राह्मण'-वर्णाचा, असा अर्थ ग्राह्य धरून या सातवाहनांच्या ३७ लेखांतील 'एकमेव' (एकम् एव =एकच एक) 'पदाच्या' आधारे भारतीय इतिहास संशोधनाच्या अगदी प्रारंभकाळापासून ते आजपर्यंतही काही विदेशी तथा भारतीय (त्यातलेच महाराष्ट्रीयही !) इतिहास संशोधक-अभ्यासकांनी सातवाहनांना 'ब्राह्मण'-वर्णाचे ठरविण्याचा प्रयत्न केलेला आहे.

३) हे करण्यासाठी अशा पंडितांनी भारतीय राजनीती व सामाजिक गतिविधि-रीतींच्या परंपरांचे सिद्धान्त 'नगण्य' मानलेले, पूर्णतः डावललेले किंवा या कशाचेच भान ठेवण्याची गरज नाही, असे दर्शविल्याचे साक्षात रूप म्हणजेच भारताचे इतिहास-संशोधन-अध्ययन-प्रकाशन क्षेत्राचे आजचे 'विराटरूपदर्शन !'

**१०.१) 'एककुसस':**

डॉ. मिराशींनी केलेल्या अर्थापेक्षा काही निराळा अर्थविचार करणे शक्य आहे. तो पुढीलप्रमाणे केला आहे:-

१) 'एककुसस'चा विचार करताना एक+अंकुश (=नियंता) असा अर्थ घेतला

गेला आहे. पण 'एक +अंकुश  = 'एकांकुश'. 'असे व्हावयास पाहिजे. पण ते तर मूळात अस्तित्वात नाही. मूळ शब्द दिसतो - 'एककुस' म्हणजेच तो शब्द आहे - 'एक+कुस (कुश)'.

२) 'कुस' किंवा 'कुश' असा शब्द घेतला असता अर्थनिष्पत्ती होत नाही.

३) कुश = १. तृणविशेष, दर्भ, काश, दर्भविशेष. २. रामपुत्र : 'कुश', ३. जोखड, ४. लगाम, ५. दोरी, ६. नांगरफाळ, ७. पाणी.

४) कुशेशय = १. सारस (हंस?) पक्षी, २. कमळ, ३. तांबडे कमळ. ४. कुशद्वीपातील सातपैकी एक पर्वत.

५) कुश = १. पुरुवंशी अजकाचा पुत्र 'राजा कुश' :(महान धर्मात्मा)-हे कुश शब्दाचे कोशगत अर्थ असले तरी येथे याचे विश्लेषण पुढीलप्रमाणे केले आहे. -

६) 'कुशेशय' : = 'कुश' नामक तृणांवर ज्याची शय्या (जन्मतः?) होती असा तो ! = 'कार्तिकेय.'

१. प्रतीहारी : ( दुसरीकडे पाहत, स्वागत):

- "**कथमयं वीरशृंगारललितलंपटो लाटेश्वर : । (प्रगट)** ।

- "**देवात् 'कुशेशय' भुवो भुवनैकबंधो : संध्याविधौ**
**कलयतश्चुलुकं जलस्य ।**
**यो जातवान् प्रतिमया स मुनिश्चुलुक्य -**
**स्तस्यान्वयैकतिलको नृप एष लाट : ॥** "

:(बालरामा. ३.५७, राजशेखर)

= काय, हा वीर - शृंगाररसांत कुशल लंपट असा लाटेश्वर (गुर्जरेश्वर) आहे? (प्रकट) -

- सर्व जगताचा बंधू- 'कुश-जन्मा' भगवान कार्तिकेय, हा संध्या करीत असल्याचे वेळी, 'जळाची चुळूक' घेत असता, ज्या प्रतिमेपासून चुलुक्यमुनी उत्पन्न झाले, त्यांच्याच वंशाचा हा तिलकभूत 'लाट-नरेश' आहे.

७) 'कुशेशय' कार्तिकेय हा 'देवांचा महासेनापती' आहे. याने जन्मतःच सहाव्या दिवशी सेनापतित्व स्वीकारून तारकासुराचा वध केला व देवांना जय मिळवून दिला. तो सातवाहन, कदंब, चालुक्य इ. क्षत्रिय राजांचे आराध्य दैवत आहे. या राजवंशांत 'स्कंद' पद युक्त काही नृपतींची नावेही आहेत.

८) अर्थात 'एककुसस'चे स्पष्टीकरण 'एककुशेशय' या पदाने सुस्पष्ट होते आणि -

९) "एकमेव अतुलनीय सेनाधीश' हे गौतमीपुत्र सातकर्णी राजा सम्राटाचे विशेषपद 'बिरुद' (Epithet) सार्थ ठरते.

**१०.२) 'एक बम्हणस' :**

**अ) १) १. 'एककुशेशय' : म्हणजे अद्वितीय सेनाधीश,**

२. 'एकधनुर्धर' : म्हणजे अद्वितीय धनुर्धर,

३. 'एकशूर' : म्हणजे अद्वितीय शूर योद्धा !

याच परंपरेला शोभणारे व राजाचे सर्वोच्च आवश्यक आणखी 'एक' अंग, विशेषण -पद म्हणजेच -

४. 'एक बम्हण': म्हणजे अद्वितीय प्रजाप्रतिपालक ! हे होय.

२) अर्थात-'ब्रह्मण': म्हणजे 'सर्वांचा पितामह' असा सर्वश्रेष्ठ एकमेवाद्वितीय-दंडनविधिप्रणायकः 'दंडाधीश !'

३) - केवळ राजाला, सम्राटाला 'आवश्यक' असे हे विशेषण आहे.

४) हा अर्थ ग्राह्य धरून, 'अद्वितीय प्रजाप्रतिपालक' असे 'ब्रम्हण'चे स्पष्टीकरण देऊनच डॉ. रा. गो. भांडारकर, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, डॉ. कु. भ्रमर घोष आदी अभ्यासकांनी सातवाहनांना 'ब्राह्मण' मानण्याचे नाकारले आहे.

५) 'सेनाधीश' व 'दंडाधीश'ही दोन्ही शब्दपदे म्हणजे कोणत्याही राजाचे 'दोन बाहू'च होत. यांचा उल्लेख लेख क्र. १८ मध्ये नाही. अशी कल्पना जरी केली तरी 'गोतमीपुत्र सातकर्णी' हा एक सामान्य राजाही उरत नाही. मग त्याचे सम्राटपद तर सिद्ध होण्याचे दूरच राहते. आणि ते तर त्याचे सम्राटपदास वैगुण्य निर्माण करणारे आहे. ही दोन्ही, कोणाही राजाची अभिन्न, सर्वोच्च प्राधान्यपूर्ण अंगे असतात. अर्थात या 'लेखा'तही (क्र. १८) या दोहोंचा अभाव नक्कीच नाही.

६) या अर्थाची दुसरी विशेषण-पदे त्या कोरीव - लेखात शोधावीत तर ती उपलब्ध होत नाहीत. म्हणूनच तर ही दोन्ही पदे महत्त्वाची व निर्णायक ठरतात.

७) 'एक बम्हण' व इतर तिन्ही पदांत त्या सम्राटाच्या 'वर्ण'- निश्चितीचे प्रयोजनच दूरान्वयानेही अभिप्रेत नाही. केवळ त्याचे 'सम्राट' या नात्याने सर्वश्रेष्ठत्वच चारही पदांतून चार प्रकारे अभिव्यक्त करण्याचा आणि त्यास राजलक्षणांनी युक्त - चतुर्भुज संपन्न साकार करण्याचा या कोरीव-लेखाचा हेतू आहे.

८) त्यामुळे 'एक बम्हण' मधून 'क्षत्रिय' वा 'ब्राह्मण' असा कुठलाही 'वर्ण' न शोधता, अथवा त्यातून तो निश्चित निर्णित न करता, येथे त्या सम्राटास केवळ 'सम्राटच' राहू देणे संयुक्तिक ठरते.

९) मग या लेखातील हा 'एक बम्हण' म्हणजे काय? तर 'बम्हण' म्हणजे 'ब्रह्मण', (ब्रह्मा, ब्रह्मदेव, पितामह, प्रजाप्रतिपालक इ.) होय.

१०) ते कसे? गोतमीपुत्र हा 'ब्रह्मा, ब्रह्मदेव' कसा ठरू शकतो ? तसे कसे ग्राह्य धरता येईल? ते स्वीकारार्ह कसे ठरेल?

**१०.३) 'एक बम्हणस':**

**आ)** डॉ. मिराशी हे या पदाचा अर्थ देतात - 'अनुपम ब्राह्मण!'

१) 'एककुसस' , 'एकधनुधरस', व 'एकसूरस' ही तिन्ही विशेषणे गोतमीपुत्र सातकर्णीची आहेत. या तिन्हींतून त्या सम्राटाचे सर्वश्रेष्ठत्व, शौर्य, धैर्य, युद्धनैपुण्य,

पराक्रम, राजनीति-कर्तृत्व व्यक्त होते. तेव्हा या तिन्हींस जोडूनच पुढे सलगच्याच चौथ्या क्रमांकावर असणारे त्याचे 'चौथे' विशेषण - पदही याच मालिकेतील, याच तोलामोलाचे, याच परंपरेतले, एक अद्वितीय सार्वभौम सम्राटास शोभून दिसणारे असणेच रास्त ठरते. या तिन्ही विशेषणांचा राजाच्या 'वंश-वर्ण' -निर्देशाशी संबंध पोहोचत नाही. अर्थात, त्यामुळेच त्याचेच -

२) ''एक बम्हण''- हे विशेषणपदही त्याच परंपरेतले असणे हेच सर्वांशी संयुक्तिक होय. असे असताना येथे मात्र 'एक बम्हण, या पदातील 'बम्हण'चा अर्थ डॉ. मिराशी इ. काही अभ्यासकांनी 'ब्राह्मण', असा 'वंश-वर्ण-जाती'' निर्देशक घेऊन या गौतमीपुत्राला व त्याच्या 'सातवाहन' या राजकुलाला 'ब्राह्मण' वर्णाचे ठरविण्याचा प्रयत्न केला आहे, ठरविले आहे.

३) या राजाला जर 'एक बम्हण' या पदाच्याद्वारे स्वत:चा व स्वत:च्या राजकुलाचा 'वर्ण'च व्यक्त करावयाचा असता तर क्रमाने या चारपैकी 'चौथ्या क्रमांका'च्या -अंतिमपदी चोरून -मारून एका कोपऱ्यात हे 'वर्ण'-निर्देशक शब्दपद बसवून, व त्याला आपला 'वर्ण' (की जो ब्राह्मण ) हळूच 'चौथे बोट' वर करायला भाग पाडून तो सम्राट कसा सांगेल ?

४) सम्राटाकडून स्वत:चा 'वर्ण' सुस्पष्टपणे, एका स्वतंत्र शब्दपदरूपाने, ठळकपणे, सांगितला जाणे, हेच त्या सम्राटाच्या राजकुलास शोभून दिसणारे आहे. जसे 'राजछत्र' हे 'एक'च असते. ते स्वतंत्र असते, त्याचा उल्लेख कुठेतरी चौथ्या क्रमांकावर केला जाणे संभवनीय नाही, रास्त नाही. तद्वत 'राजसिंहासन' ही 'एक'च व 'राजदंड'ही 'एक'च ! तेव्हा त्यांचे उल्लेखही ठळक व एकच एक स्वतंत्र शब्दपदाने केले जाणे उचित गौरवाचे ठरते. त्यांहूनही सम्राटाच्या 'वर्ण'-उल्लेखाचे महत्त्व व स्वतंत्र वेगळेपण कमी प्रतीचे होय, असे म्हणता येत नाही.सातवाहनोत्तर सर्व राजवंशांनी आपले 'वर्ण' निश्चितपणे याच गौरवपूर्ण रीतीने व्यक्त केलेले आहेत. हे भारतीय इतिहासातील अभिलेखांत नमूद आहेत. त्यांनीही इतिहासात, अन्य राजकुलांप्रमाणेच आपल्या वर्णाचा उल्लेख 'अलंकारपूर्णरीतीने', याच लेखात, या 'बम्हण' शब्दापूर्वी कधीच व्यक्त केलाही आहे ! तो म्हणजेच 'खतियदपमानमदनस ! '' हा होय !

५) एक तर राजाला निज 'वर्ण'-निर्देशाची, राजाने तो स्वत:च सांगण्याची गरजच नसते. कारण, भारतीय इतिहास-परंपरेत भरत-जनांचा अर्थात 'भारतां'चा प्रत्येक राजा हा वंश-परंपरेने विशुद्ध औरस संतती हा वारसा सांगणारा, आर्य -क्षत्रिय व प्रजेने त्याच्या 'राज्याभिषेका'स मान्यता दिलेला असाच असे हे विश्वश्रुत, विश्वज्ञात व प्राचीनतम भारतीय जनजीवन-परंपरासिद्ध इतिहासातील अबाध 'सत्य' राहिले आहे. संशोधकांच्या विरोधी, प्रयत्नांनंतरही !

६) त्यातूनही 'मी क्षत्रिय' आहे, असे न म्हणता, ज्यातून त्या राजाचे'विमल क्षत्रियत्व' सुस्पष्ट होईल अशा काव्यात्म अलंकारसंपन्न शब्दबंध-भाषेद्वाराच राजा

आपला 'वर्ण' व्यक्त करतो आणि नेमके हेच व असेच याच क्र. १८ या कोरीव लेखात 'गौतमीपुत्र सातकर्णी' या सातवाहन सम्राटासंबंधीही, त्याच्या स्वतःच्या व पर्यायाने 'सातवाहन-राजकुला'च्या 'क्षत्रियवर्णा'विषयी 'क्षत्रियदर्पमानमदन' या शब्दपदातून वर नमूद केल्याप्रमाणे या आधीच व्यक्त केले गेलेले आहे. आणि नेमके याच गोष्टीकडे 'काही' अभ्यासकांचे या दृष्टीने लक्ष गेले नाही. ते तर त्यातून वेगळाच अर्थ काढू धजावतात. आणि त्या आधारें, त्या राजाला 'क्षत्रियेतर' ठरविण्यात मात्र त्यांनी आपले लक्ष केंद्रित केल्याचे दिसते.

७) 'बम्हण' (ब्रह्मन्, ब्रह्मण) या शब्दाचा केवळ, 'ब्राह्मण' हा 'एक' चअर्थ संस्कृत भाषेतही नाही. या शब्दाला किमान ५० तरी 'अर्थ' कोशांतून दिलेले उपलब्ध होतात.

८) त्यांतील -

'ब्रह्मन्' = १. 'परतत्त्व', २. 'सर्वशक्तिमान परतत्त्व', ब्रह्मा, ब्रह्मदेव, ३. 'सर्वसत्ताधारी सम्राट', ४. 'सर्वोच्च शक्तिमान पुरुष', ५.सूर्य, ६. शिव. ७. विष्णू, ८. वेदविद्याविद. हे अर्थ निश्चितच लक्षणीय आहेत.

९) 'ब्रह्मन्' या शब्दासंबंधी 'महादेवशास्त्री दिवेकर' लिहितात. -

-'ब्रह्मन्'- म्हणजे 'ब्राह्मण' नव्हे; 'ब्रह्मन्' चा मूळ अर्थ, 'विश्वव्यापकत्व' असा आहे. त्यामुळेच 'ब्रह्मन्' या शब्दाचा संबंध 'ब्राह्मण' या शब्दाशी जोडता येत नाही. 'ब्रह्म', 'ब्रह्मन्' हा शब्द 'ऋग्वेदा'त 'ब्राह्मण'-वर्ण या अर्थाने कोठेच दिसत नाही. :(नवा हिंदुधर्म : पृ. ११५, इ. स. १९४६)

**१०) 'ब्रह्मन्'ची अर्थनिश्चिती !**

-ब्रह्मण' (बम्हन/ण )या शब्दाच्या वरील सर्व विवेचनानंतरही आपण सातवाहन वर्णसंबंधांत 'बम्हण' म्हणजे 'ब्राह्मण'-वर्णीय पुरुष, वंश; हा अर्थ स्वीकारू शकतो काय ? याचे उत्तर अभ्यासकांनीच ठरवावयाचे आहे.

या सर्वांच्या निरसनासाठीचे उत्तर पुढील 'प्रमाणां'त व स्पष्टीकरणांत निहित, निर्णित आहे :-

**११) 'ब्रह्मन्' = म्हणजे, ''दंडनविधिप्रथमप्रणेता''!**

**=एक अद्वितीय दंडाधीश !**

= अद्वितीय दंडनविधिकुशलप्रणायक ! जसे : -

''रावण : 'हंहो **'पितामह'** निषेध विमानहंसान् (='ब्रह्मन' ।)

**लीलागतं मृगदृशस्त इमे हरन्ति ।**

**नोचेन्ममोपदिश तेषु यदाचरामि**

**त्वं येन ''दंडनविधेः प्रथमप्रणेता ॥ ''**

: (बालरामायण : राजशेखर ५-६३, पृ.१६६)

=(अहो 'पितामह' स्वरूप 'ब्रह्मन् - ब्रह्मदेवा ! या विमानहंसांना अडवा !

हे सर्वजण मृगनयनी सीतेच्या लीलामय गतीची चोरी करीत आहेत. नाहीपेक्षा मी यांच्याशी कोणत्या प्रकारचा व्यवहार करावा, त्याचा तरी उपदेश तुम्ही मला करावा. कारण की, आपण तर **'दंडनविधीचे प्रथम प्रणेता'** आहात ! )

१. असा हा दंडनविधीचा प्रथम प्रणेता-निर्माता कोण आहे ? तर 'पितामह' अर्थात् 'ब्रह्मदेव' म्हणजेच 'ब्रह्मन्' !

२. गोतमीपुत्रही 'एक बम्हण' होता असे मानल्याचे कारण- तो सर्वश्रेष्ठ-अद्वितीय असा, 'दंडनविधीचा स्वामी, दंडाधीश, 'दंडनविधिसम्राट' होता; असे मानलेले आहे.

१२) यालाच दुसरेही एक समर्थ, समर्पक, सबल प्रमाण 'मनुस्मृती' तील आहे :-

-सर्व प्रजाजनांचे यथा न्याय, यथाविधी परिरक्षणाचे कर्तव्य पार पाडता येण्यासाठी परमात्म्याने 'क्षत्रिय राजा' च्या हातीं : 'ब्रह्मतेजोमय राजदंड' दिला आहे:-

-"तस्यार्थे सर्वभूतानां गोप्तारं धर्ममात्मजम् ।
**'ब्रह्मतेजोमयं दंडं'** असृत्पूर्वम् ईश्वरः ॥" :(मनु.७.१४)

=त्याकरितां सर्व प्राणिमात्रांचे संरक्षण व्हावे म्हणून, 'ब्रह्मतेजोमय' (अर्थात् 'ब्रह्मन्' - स्वरूप) व 'राजदंड-धारक' असा क्षत्रिय स्वपुत्र विधीने (ब्रह्माने) निर्मिला !

( 'ना विष्णुः पृथ्वीपतिः ।')

१३) तेव्हा 'एक बम्हण' मध्ये 'ब्राह्मण' नाही; तसा अर्थ मुळी होऊच शकत नाही. त्यात 'ब्राह्मण' वर्णाचा वर्ण/वंश संदर्भ घेणे अप्रस्तुत आहे. याचा अर्थ 'राजदंडसत्ते' च्या अद्वितीयतेशी आहे; आणि कोणाही राजाचे सर्वोच्च प्राधान्यप्राप्त अनिवार्य असे ते अंग आहे. हे समजून घेता येणाऱ्यांना, 'सातवाहनां' ना 'ब्राह्मण' वर्णाचे ठरवू पाहणारा 'बम्हण' हा एकमेव शब्दच वर्ण-वाची ठरत नसल्याने, सातवाहनांचा 'क्षत्रिय-वर्ण' अबाधपणे सिद्ध होण्यात कुठलेही संभ्रम-अभ्र शिल्लकच राहत नाही ! हे पटू शकेल.मात्र अभ्यासकांनी ('ब्राह्मण'-वर्ण-पक्षी) अंतर्मुख होणे जरुरीचे मानावे !

**११. "राम-केसवाजुनभीमसेन तुल पर (रा) कमस !":**

=(राम-केशव-अर्जुन-भीमसेन-तुल्य-पराक्रमः ।)

१= (जो राम-केशव (श्रीकृष्ण)-अर्जुन-भीमसेन यांच्या तुल्य पराक्रमी होता.)

२) येथे हा 'राम' म्हणजे 'परशुराम' होय, असे काही अभ्यासक सुचवितातही !

३) कारण या आधीच्या शब्दपदात 'एक बम्हण' (म्हणजे 'ब्राह्मण' असे समजून) या पदापुढे लगेच हा 'राम' शब्द आला आहे, हा 'राम' शब्द 'परशुराम' या 'ब्राह्मणा' चा द्योतक आहे. आणि 'तुल्य पराक्रमी' असा जो 'गोतमीपुत्र सातकर्णी' होता; आणि तो 'क्षत्रियांच्या दर्प व मान यांचे दमन' करणारा मानल्याने 'तो' व 'परशुराम' हे दोघे 'तुल्यबल क्षत्रियांतक' ठरतात; म्हणून 'गोतमीपुत्र' व त्याचा संपूर्ण राजवंशही 'ब्राह्मण'-वर्णीय होता, याला हा 'राम' शब्द एक 'ठोस' पुरावा ठरतो, असा त्या अभ्यासकांचा दावा आहे !

४) पण, येथे 'तुल्य पराक्रमी' हे सांगण्यासाठी घेतलेले चारही थोर पुरुष, या महान विभूती विचारात घेणे अनिवार्य आहे. तसा त्यांचा एकत्र विचार करण्याने काय निष्पन्न होते ?

५) 'राम-केशव' व 'अर्जुन-भीमसेन ! अशा या दोन 'जोड्या' आहेत. यांतील प्रत्येक पराक्रमी पुरुष परस्पर 'बंधु' आहेत. पहिली जोडी यदु (सोम) वंशीय क्षत्रिय आहे. दुसरी जोडी 'कुरु' (सोम) वंशीय क्षत्रिय आहे ! त्यामुळे येथील हा 'राम' म्हणजे 'परशुराम' ही नव्हे, किंवा 'राघव राम' ही नव्हे; तर तो 'यादव-बल-राम' आहे; तो श्रीकृष्णाचा ज्येष्ठ बंधू आहे ! हेच सातवाहन-लेखात इतरत्र नमूद आहेतही-

६) डॉ. मिराशी-संपादित सातवाहनविषयक ग्रंथात क्र. ३या लेखात (पृ.१० वर) पहिल्याच ओळीत हे 'बंधुद्वय'-''नमो संकसन-वासुदेवानं-चंद्रसूर्यानं ''असे आलेले आहे !

-संकर्षण=बलराम; वासुदेव= श्रीकृष्ण ! हेच तेही 'राम-केशव'! याची दखल, उपरोक्त विचाराच्या अभ्यासकांनी घेतल्याचे दिसत नाही.

७) येथे 'पराक्रम' व्यक्त करताना, 'तुलना' करताना वापरलेला 'तुल्य' हा शब्द महत्त्वाचा आहे ! 'तुलना' करताना दोन बाबींमधील 'समान' गुणधर्माचे परिमाण 'कमी-जास्त' असू शकते. त्यामुळेच येथे 'सम' हा शब्द न वापरता 'तुल्य' हा शब्द वापरलेला आहे. कारण, 'पराक्रम' सम-समान असूच शकत नाही. अर्थात, या विवेचनाचा धागा ''सम तेजस'' या शब्दपदाच्या विवेचनात महत्त्वपर्ण ठरणारा आहे; म्हणून हे येथेच सुचवून ठेवले आहे.

**१२. ''नाभाग-नहुस-जनमेजय-सकर-ययाति रामाबरीस समतेजस ! ''**

=( ना (न) भाग-नहुष-जनमेजय-सकर-ययाती-राम-अंबरीष सम तेजस !)

१) = ('जो नाभाग.....अंबरीषादींच्या 'सम तेजस' होता.)

२) डॉ. मिराशींनी याचा दिलेला अर्थ असा आहे :-

=('ज्याचे 'तेज' नाभाग, नहुष, जनमेजय-'सगर'-ययाती-राम व अंबरीष यांच्या 'सम' होते.')

३) यातील 'सगर' हा 'सकर' चा पर्याय म्हणून, अर्थामध्ये डॉ.मिराशी शब्द घेतात.

-पण, 'सकर' चा अर्थ याच ग्रंथाच्या पृ. १७१ वरील शब्दार्थ कोषात 'संकर' असा डॉ. मिराशीच देतात. (सकर = (संकर) - १८.८ लेख व ओळ क्र.)

४) मात्र, 'सगरगिरिवलयाय' - गिरी समुद्रवलयांकित (सगर = सागर) असे याच ग्रंथात पृष्ठ १०, लेख क्र. ३ ओळ क्र. ३ मध्ये दिसते.

५) असे असताना 'सकर' चा पर्याय 'सगर' ('क' चे जागीं 'ग' वर्ण) डॉ. मिराशींनी का गृहीत धरला ते त्यांनी स्पष्ट केलेले नाही.

६) आणि त्यामुळे अर्थातच, 'सकर', हाच मूळ शब्द गृहीत धरून अर्थ स्पष्ट केल्यास, इक्ष्वाकुवंशीय सगर-पिता ''बाहु'' नामक नृपती, अथवा 'रघु-पिता', 'दीर्घ

बाहु'', यांपैकी कुणीही एक असणे 'सकर' च्या अर्थदृष्टच्या इष्ट ठरते. 'सगर' मानूनही अर्थहानी होत नाही.

७) वरीलपैकी प्रत्येक म्हणजेच ''नाभाग......अंबरीष'' अशा या सातही शब्दांचा अर्थ ''सूर्य'' असाच शब्दकोशांतून आढळतो. यावरून व हे सातही नृपती क्षत्रिय होते यावरूनही, सातवाहन नृपतीही (गोतमीपुत्र) स्वत:स 'समतेजस' का म्हणतो याचा उलगडा होण्यास मदत होते.

८) या सातही क्षत्रिय-नृपतींकडून 'ब्राह्मणां'च्या विषयी काही ना काही 'आगळीक' घडली आहे. त्याबद्दलची शिक्षा त्या-त्या प्रत्येकाला त्यांच्या-त्यांच्या जीवनकालांतच शापाच्या रूपाने लाभलेली आहे. ही 'परस्पर आत्मीयता' लक्षात घेता, व हा 'परंपराप्राप्त इतिहास' ज्ञात असताही सम्राट गौतमीपुत्र सातकर्णी हा, 'ब्राह्मण'; आपले या व अशा कर्तृत्वाच्या व 'ब्राह्मण-शापित', 'नाभाग...... अंबरीष' नामक सात नृपतीप्रमाणेच 'तेज' (समतेजस ) आहे; असे स्वत:संबंधीच म्हणवून घेणे शक्य नाही, हे स्पष्ट होते. पण अभ्यासकांकडून या दृष्टीने विचारच झाल्याचे आढळत नाही.

९. वरील 'नृप-नामावलीत' अखेरीस असणाऱ्या 'समतेजस' या शब्दपदातील 'तेजस' या शब्दाचे शब्दकोश- निहित अर्थ पुढीलप्रमाणेही आहेत :-

१) शौर्य, प्रताप, पराक्रम; २) वीर्य-धातू-शुक्र-बीज-रेतस; ३) जीव-वस्तु-अस्तित्व-धारणात्म अत्यावश्यक जीवनतत्त्व; (सत्त्व, धातुसार, सप्तधातूंपैकी एक, 'तेज' हे सप्तधातूंचे सार), ४) पंचमहाभूतांपैकी एक 'तेज', ५) सूर्य, सूर्यस्वरूप, सूर्यांश, सूर्यतत्त्व,सूर्यतत्त्वांश, सूर्यसत्त्व, सूर्यसत्त्वांश, सूर्यार्क, सूर्यार्कता ।

१०) गोतमीपुत्र स्वत:स, 'नाभाग..... अंबरीष' आदि सात नृपतींच्या 'सम पराक्रमी' (तेज=पराक्रम) असे म्हणवून घेऊ इच्छीत असता तर; हे सातही जण 'राम-केशव-अर्जुन-भीमसेन' याच चारांच्या पंक्तीत घेता आले असते; यांना वेगळे स्थान कशासाठी ?

११) येथे 'तुल्य पराक्रमी' व 'समतेजस' या दोहोंमध्ये मूलत:च उद्देश-भिन्नता आहे, हे समजून घेणे जरुरीचे आहे.

-'समतेजस' मध्ये, 'is equal to','the same' हा भाव महत्त्वाचा व निर्णायक ठरतो.

- येथील 'तेजस' चा संबंध 'सूर्यतत्त्व', 'प्रजनन'-तत्त्व यांच्याशी आहे. अर्थात 'समवर्णीय वंश-वृद्धि'-तत्त्वाशी आहे. तेव्हा-

१२) येथे या 'गोतमीपुत्रा'स म्हणावयाचे आहे की, -

-''मी नाभाग..... अंबरीष' आदि 'सात्' अथवा 'सात' (७ हा अंक नव्हे !) या 'ब्रह्मन्'-तत्त्व तथा 'सूर्यवंशतत्त्वीय क्षत्रिय- नृपतींच्या वंश वर्णाचा आहे; म्हणजेच मी त्यांच्या ''सम तेजस'' आहे !

१३) ही 'कुल-वंश-वर्ण-परंपरा'आपली स्वत:ची आहे, असे म्हणूनच 'सातवाहन'-नृपती स्वत:च देत असताना; त्यांच्या शिलालेखांच्या इ. स.१८३७ पासूनच्या अभ्यासकांपैकी काही अभ्यासक हे मौलिक 'सत्य' स्वीकारण्यास तयार झालेले नाहीत, असे दिसून येते. ते कां ? ते समजत नाही, असे नाही !

**१४. ''सिरिसातकणिस मातुय महादेवीय गोतमिय बलसिरिय !''**

=(गोतमिय बलसिरिय= गोतमीने बलश्रीने ।)

१) वरील शब्दसमूहातील, ''बलश्री'' ह्या राणीच्या नांवातील 'बल' हा शब्दही तिचे 'क्षत्रियाणी' त्व दर्शविणारा आहे, असे दिसून येते; तेही सातवाहनांच्या 'क्षत्रियत्वास' पोषक ठरणारे आहे.

**१४) ''राजरिसिववधुस !'' = (राजर्षिवधू):**

१. या 'पदा' चा समुचित अर्थ डॉ. मिराशी देत नाहीत. शिवाय, या 'राजर्षि' शब्दाच्या अर्थनिश्चितीसंबंधीही काही अभ्यासक मतभिन्नता दर्शवितात.

२. 'राज, राजन्, राजा, राजन्य, राज्ञ:' या शब्दांचा अर्थ 'क्षत्रिय' असाही आहे. त्याप्रमाणे 'राजा+ऋषी' या सर्वांवरून बनणारा शब्द म्हणजेच 'राजऋषी' अर्थात 'राजर्षी' ,'क्षत्रियऋषी'।

३. 'राजर्षि' या शब्दाची चर्चा डॉ.मिराशींनी टाळली आहे. तसे तर, 'राजा, तेजस, महादेवी, गोतमी, बलश्री, महाराजमाता' इ; त्यांच्या (डॉ. मिराशी व त्या मताचे अभ्यासक, यांच्या) हेतुसिद्धीला प्रतिकूल पण म्हणूनच प्रतिपक्षी निर्णायक ठरणाऱ्या अशा प्रत्येक शब्दपदाच्या चर्चेच्या संदर्भात डॉ. मिराशी हे 'मौन' पाळूनच आपल्या ईप्सितापर्यंत पोहचू पाहतात !, असेच 'सातवाहनांच्या' या कोरीव लेखाच्या (लेख क्र. १८) विशदीकरणात संशोधन-धोरणाचे दर्शन घडून येते.

४. 'क्षत्रिय' जाति-वर्णाचा ऋषी, तो 'राजर्षी' (राजन्+ऋषी) = 'तपोबलाने व ऋषिवृत्तीने जीवन जगणारा क्षत्रिय राजा' ; क्षत्रिय तपस्वी !

५. 'ययाती' इ. विविध क्षत्रिय नृपतींना भारतीय इतिहासात 'राजर्षि' संबोधलेले आहे. त्यातच 'जनक' ही आहे; 'नहुष' ही आहे; ययातीचे पांचही पुत्र 'राजर्षि' संबोधले गेलेले आहेत; 'यदू'-सह !

**१५) 'महादेवी, महाराजमाता, महाराजपितामही'!**

१) ही सर्व 'विशेषणे', 'क्षत्रियवाचक' आहेत. तेव्हा 'सातवाहन' हे कुल 'आर्य-क्षत्रिय, होते, हे स्पष्ट होणारे आहे. मात्र, यांच्या ऐवजी-

२) येथे, 'महादेवी-माता', किंवा 'महाराज्ञी-माता', किंवा 'महाराज्ञी-मातामही' अशी विशेषणे मुळीच आलेली नाहीत, की जी 'सातवाहन' -राजकुलावर लादून त्यांना 'मातृगोत्र नामधारक', 'मातृसत्ताक वंशीय' ठरविता येईल ! या उलट-

३) वरील विशेषणे 'पितृसत्ताक-कुटुंबपद्धतीचीच' निदर्शक आहेत. तेव्हा -

४) 'सातवाहन'- राजकुल हे 'मातृसत्ताकपद्धतीचे' वा तत्सम काहीही नव्हते,

हे स्पष्ट व्हायला हरकत नसावी. शिवाय -

५) 'गोतमीपुत्र', 'वासिष्ठीपुत्र', 'कौशिकीपुत्र' ही किंवा तत्सम इतर, (उदा. 'हारीतीपुत्र' : कदंब, चालुक्य इ. ) विशेषणे ही सुद्धा 'मातृगोत्रनामे' नाहीत, तर ती त्या-त्या राजांनी 'नदी-नामां'-वरून स्वीकारलेली 'बिरुदे', 'epithets' आहेत.

**१६) 'नायनिका'** :(लेख क्र. ५, ओळ क्र. १,पृ. १९, डॉ. मिराशी):

१. ''देवि-नायनिकाय'' चा अर्थ ''देवी नागनिकेची'' असा डॉ. मिराशी देतात. ('य' च्या ठिकाणीं 'ग'- कां ?) वस्तुत:-

२. 'नायनिका' मधील मूळ शब्द 'नयन' आहे.

३. 'नयन' चे 'नायन' रूप होते, व अर्थ होतो 'नयन'-संबंधित असे ते !

४. नायन+इका= 'नायनिका' : ही सातवाहन-राणी होती.

५. 'नयन' म्हणजे परमात्म्याचे दोन डोळे: १. सूर्य. व २. चंद्र.

६. 'नायन' म्हणजे 'नयन' चे संबंधित. अर्थात सूर्य व चंद्रवंशीय, क्षत्रिय.

७. म्हणून 'नायनिका' म्हणजे सूर्य-चंद्रवंशीयसंबंधित क्षत्रियाणी.

८. हे विवेचनही अभ्यासकांनी विचारात घेतल्याने 'सातवाहनां' चे क्षत्रिय-वर्णास पुष्टिप्रद ठरते.

**(५) 'सातवाहन' शब्द व तत्सम अन्य शब्दांची व्युत्पत्ती :**

**१) 'सत्/सात्/ सात' चे अर्थ :** ('सातवाहन', 'सातकर्णी' या शब्दांच्या संदर्भात);

१. सातवाहन, शातवाहन, सातकर्णी, शातकर्णी, शालिवाहन, सालाहण, सदवाह, सादवाह, सदकण, सदकण्ण, सदकन्न, सदकणिस, सदकणि, सादकणि इ. परस्परसंबंधित शब्दांच्या व्यत्पुत्तीविषयी अनेक विद्वानांनी विवेचने केलेली आहेत. पण त्या सर्वांतून त्या शब्दांना, त्यांच्या इतिहासास, व सातवाहन राजकुलाच्या -वंश-वर्ण-निश्चितीस मुळीच न्याय मिळालेला नाही, हे गेल्या दीड शतकातील इतिहास संशोधन व अभ्यासाचे आलोडन केले असता दिसून येते. हा अभ्यास भारतीय व अभारतीय अशा अनेक पंडितांनी केलेला आहे.

२. या संदर्भात विवेचिलेल्या सर्व व्युत्पत्ती एकत्र आणावयाच्या तर पांचशेहून अधिक पृष्ठांचा ग्रंथ सिद्ध होणे सहज शक्य आहे. भविष्यात कुणी हे काम करणे उपयुक्ततेचे ठरणार आहे.

३. 'सत्' या शब्दाचे जे अर्थ आहेत, त्यांतीलच-'सात्,' म्हणजे-ईश्वर,ब्रह्म, एक मत्स्य-भेद, हे अर्थ येथे महत्त्वाचे आहेत.

४. 'स' ऐवजी 'श' होऊन 'शत'/ 'शात' हे शब्दही सिद्ध होतात.

**२) शल/शाल:सल/साल:चे अर्थ :** (शालिवाहन, सालाहण, या शब्दांच्या संदर्भात):

१. 'सातवाहन' शब्दाप्रमाणेच 'शालिवाहन' हा शब्दही सातवाहन-राजकुलाच्या

इतिहासात आपले 'शक-प्रवर्तक' स्थान निर्माण करून चिरस्थायी ठरलेला आहे. त्यातील मूळ शब्द वरीलप्रमाणे आहेत.

२. या 'शल', 'शाल' या शब्दांचे अर्थही -

'ईश्वर, ब्रह्म, ब्रह्मतत्त्वसंबंधी, एक मत्स्य-भेद' हेच असून ते स्वीकारार्ह ठरणारे आहेत.

३. 'श' ऐवजी 'स' येऊन 'सल', 'साल'हे शब्दही सिद्ध होतात.

**३) हल / हाल : चे अर्थ :** ('हाल' नृपतिनामासंदर्भात):

१. 'स' किंवा 'श' च्या जागी 'ह' येऊन् 'हल', 'हाल' हे शब्द सिद्ध होतात.

२. 'सातवाहन', 'शालिवाहन' या शब्दाप्रमाणेच 'हाल' या शब्दाचाही विचार करणे अपरिहार्य होय. कारण, या वंशात 'हाल' नामक नृपती होऊन गेला आहे. (गाथासप्तशतीचा संपादक). 'हाल' शब्द 'श' चा 'ह' बनून तयार झाला आहे. त्यामुळे 'शाल', शब्दाचे जे अर्थ आहेत, तेच अर्थ 'हाल' शब्दासही प्राप्त होतात.

**४) कण : / कर्ण / कन्न / कणीस :** चे अर्थ : ('सातकर्णि' : या शब्दासंदर्भात)

१. 'सात' शब्दाला, कण, कण्ण, कन्न, कन्नी, कणिस, कणीस, कर्णि, कणी, कर्णी अशी पदे जोडली गेल्याचे सातवाहनांच्या शिलालेखांत वा ग्रंथसाहित्यात दिसून येते. तेव्हा -

२. त्यांचे स्वीकारार्ह अर्थ पुढीलप्रमाणे आहेत:-

१) 'कण : ।' म्हणजे -

१. अंश, २. कणीस, ३. कणी, ४. दाणा, ५. ठिणगी,
६. धान्य-नेत्रांकुर वा तत्सम.

२) 'कर्णिन्/कर्णी': म्हणजे-

१. सुकाणूवाला, २. कर्णाकार पात्याचा बाण, शर, ३. 'कर्णिक' / 'कर्णिका', कमलकोश, कमलपुष्प - नाल (देंठ).

**५) वाह/वाहन : चे अर्थ :** (सातवाहन, शालिवाहन या शब्दांसंदर्भात):

१. 'सातवर्णी' या शब्दाप्रमाणेच 'सातवाहन', 'शालिवाहन', या शब्दांतील 'वाहन' शब्दही महत्त्वाचा आहे.

२. 'वाहन' या शब्दात 'वाहः ।' शब्दच महत्त्वाचा आहे.

३. 'वाहन' या शब्दात 'वाहः' । हा मूळ शब्द आहे.

- 'वाह : ।' (पुं.) म्हणजे, 'बाहू, भुज (भुजा), दंड ।'
- 'वाह' + इन् = 'वाहिन् = 'बाहू' पासून उत्पन्न झालेला.
= 'बाहू' चा संबंधित. अर्थात 'क्षत्रिय'! : (ऋ. पुरुषसूक्त).

**६) अहन् / अहणः** ('सालाहण' या शब्दासंदर्भात):

१. सातवाहनांच्या संदर्भात 'सालाहण' हा शब्द येतो.

२. काहींच्या मते 'सातवाहन', किंवा 'शालिवाहन' किंवा 'सातकर्णी' यांतून

निघणारा अर्थच 'सालाहण' होय. परंतु हा विचार काहीसा अप्रस्तुत आहे. कारण- त्या शब्दात 'साल +अहन् (अहण)'अशी दोन पदे असून, त्यांना स्वतःचा स्वतंत्र अर्थही आहे; की जो 'वाहन' किंवा 'कर्णी' या शब्दांत दिसून येत नाही.

३. 'अहन् / अहण' म्हणजे -

१) आकाश, २) विष्णू. तेंव्हा -

-'सालाहण' म्हणजे 'ब्रह्मा' (ब्रह्मन्) व 'विष्णू' यांचे ऐक्यरूप, होय.

**७) अर्थनिष्पत्तीतून सिद्ध होणाऱ्या 'व्युत्पत्ती' :**

**१. 'सातवाहन'** := 'सत्', -'सात्' (ईश्वर, ब्रह्म) + 'वाह' : (बाहू, भुज, दंड, the Arm.).

= 'ईश्वराचे (ब्रह्माचे ) बाहू ।' : ='क्षत्रिय' ।

("ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् । बाहू राजन्य : कृतः ॥") : (पुरुषसूक्त : ऋग्वेद):

='क्षत्रिय वर्णीय जनसमूह ।'

२.' सातवाहन :' = 'सात्' (मत्स्य-प्रथमावतारूपी विष्णू ): +वाह :(बाहू ),

= " मत्स्यरूपविष्णूचे बाहू" । ( ना विष्णु : पृथ्वीपतिः । ) : 'क्षत्रिय !'

: 'क्षत्रिय-वर्णीय जन समूह': :(मोल्सवर्थः डिक्श.)

**३. वाह + ईन = वाहीन, वाहन.** (जसे : युग-युगीन).

- ('वाह : । (=भुज, बाहू , क्षत्रिय) संबंधी जे, ते. = 'क्षत्रिय'.

= क्षत्रियांचे वंशज, क्षत्रियांची संतती :

**४. शालिवाहन ।**

= शल : । शाल : । (= ईश्वर, ब्रह्मा, ब्रह्मन्, मत्स्य-भेद ।):

= शाल + इन् = शालिन्, शालि, शाली, 'शल' = 'शाल'ची संतती.

= शाल + ईन = शालीन; 'शल' - 'शाल' ची संतती.

'शालिन् + वाह : (= भुज, दंड, बाजू) = शालिवाह = शालिवाहन.

= ईश्वराचे =ब्रह्माचे बाहू. = 'क्षत्रिय'.

= क्षत्रियांचे वंशज, क्षत्रियांची संतती.

**५. सालवाहन ।**

= 'साल' (=मत्स्यभेद, मत्स्यरूप विष्णू)

= साल + वाहः (=भुज, दंड) = सालवाह.

= मत्स्यरूप विष्णूचे 'बाहू'.

= 'क्षत्रिय'.

= क्षत्रिय वर्णीय,क्षत्रियवर्णीय संतती.

**६. सत् / सातकणि ।**

- (कण+इन् =कणिन् , कणि, कणी, कणीस)

- सात् + कणः ।

= ईश्वराचे - ब्रह्माचे, अंश किंवा कण.

**७. सातकर्णि :**

(कर्णिक,कर्णिका, कणि, कणिन्, कर्णी, कर्णी, कर्णिन् ।)

=कमलदेठ, कमलपुष्पनाल, कमलमृणाल.

- सात् + कर्णि = ब्रह्मरूप कमलाचे मृणालतंतू,

= (कमलमृणालतंतू = ब्रह्मस्वरूपतत्त्वाचे - सूर्यतत्त्वाचे 'कर' अर्थात 'बाहू'.

= 'क्षत्रिय'.

=क्षत्रियांची संतती, क्षत्रियवर्णीय जनसमूह.

**८. सालाहण ।**

= सा (शा) ल + अहण । (अहण = आकाश, विष्णू. )

= ब्रह्म आणि विष्णू यांचे एकात्मरूपाचे 'कर' (किरण=बाहू) ='क्षत्रिय'; क्षत्रिय, क्षत्रियवर्णीय जनसमूह.

९. **'हाल' ! = शाल !** ('शाल' चेच अर्थ 'हाल'चे व 'साल'चेही.)

१०. सातवाहनांच्या कोरीव लेखांत, 'त्' चे जागी 'द्' येऊन, 'सादवाह', सादवाहन, सदकण, सदकणि, सादकणिस, सदकन्न इ. आलेले शब्द आढळून येतात.

**(६) तात्पर्य व सातवाहनांची 'वर्ण'-निश्चिती :**

प्रस्तुत लेखात आतापर्यंत केलेल्या या समग्र विवेचनावरून अभ्यासकांच्या, वाचकांच्या हे ध्यानी आले असेल की -

१) राजा, महाराजा, राजमाता, महादेवी, राजर्षी ही शब्दपदे क्षात्र-वर्ण, क्षत्रियत्व सूचकच असल्याने 'सातवाहन' हे महाराष्ट्राचे आद्यराजकुल 'विशुद्ध आर्य क्षत्रिय'-वर्णाचे होते, असे स्पष्ट दिसून येते, :(लेख क्र. १८)

२) राजाच्या 'मुख' या सर्वश्रेष्ठ अंगाची तुलना विमल सूर्यकमलाशी व परिपूर्ण चंद्रमंडलाशी, केलेली असल्याने - ज्याअर्थी, 'कमल' हे सूर्यप्रतीक आहे, व 'सूर्य-चंद्र' हे क्षत्रिय-वंशाचे द्योतक आहेत, त्यावरून 'सातवाहन' हे 'क्षत्रिय' वर्णीय होते हे स्पष्ट होते.: :(लेख क्र.१८)

**३) 'क्षत्रियदर्पमान मदन':** 'दर्पयुक्त मदनरूप असा क्षत्रिय' असा तो 'गोतमीपुत्र' होता; अर्थात त्याचे स्वयंसिद्ध 'क्षत्रियत्व'च त्याच्याच शब्दांत येथे अभिव्यक्त झाले आहे.: :(लेख क्र. १८)

**४) 'मदन, वसंत, वश' :** :(लेख क्र. १८) :

- या तीन वेगवेगळ्या शब्दांच्या अर्थांवरून, सातवाहन हे 'शक-यवन-पल्लवां'चा उल्लेख आपल्या लेखांत करीत नाहीत, अर्थात ते त्यांचे 'उच्छेदक' असण्याचा सुतराम संबंध नाही. तसेच सातवाहन हे 'क्षहरातां'चे निर्वंशकर्ते वा संहारकर्तेही नव्हते. कार्दमक, वा 'क्षहरात' हे तर 'सर्वक्षेष्ठ क्षत्रिय होते. (लेख क्र. ५५, पृ. १२८ : डॉ. मिराशी संपादित : 'सातवाहन' ग्रंथ).

-अशा कुलातील कन्या सातवाहन - कुलात आल्या. विवाह हे समसमान 'कुलवर्ण-जाती- शीलस्तर' असणाऱ्यांशीच होत. अर्थात ''सातवाहन हे विशुद्ध क्षत्रियच होते'', असे दिसून येते.

**५) 'एक ब्रम्हण'** - मधील 'ब्रम्हण' म्हणजे 'ब्राह्मण'-वर्णीय असा अर्थ सुतराम असंभव व अप्रस्तुत आहे.कारण 'ब्रह्मण' चा वास्तव व संयुक्तिक अर्थ आहे : 'दंडनविधीचा प्रथम प्रणेता, ब्रह्मदेव, 'पितामह' - म्हणजेच सर्वश्रेष्ठ अद्वितीय ''प्रजापतिपालक !''

- आणि 'एक कुशेशय (एककुसस) (=देवांचा महासेनापती, कार्तिकेय) अर्थात - 'सर्वश्रेष्ठ सेनाधीश', आणि

-'सर्वश्रेष्ठ-एकमेवाद्वितीय दंडनविधिप्रणायक' असा अर्थ सिद्ध होतो. ('ब्राह्मण'-वर्णीय असा अर्थ ठामपणे नाही !)

या दोन्ही सत्ता भारतीय इतिहासपरंपरेत 'राजांच्या'अर्थात 'क्षत्रियां'च्याच स्वाधीन होत्या. अर्थात -

-''सातवाहनकुलीन सम्राट गौतमीपुत्र सातकर्णी व त्याचा राजवंश क्षत्रियच होते.' हे उघड सत्य सिद्ध होते. :(लेख क्र. १८)

६) ''सम तेजस'' : अर्थात 'वंश - वर्ण' अभिन्नता ! :(लेख क्र. १८)

- ''सम तेजस' : या पदावरून 'नाभाग ... अंबरीष' आदि सात आर्य क्षत्रिय नृपतींच्या 'वंश-वर्णा'चे वारसदार 'सातवाहन' हे होते. अर्थात तेही 'क्षत्रियच' होते.

**७) कुल-नाम : शब्दव्युत्पत्तीतच सातवाहनांचा निहित 'वर्ण':**

-'सातवाहन, शालिवाहन' या शब्दांच्या व्युत्पत्तीतच 'सातवाहन' या कुलनामाच्या नृपतींच्या 'वर्णा'चा बोध निहित आहे. त्यांचे विशुद्ध आर्य क्षत्रियत्व दिग्दर्शित आहे.

:(सात् = ईश्वर, ब्रह्म; वाह: = बाहू। (ऋ.१०.९०-९२ पुरुषसूक्त) : म्हणून 'सातवाहन' तसेच'शालिवाहन' म्हणजे -

१. ईश्वराचे बाहू ='क्षत्रिय'.

२. मत्स्यरूप अवतारी श्रीविष्णूचे बाहू = 'क्षत्रिय ।'

ऋग्वेदातील 'पुरुषसूक्त ,' उपनिषदे, भगवद्गीता, श्रुति-स्मृतींचे कथन आहे की -

-''विराट पुरुषाच्या बाहूं जसे'क्षत्रिय' होत ! 'क्षत्रिय' हे ईश्वराचे 'बाहू'च आहेत. म्हणून 'सातवाहन' व 'शालिवाहन' म्हणजेही 'क्षत्रिय !'' [**'वाहन'** शब्द 'वाह:' (= बाहू) चे रूप आहे.]

**८) इतिहास-परंपरा :** प्राचीन काळापासून भारतीय इतिहास-परंपरा सांगते की, 'क्षत्रिय' हाच पूर्व-प्रजामान्यतेने 'राज्याभिषेक' करवून घेतल्यानंतरच राजपद उपभोगण्यास 'अधिकारी' आहे. अर्थात, 'सातवाहन' हे सार्वभौम सम्राट होते, त्याअर्थी मूलत:च ''क्षत्रिय वर्णीय '' होते, वंशपरंपरेने राजकुलीन होते.

**९) 'क्षत्रिय राजवंश' हे मातृगोत्रनामधारक'** नव्हते; सातवाहनांनीही

मातृगोत्रनामे धारण केलेली नाहीत.

-सातवाहनांनी आपल्या मुली क्षत्रियांखेरीज अन्य वर्णीयांना दिल्याची वा त्यांनी क्षत्रियांखेरीज अन्य वर्णीयांच्या मुलींशी विवाह केल्याची प्रमाणे उपलब्ध नाहीत.

- ते चातुर्वर्ण्य विनियंत्रित करणारे होते; 'वर्ण-भंजक' नव्हे. अर्थात उपरोक्त विवाह-संबंधाने सातवाहन हे 'क्षत्रियच' ठरतात.

- 'गोतमीपुत्र' व तत्सदृश विशेषणे, ही 'मातृगोत्र'नामे नसून 'गोतमी' (=कौशिकी, वासिष्ठी, गोदावरी= सरस्वती) इ. नद्यांच्या नांवांवरून नृपतींनी स्वत:स धारण केलेली 'बिरुदे' आहेत.

**१०) 'सप्त गोदावर':**

- सातवाहन हे 'सप्तगोदावर'-क्षेत्रातले होते.'आंध्र'-जाति-वंशीय नव्हे.

- त्यांचे उत्तराधिकारी इक्ष्वाकू, सालंकायन, चुटुकुलानंद सातकर्णी, कदंब, पल्लव, वाकाटक, मुंड, चालुक्य, राष्ट्रकूट, होयसळ, भोशल (भोसल), गंग, यादव, शिलाहार, भोज, रठिक, राष्ट्रिक हे सर्व राजवंश व स्वत: सातवाहन हेही 'क्षत्रियच' होते.

**११) 'बाण' व 'राजशेखर' हे दोघेही 'सातवाहनां'ना 'क्षत्रिय' च मानतात:** - (पाहा : प्रस्तुत लेख : १ 'पूर्वरंग' : (६) (२) १ व २).

१. 'बाण' म्हणतो; 'सातवाहन हे 'भू-भुजा : ''। होते. 'भू-भुजा'= 'क्षत्रिय नृपती', क्षत्रिय-वर्णाचे मानतो. (भुज= 'बाहू'=क्षत्रिय : :(ऋ. पुरुषसूक्त).

: भू + जा:=भूमिपुत्र = क्षत्रिय आदित्यदेव ! वरुण, इंद्र, काल, चंद्र, सूर्य इ. (अ.व.)

## ७) पूरक : ७ वे :

**(१) 'नाग' : संकल्पना :**

सातवाहनांचा कुल-वंशीय संबंध 'नाग-कुला'शी असल्याचे काहीजण सांगतात. आणि त्याचवेळी, 'नागकुल'हे अनार्य, शूद्र, द्रवीड, परकीय, मातृगोत्र सांगणारे होते असेही अभ्यासक त्यांचे विवेचन देतात.

त्यामुळे येथे 'नागकुला' संबंधी थोडा विचार -

१. 'नाग' म्हणजे,.हत्ती, शेष हे अर्थ घेऊन 'नाग-संकल्पना' हीनतर अवस्थेतील आहे, असे प्रतिपादन केले गेले आहे.

२. वस्तुत: 'नग' शब्दाचे अर्थ पुढीलप्रमाणे आहेत.:-

१) १. सूर्य, २. पर्वत, ३. वृक्ष, ४. सात (७) ही संख्या, ५. सर्प.

त्यावरून : 'नाग' म्हणजे -

१. सूर्यज, २. पर्वतीय, ३. वृक्षीय, ४. चंद्र, ५. सातीय, ६. सर्पज, ७. चंद्रज,असे अर्थ होतात.

२) असे शब्द तयार झाल्याने त्यांचा अर्थ ''मूळ शब्दाच्या अर्थांशी संबंधित ते-ते ,'' असाही घेता येतो. अर्थात -

३) 'नाग' हे जन-गण म्हणजे, जे पर्वतीय क्षेत्रात, वनअरण्य क्षेत्रात सत्ताधीश होते ते-ते 'सूर्यवंशीय क्षत्रिय' लोक होत : तसेच ते 'चंद्रवंशीय क्षत्रिय'ही ठरतात.

४) 'नाग' व 'क्षत्रिय' यांचे; तुल्यबल समानता, समांतरता तथा पर्वतीय, श्रीपार्वतीय, वृक्षीय संबंधित कुलांशी वांशिक व विवाहसंबंध होते, हे दोहोंच्याही क्षत्रियत्वाचेच गमक आहे.

**(२) 'मातृगोत्रनाम': संकल्पना :**

कोणाही सातवाहन राजाने 'मातृगोत्रनाम' धारण केलेले नाही. भारतीय संस्कृती प्राचीन काळापासून नदीस माताच मानते. प्रत्येक भारतीय मनुष्य स्वतःस नदीचा पुत्र मानण्यात भूषण मानतो; कृतज्ञता दर्शवितो.जसे :-

१. **'नदी' हीच 'माता'** : नदीस 'यज्ञीय वेदींची माता' असे म्हटलेले आहे. कारण अधिकांश यज्ञ-परंपरा नद्यांच्या काठी विकसित झालेली आहे.

-''**एतानद्यस्तु धिष्णयानां मातरो याः प्रकीर्तिताः ॥**'' :(म. भा.वन.२१२ २४)

२. हप्तहिंदू (सप्तसिंधू), सप्त सरस्वती, सप्त गोदावर, या सर्वांना आर्य संस्कृतीने 'माता'च मानलेले आहे.

- ''**सेयं मदीया जननीव तेन मान्येन राज्ञा सरयूर्वियुक्ता ।**
**दूरे वसंतं शिशिरानिलैर्मां तरंग हस्तैरुपगूहतीव ॥**'' : (रघु. १३.६३)

= (माझ्या मातेप्रमाणेच जणू , पूज्य अशा त्या दशरथ राजापासून वियोग पावलेली ही 'सरयू' नदी दूर असलेल्या मला थंड वारा वाहत असलेल्या तरंगरूप हातांनी जणू काय कवटाळीत आहे.) -श्रीराम कथन.

३. ''**माता भूमिः ।**''

- ''**माता भूमिः पुत्रो अहं पृथिव्याः ।**'':(अथर्व. पृथ्वीसूक्त : १२-१)

४. 'सरस्वती' नदी : ही 'देव-माता' ! : (मत्स्यपु.१३-४४)

- ''**देवमाता सरस्वत्यां पारा पारातटे मता ।**
**महालये महाभागा पयोष्ण्यां पिंगलेश्वरी ॥**''

= (सरस्वती-नदीत 'देवमाता', पारा-नदीतीरी 'पारा', महालय-क्षेत्रात 'महाभाग', पयोष्णी-नदीत 'पिंगलेश्वरी', या नामांनी माझे स्मरण करावे; असे 'सती' म्हणते.)

**(३) 'सप्तगोदावर':**

उगमापासून मुखांपर्यंतची 'गोदावरी' नदी पवित्र मानिली आहे. तरीही ज्या 'सात मुखां'नी ती समुद्रास मिळते, तो 'सप्तगोदावर' प्रदेश सात नावांनी प्रसिद्ध आहे. (आंध्र प्रदेश : राजमहेंद्रीच्या पुढे) त्यांची नावे पुढीलप्रमाणे:-

**अ) सप्तगोदावरः** (नावे):

१. गौतमी (गौतमिका), २. वासिष्ठी, ३. कौशिकी, ४. तुल्यभागा,

५. वैनतेयी, ६. अत्री, ७. भारद्वाजी.

**(४) 'आंध्रभृत्य' :** आंध्रभूमिद्वारापोषित.पृथ्वी ही माता. आंध्रभूमीने पोसलेली राजसत्ता. इथे 'आंध्र' म्हणजे कोणी राजा नव्हे की 'जनसमूह' नव्हे की 'वंशजातीवर्णही' नव्हे. 'आंध्र' नामक भूमी आहे, प्रदेश आहे, गोदावरीमुख परिसराचे ते खोरे आहे.

आणि, 'भृत्य' : म्हणजे कोणी नोकर, चाकर, सेवक, आश्रित, नव्हे ! तर 'पोषित' पोषक (भृत) होय. आंध्र भू-प्रदेशाने - भूमातेने पोसलेले - आंध्र भूमीत - वाढून विकास पावलेले ते 'आंध्रभृत्य' होते. 'आंध्र-भू-स्वामी' होते.

: पुराणे याच अर्थाने सातवाहनांना 'आंध्रभृत्य' म्हणतात हे निश्चित.

(५) **'पृथ्वी हे 'ब्रह्म' आणि 'राज्याभिषिक्त पृथिवीपती' हा 'ब्रह्मन्' :**

-("पृथु" राजाची प्रतिज्ञा) : ( म. भा. १२. शांति. ५९-१०३ ते १०७):

(पृथ्वीपती = राजा).

प्राचीन भारतीय परंपरागत राज्यपद्धतीप्रमाणे प्रत्येक 'राजा' हा 'क्षत्रिय' - वर्ण-वंशाचाच असे. अशा प्रत्येक राजाला राज्याभिषिक्त होऊन राजसिंहासनारूढ होताना, 'प्रतिज्ञा' घ्यावी लागत असे. पृथुराजालाही अशी प्रतिज्ञा घ्यावी लागली होती. ती पुढीलप्रमाणे आहे :-

**"प्रियाप्रिये परित्यज्य समः सर्वेषु जंतुषु ।**
**कामं क्रोधं च लोभं च मानं चोत्सृज्य दूरतः ॥ (५९-१०४)**
**यश्च धर्मात्प्रविचल्लोके कश्चन मानव :।**
**निग्राह्यस्ते स्वबाहुभ्यां शश्वद्धर्ममवेक्षता ॥ (१०५)**
**प्रतिज्ञां चाधिरोहस्य मनसा कर्मणा गिरा ।**
**पालयिष्याम्यहं 'भौमं ब्रह्म' इत्येवचासकृत् ॥ (१०६)**
**यश्चात्र धर्मो नित्योक्तो 'दंडनीती'व्यपाश्रयः ।**
**तमशंकः करिष्यामि स्ववशो न कदाचन ॥" (१०७)**

= " हे 'क्षत्रिया' ! तुला आता मी 'महाभिषेक' करणार आहे. तेव्हा : तू प्रिय आणि अप्रिय भावना व व्यक्तिगत मनोविकार हे सर्वथः टाकून देऊन यच्चयावत प्राणिमात्रांशी सतत समबुद्धीने वागले पाहिजेस. (१०४)

: काम, क्रोध, लोभ व मान या भावना बाजूस ठेवून समर्थपणे 'प्रजारक्षण' करणे, हेच तुझे कर्तव्य होय. (१०४).

: तू शाश्वत धर्माचे स्वरूप ध्यानात घेऊन जो कोणी आपल्या कर्तव्यापासून विचलित होईल, त्याचा निग्रह (अटकाव, नियंत्रण) **स्वतःच्या क्षात्र-तेजोसंपन्न 'बाहु'-बलाने** केला पाहिजेस. (१०५).

: तू, 'मनाने, वाणीने व कर्माने या **'पृथ्वी'ला 'ब्रह्म'** अर्थात **भूमीसंबंधित ते सर्व पदार्थ व मनुष्यादि प्राणी हेदेखील 'ब्रह्म'च** समजून तिचे व त्या सर्वांचे

सतत परिपालन करीन,'' अशी श्रद्धापूर्वक प्रतिज्ञा कर. (१०६)

: तू 'दंडनीती'च्या नियमांनुसार 'राजदंडा'च्या आधारे न्याय, शिक्षा व प्रजाप्रतिपालन, त्यांचे भरणपोषण व कल्याण या सुनित्यशा शाश्वत धर्माचे आचरण आणि परिपालन निःशंक मनाने करण्याची, तसेच निर्भय चित्ताने सर्व मनुष्यादि प्राणिमात्रांचे सुचारुरूप रक्षण करण्याची अढळ निष्ठेने प्रतिज्ञा कर.'' (१०७)

● **तात्पर्य :** तेव्हा, **'पृथ्वी'** हे **'ब्रह्म'** व 'पृथ्वी-जन्य' सर्व प्रजाजनादि प्राणी व पदार्थ **('भौम' = भूमिज) हेही 'ब्रह्म' होय.** तेव्हा पृथ्वी (भूमी) व अन्य सर्वांचे परिपालन व रक्षण 'दंडनीती' ने करणारा **'क्षत्रिय' राजा तो 'ब्रह्मन्' होय.** ('ब्रह्मन' म्हणजे -राजा संदर्भात, 'ब्राह्मण'- वर्णीय व्यक्ती नव्हे ! )

६) **''आंध्र-भृत''** : (=आंध्र-भूचे स्वामी - नृपती असे 'क्षत्रिय' ! )

- भारतीय पुराण-ग्रंथांतून, सातवाहनांचा उल्लेख 'आंध्रभृत' असाही आलेला आहे. अभ्यासक त्याचा अर्थ 'आंध्र-नामक राजांचे 'सेवक' (नोकर, चाकर, आश्रित) म्हणून 'शूद्र' असा लावत आलेले दिसतात. मात्र, वस्तुतः 'आंध्र-भृत' या शब्दबंधांत सातवाहनांचे विशुद्ध, सुस्पष्ट निर्विवाद असे स्वयंसिद्ध 'क्षत्रियत्व', 'क्षत्रिय राजत्व'च निहित आहे. ते पुढील संदर्भ-स्पष्टीकरणांतून ध्यानीं येतेः-

१. 'तेन भूमिनिहितैककोटि तत्कार्मुकं च **बलिनाधिरोपितम् ।**
निष्प्रभश्च रिपुरास 'भू-भृतां' धूमशेष इव धूमकेतनः ॥'' :(रघुवंश : ११.८१)
:('भू-भृत' / 'भूमि-भृत' = क्षत्रिय, राजा; 'क्षत्रिय राजा', )

-त्या धनुष्यास प्रत्यंचा-दोरी चढविताक्षणीच, 'क्षत्रियांचे'(='भू-भृतं') शत्रू परशुराम; जसे - ज्या अग्नीचे ठायी केवळ धूरच शेष -शिल्लक उरलेला असावा; तसे- त्यासमान निस्तेज बनून गेले. : (रघु : ११.८१)

-(कालिदास ग्रंथावलीः सीताराम चतुर्वेदी. आ. ४, १९८०; रघु, पृ.१०८)

२. भू- भृत / भूमि-भृत =(१) पर्वत, (२) राजा, (३) क्षत्रिय, ( रघु.११८१); : ( गीर्वाणलघु को. पृ. ३६०).

३. म्हणूनच-
: 'आंध्रप्रदेशीय, आंध्रभूमीय 'क्षत्रिय'.
:'आंध्र'-नामक जनगणांची भूमी ती 'आंध्र'भूमी. 'आंध्र'-देश.
-तेव्हा, 'सातवाहन' हे 'आंध्रदेशीय क्षत्रिय';
(=आंध्र-भृत ) होते,हे सुस्पष्ट होतेः ( पुराणे).

●●●

# ४. वाकाटक -

## :वाकाटक राजवंशाचा 'वर्ण' कोणता ?

● वृष्णिवृद्ध' गोत्र: ('गोत्रप्रवरनिबंध-कदंबकम्' मध्ये हे गोत्र आढळत नाही.)

- वाकाटकांच्या 'वाशीम ताम्रपटा' त तर त्यांच्या 'वृष्णि-वृद्ध' गोत्राची नोंद आहे.

-''वत्सगुल्माद्धर्म्म महाराजस्य'वृष्णिवृद्ध सगोत्रस्य-''

- वाकाटकांचे हे 'विष्णुवृद्ध' नव्हे, तर 'वृष्णिवृद्ध' गोत्र ताम्रपटांत आहे. याची दखल स्वतंत्रपणे घेऊन कोणी विचार केल्याचे दिसून येत नाही. मात्र, उलट-

''ते नेहमीप्रमाणे 'विष्णुवृद्ध' असे वाचावे,'' असे डॉ. वा. वि. मिराशी तळटीपेत सांगतात. ते तसे कां वाचावे ? याचा खुलासा तेही करीत नाहीत, वा इतर कुणीही करीत नाहीत. हे कसे? (वृष्णिवृद्ध म्हणजे वृष्णीचे वंशज असा या शब्दाचा अर्थ होतो आणि श्रीकृष्ण हा 'वृष्णी' वंशातला आहे.)

''विष्णुवृद्ध गोत्र'' /कि?/''वृष्णिवृद्ध'' गोत्र-? यांतील ही दोन्ही गोत्रे मूलत: क्षत्रियांचीच आहेत; त्यावरूनही वाकाटक हे सोम/चंद्रवंशी 'क्षत्रिय' च ठरतात.

●●●

# ● विभाग : १ ला : पूर्वार्ध : वाकाटक वर्णचर्चा: पूर्वपीठिका :

### (१) वाकाटक राजवंश : पार्श्वभूमी :

१. इ.स.२५० नंतर, सातवाहन-राजसत्तेनंतर वाकाटक राजसत्तेचा उदय झाल्याचे इतिहासकार सांगतात. वाकाटकांप्रमाणे 'सम्राट' ही पदवी त्या काळात इतर कोणी धारण केलेली दिसत नाही. हे घराणे इ.५५० पर्यंत सत्तेवर होते.

:(सं.मु.३:वा.वि.मिराशी : पृष्ठ ६५).

२. सन १९१४ मध्ये प्रकाशित, डॉ. व्हिन्सेन्ट स्मिथकृत 'प्राचीन भारतीय इतिहास' ग्रंथात 'वाकाटकां' चे नांवही आलेले नाही. :(सं.मु.३:के.तु.मंगळमूर्ती)

३. या घराण्याचा मूळ पुरुष 'वाकाटक'. :(अमरावतीस्तूपलेख, जि.गुंटूर, तेलुगुदेश).

४. 'विंध्यशक्ती' हा 'वाकाटकां' चा मूळ पुरुष. याने विदर्भात 'सातवाहन' राजसत्तेचा उच्छेद करून आपली राजसत्ता प्रस्थापित केली, अन् वाकाटक-युग (='कार्तयुग') सुरू झाले; हेच विदर्भाचे 'सुवर्णयुग'.

५. (स.१९५७ पूर्वी) सुमारे १२५ वर्षांपूर्वी या नामांकित राजवंशाचे नांवही कोणास माहीत नव्हते.

६. पुराणांत या राजवंशाचे नांव 'किलकिला', 'कैलिकिला' असे आले आहे.

७. सन १८३६ मध्ये सापडलेल्या प्रवरसेन (२ रा) च्या 'सिवनी' - ताम्रपटावरून 'वाकाटक' राजवंशनाम, प्रथम ज्ञात झाले.

८. वाकाटक हे सनातन धर्माचे पुरस्कर्ते होते.

९. वाकाटकांनी अनेक-विध 'यज्ञ' केले : (१) अग्निष्टोम, (२) उक्थ्य,
(३) षोडशिन,
(४) अतिरात्र, (५) वाजपेय ('वाजिमेध'), (६) बृहस्पतिसव, (७) आप्तोर्याम,
(८) नाद्यस्क्र, (९) राजसूय, (१०) ४ अश्वमेध-यज्ञ.

१०. ''महाभैरव-भक्त'' असे 'बिरुद' वाकाटकांनी घेतले होते.

११. 'देवसेन' हा वाकाटक राजा 'विष्णु-भक्त' होता.

१२. वाकाटकांनी अनेक दाने 'कार्तिक'-मासातच दिलेली आहेत; इतके त्यांना 'कार्तिका' चे माहात्म्य वाटत होते. कारण:-

१) 'कार्तिक शु. नवमी', 'युगादि' नामक आहे. (मदनपारिजात). कारण, या तिथीपासून युगास आरंभ होतो. :(मत्स्य. १७.४)

२) 'कार्तिक द्वादशी' हे मन्वंतर आहे;
:(वायु पु. ८०-५४-६१, मत्स्य पु.१७-६, स्कंद पु. वै.खं.१-३६-३७.)

१३. वाकाटकांचे कोरीव लेख ('ताम्रपट' हे सर्व संस्कृतात) उपलब्ध झाले आहेत. ते वेळोवेळी मूळ ठशांसह प्रकाशित झाले आहेत. त्यांचा अभ्यास करून

अनेकांनी विवेचने प्रकाशित केली आहेत, त्यांत इंग्रज संशोधक व भारतीय संशोधक सहभागी आहेत.

**(२) वाकाटक राजे कोण होते ?**

१. पुराणांत वाकाटकांना 'किलकिला'/'कैलिकिला'/'कैलिकिलायन' असे म्हटले आहे. :(विष्णु पु.४.२४.१६)

**"तेषूच्छिन्नेषु 'कैलिकिलायना' भूपतयो भविष्यन्ति 'मूर्द्धाभिषिक्त' स्तेषां विंध्यशक्तिः ॥"** (१६)

- पौर राजांचा उच्छेद होऊन 'कैलिकिला' नामक नगरीत जन्मलेले (काही पुरुष) राजे होतील. 'विंध्यशक्ती' हा त्यांतील मुख्य होय. (१६)

२. मध्ययुगीन चरित्र कोशाच्या मतें 'वाकाटक' व 'भोज' हे एकच होत. आणि-

३. (१) 'नाग' (=नव नाग?), (२) 'भारशिव', व (३) 'वाकाटक' या 'तीन घराण्यां' नी हिंदुस्थानवर साम्राज्य गाजविले. (म.च.को.)

या चारही घराण्यांचे परस्पर विवाह-संबंध झालेले दिसून येतात.

४. सात भारशिवांपैकी 'भवनाग' राजाची कन्या, 'विंध्यशक्ती' च्या नातवास-गौतमीपुत्रास दिली होती. त्याचा पुत्र "शिशुक" हा अज्ञान असतांच वाकाटकांच्या हातांत सर्व सत्ता गेली होती.

५. वाकाटक घराण्यात 'प्रभावती गुप्त' ही राजकन्या आली आणि वाकाटक-साम्राज्य 'गुप्त'-राजघराण्याच्या हातांत गेले.

**(३) वाकाटक :** वाकाटक राजघराण्यात एकूण १२ राजे होऊन गेले. त्यांतील विंध्यशक्ती, प्रवीर यांची नावे पुराणांत आढळतात. उरलेल्या १० नांवांच्या जागीं भिन्न नावे पुराणांत आहेत. : (म.च.को.पृ.७२६).

**(४) किलकिला:** कोलिकिल या राजवंशाचा उल्लेख पुराणांत येतो. :(वि.पु.पृ.२४;१५-१७).

१. 'मत्स्य' पुराणात - (२७३.२४) आंध्र-राजांच्या इतिहासानंतर -

-**"तेषु स्थानेषु कालेन ततः 'किलकिळा'नृपाः ।"**

असा उल्लेख येतो.

२.'नाणी व शिलालेख' यांच्या अभ्यासावरून हे 'किलकिला राजे' म्हणजे 'भारशिव' राजे, किंवा 'वाकाटक' या घराण्यांतील राजे होत, हे दिसते. : (म. च. को.)

३ 'नाचणा'या ठिकाणी ('विदिशा नाग' राजांची नगरी, वाकाटक व भारशिव घराण्यांसंबंधी शिलालेख, नाणी, ताम्रपट उपलब्ध झाले आहेत. तेव्हा, 'नाचणा' म्हणजेच 'पुरीकांचनका' असावेसे दिसते.

**"विंध्यशक्तिसुतश्चापि 'प्रवीरो' नाम वीर्यवान् ।**
**भोक्ष्यन्ति च समः षष्ठिं पुरीं कांचनकां च वै ।"**

४. 'पुरीकांचनका' येथील 'नागराजे' हेच 'भारशिव' होत; हे घराणे पुढे 'वाकाटक'

घराण्यात विलीन झाले.

५. **'कोलिकिल:'**

''ततः **'कोलिकिलेभ्यश्च विंध्यशक्तिर्भविष्यति ।**
**समः षण्णवतिं भूत्वा पृथिवीं तु समेष्यति ।।''** :(वायु पु.ब्रह्मांड पु.)
:(डायनेस्टीज् ऑफ कलि एज. पार्गिटर. पृ. ४८)

६. विंध्यशक्ती-वाकाटक, हा मूळचा 'वाकाट' अथवा, 'वकाट', 'वगाट' 'वागाट' नामक गांवचा राहणारा. हे गांव बुंदेलखंडातील ओर्च्छा संस्थानातील झांशी जिल्ह्यातील चिरगावच्या पूर्वेस ६ मैलांवर आहे.

७. विंध्यशक्ती-वाकाटक हा **''विष्णुवृद्ध गोत्री ब्राह्मण''** होता.. (हे असत्य!)

८. सन्ना ते पन्ना रस्त्यावर पन्ना-नजीक 'किलकिला' नदी आहे. वागाट व 'किलकिला नदी' एकाच प्रदेशात आहेत. यावरून या राजवंशाला 'किलकिला' नांव मिळाले असावे.

९. ''वाकाटक घराण्याच्या मूळ पुरुषाचे 'विंध्यशक्ती' हे नांवही कर्तृत्वदर्शक असावे, कारण-

**या 'ब्राह्मण सेनापती'ने-(??)**

'नागराजे' आपल्या पडत्या काळात पद्मावतीहून विंध्याद्रीचे आश्रयास गेले असतां विंध्याद्रीच्या सभोवतालच्या प्रदेशावर त्यांना आपली सत्ता टिकविण्यास व वाढविण्यास, मदत केली, तिचे निदर्शक आहे.'' :(म.च.को.)

**(५)'भारशिव' राजे:** :(म.च.को. चित्राव : पृ.२३४, २३५)

१. 'भारशिव' राजे, हे 'शिवभक्त' होते. हे 'शिवभक्तिदर्शक' नांव त्यांनी सहेतुक घेतले असावे.

२. त्यांच्या नाण्यांवर 'नागवंशीय राजां' च्या 'राजचिन्हांपैकी' 'ताड-वृक्ष' व 'फणा पसरलेला नाग' ही चिन्हे आढळतात !

३. शिवाय, 'गंगा-यमुना' यांच्या मूर्ती 'राजा' ला (राज्याभिषेक)/''मूर्धाभिषेक'' करीत असलेल्या दाखविलेल्या असतात.

४.**''अंशभारसन्निवेशितशिवलिंगोद्वहनशिव सुपरितुष्टा समुत्पादितराजवंशानां पराक्रमाधिगत-भागीरथ्यामलजल-'मूर्धाभिषिक्तानां' दशाश्वमेधावभृतस्नानानां भारशिवानाम् ।।''** :(इलिचपूर जवळील चमक गांवी प्राप्त ताम्रपट.)

- असे वर्णन असलेल्या 'भारशिव राजां'चाच उल्लेख पुराणामध्ये ''किलकिलानृपा:!'' असा येतो. त्यामुळे 'भारशिव' राजे हेच 'किलकिला' राजे व 'नागवंशीय' राजे असल्याविषयी संशय राहत नाही.

५. 'भारशिव' घराण्यातील राजांना, 'नवनाग' असेही पुराणांत म्हटले आहे. ('शिशुनाक'-'वंशाचे'-?)

६. असे म्हणण्याचा हेतू असा की, त्यांनी 'नागराजां' ची परंपरा पुनरुज्जीवित केली, म्हणून ते 'नवनाग' होत. (?)
७. 'भारशिव' व 'वाकाटक सम्राट' हे आपल्या मुलांच्या व नातेवाईकांच्या नेमणुका, साम्राज्यांतील प्रांतांवर करून, त्यांस त्यांच्या ताब्यांत दिलेल्या प्रांतांचा राज्यकारभार स्वतंत्रपणे पाहण्यास पूर्ण स्वातंत्र्य देत.
-त्यामुळे या घराण्याच्या 'अनेक शाखा' निर्माण झाल्या.
८. या राजघराण्यांतील राजांनी केलेल्या- "दशाश्वमेध" यज्ञाची स्मृती काशीतील, 'दशाश्वमेध-घाट' या नांवात दिसते. हे राजे आपणांस "राज्यभिषेक" काशी येथे करीत असल्याचा पुरावा, हिंदु युनिव्हर्सिटी, बनारस येथील ज्या भागात आहे, त्या, काशी येथील एक भाग "नागव" या नांवांत आढळतो.

**(६) 'भारशिव' हे 'क्षत्रिय' होते:** : (म.च.को. चित्राव, पृ.२३५)
१. 'किलकिला' राजांपैकी "भारशिव राजे" हे 'क्षत्रिय' ('मूर्धाभिषिक्त') होते;
२. व 'वाकाटक' हे मूळचे 'ब्राह्मण' होते. (!) :(हे असत्य !)
३. वाकाटकांच्या गौतमीपुत्र नांवाच्या राजकुमाराचे लग्न 'भारशिव' घराण्यांतील मुलीशी झाल्यावर वाकाटकांकडे 'सम्राट'-पद आले.

**(७) वाकाटक-राजघराणे :**
१. चंद्रगुप्त (२ रा) विक्रमादित्याची कन्या, 'प्रभावती' ही वाकाटकांच्या पृथ्वीसेनाच्या 'रुद्रसेन नांवाच्या कुमाराची पत्नी होती. या लग्नसंबंधाने, वाकाटक राजघराणे मागे पडले व गुप्त घराण्याच्या साम्राज्याचा विस्तार झाला.

(८) 'किलकिला' नृपती = भारशिव व वाकाटक राजे : (म.च.कोश.चित्राव.पृ.२३५).
१. अशा प्रकारें "किलकिला नृपा: ।" या नांवाने ओळखल्या जाणाऱ्या 'भारशिव' व 'वाकाटक' राजांनी, प्राचीन 'नाग' राजवंशांची परंपरा पुनरुज्जीवित केली, व 'गुप्त'-घराण्याच्या साम्राज्याचा उदय होईपर्यंत ती टिकविली, तिची वाढ केली, तिचा प्रसारही केला.
२. या 'किलकिला' राजांचा इतिहास उपलब्ध होण्यापूर्वी- 'आंध्र' व 'कुशान' साम्राज्ये नष्ट झाल्यावर 'गुप्तां' च्या साम्राज्याची प्रस्थापना होईतों हिंदुस्थानात सर्व हिंदुस्थानवर सत्ता असलेली 'साम्राज्ये' नव्हती..
- असे 'स्मिथ' वगैरे इतिहासकारांना वाटत असे. हे मत अर्थातच आता असिद्ध ठरलेले आहे. :(सि.शा.चित्राव).

**(९) वाकाटकांचा 'वर्ण' कोणता ?**
१. 'वाकाटक' नृपती हे 'यवन' किंवा 'ग्रीक' वंशाचे असून, त्यांनी वैदिक यज्ञ करण्यात, तसेच बौद्ध धर्माच्या उत्तेजनार्थ मोठमोठी व अतिशय खर्चाची कामे करण्यात पुढाकार घेतला होता. :(डॉ. भाऊ दाजी.१८६२) : (रॉ.ए.सो.ज.मुंबई.पु.६वे) :(मध्यप्रांत गॅझे. ओरिसा-वर्णन).

२. स. १८३६ ते १८६२ नंतरच्या संशोधनावरून असे सिद्ध झाले आहे की, या वंशाचा मूळ पुरुष 'विंध्यशक्ती' हा **'ब्राह्मण'-जातीय** होता; कारण त्याचे वर्णन, अजंठा-लेणे क्र. १६ मधील कोरीव-लेखात **'द्विज'** असे केले आहे. ('रणदानशक्तिः **'द्विज-प्रकाशो'** भुवि विंध्यशक्तिः । ) :(पूर्णतः असत्य !)
-वाकाटकांचे 'विष्णुवृद्ध गोत्र' ही त्यांच्या (=वाकाटकांच्या) बहुतेक ताम्रपटांत उल्लेखिलेले आढळते; (मात्र वाशीम ताम्रपटात ''वृष्णिवृद्ध'' गोत्र नमूद आहे. त्याची चर्चा कोणीही केली नाही.)
-तेव्हा, सातवाहनांप्रमाणे, वाकाटक हेही **'ब्राह्मण'** होते, हे आता **सर्वमान्य** झाले आहे. (!)
- संशोधनाने झालेला केवढा हा मोठा फरक.(!!)
- या एका उदाहरणावरून गेल्या पन्नास वर्षांत (स. १९५७ पूर्वीच्या) संशोधकांच्या परिश्रमांनी या राजवंशाविषयींच्या आपल्या माहितीत किती भर पडली आहे ! याची कोणालाही कल्पना करता येईल !! : (वा. वि. मिराशी : वा. नृ. आणि त्यांचा काल : पृ. २ : १९५७).
३. आंध्राचे ''कैंकिल यवन''- राजे, म्हणजेच 'वाकाटक' हे होत.
:(चिं. वि. वैद्य : म.यु.भा. १ : पृ. २६१ ते २६३).
४. वाकाटक हे **'ब्राह्मण'** होते. :(शीवनी व चम्मक-लेख?)
५. या राजांनी अग्निष्टोम, राजसूय, अश्वमेध इ. (श्रौत यज्ञ करून कीर्ती मिळविली व ''परिव्राजक'' असे विशिष्ट नांव धारण केले.
:(प्रा. जुव्हो.डुब्रुइल:Ancient History of the Deccan.)
६. 'वाकाटक' हे 'ग्रीक' होते, ही समजूत चुकीची आहे.
: (चिं.वि. वैद्य; म. यु. भा. १, पृ. २६१).
७. **''महाविमर्देष्वभिवृद्धशक्तिः क्रुद्धः सुरैरप्यनिवार्य्य (वीर्य्यः)।**
**रणदानशक्तिः 'द्विज-प्रकाशो' भुवि विंध्यशक्तिः ॥ २ ॥''**
**पुरंदरोपेंद्रसमप्रभावः स्वबाहुवीर्यार्जित सर्वलोकः ।**
**....कानां बभूव वाकाटक-वंश-केतुः ॥ ३ ॥''**
= (येथील **'द्विज'** शब्दावरून हा विंध्यशक्तीवा काटकनृपती **'ब्राह्मण'** होता, असे दिसते. : (वा.वि.मिराशी)
८. बौद्धमत-प्रवण सातवाहनांनंतर महाराष्ट्रात 'वाकाटक' नामक 'परिव्राजकां'चे 'हिंदु'-राज्य होते. :(फ्रेंच विद्वान डुब्रुइल): (''Ancient History of the Deccan P. 71)
९. विंध्यशक्ती (वाकाटक) हा 'कोलिकिल' नामक 'एका जाती' चा शासक मानला गेला आहे.
**''ततः कोलिकिलेभ्यश्च विंध्यशक्तिभविष्यति ।**
**समाःषण्णवर्तिं ज्ञात्वा पृथ्वीं तु समेष्यति ॥''** :(वायु पु. /ब्रह्मांड पु.)

१०. 'विष्णुपुराणा' ने 'कोलिकिल' नरेशांची गणना 'यवनां' मध्ये केली आहे. (प्राचीन भारतका राजनैतिक / सांस्कृतिक इतिहास : डॉ रतिभानुसिंह ' नाहर'; संस्क. ५वें : १९७४, पृ. ४९४- ४९५.) .

**-''तेषूच्छिन्नेषु 'केलिकला यवना' ।**
**भूपतयो भविष्यन्ति ' मूर्द्धाभिषिक्त' स्तेषां विंध्यशक्तिः ॥''**

(विष्णु पु.४.२४.१६), (Dynasties of the Kali Age : पार्गिटर,.P.48)

मात्र या पुराणांचा मूळ पाठ 'कैलिकिलायनाः ।' असा आहे.

-परंतु भ्रष्ट पाठ, तसेच अशुद्ध विन्यास (वाचन/लेखन) या कारणांनीच चुकीने विंध्यशक्तीस 'यवन' तथा 'यूनानी' (ग्रीक? म्लेच्छ?) जातीचे मानले गेले आहे.

-वास्तवतः **'वाकाटक'** हे **'ब्राह्मण जाती'** चे होत; कारण-

-अजंठ्याच्या लेणे क्र. १६ मधील कोरीव लेखाच्या संपादनाचे वेळी डॉ. वा. वि. मिराशींनी म्हटलेच आहे की, ''विंध्यशक्ती हा एक 'द्विज' राजा होता, व तो 'विष्णुवृद्ध' गोत्राचा होता.'' : (डॉ. रतिभानुसिंह 'नाहर', पृ. ४९४)

११. डॉ. काशीप्रसाद जायस्वालांनीही वाकाटकांना **''द्विज-प्रकाश''** च्या आधारें **'ब्राह्मण'** वर्णाचे ठरविले आहे. (J.B.O.R.S.) मार्चः जून : १९३३; पृ. ६७) :(J.R.A.S.१९१४ पृ. ३१७ ते ३३८.)

(गोविंद पाईः Genealogy & Chronology of the Vakatakas.)

:( jour. Ind. histi. - 14 (1935) पु.१-२६,१६५-२०४)

- परंतु, हे प्रमाण सर्वथा ग्राह्य नाही, ते याचसाठी की, **'द्विज'** शब्दाचा प्रयोग (वापर) **''क्षत्रिय राजा''** च्या संबंधातही होऊ शकत होता; असे **रमाशंकर त्रिपाठी** म्हणतात. :(प्राचीन भारतका इतिहास : पृ.२०१).

१२. 'वाकाटक' हे **'ब्राह्मण'** होते !(के.पी. जायस्वाल : J.B.O.R.A. VOI XIX, 1933, P. 66)

**(१) 'वाकाटक' हे ब्राह्मण' होते, यात शंका नाही.** ( "That the Vakatakas were 'Brahmins' admits of no doubt."). कारण-?

१. त्यांनी 'बृहस्पति-सव' यज्ञ केले होते, की जे ब्राह्मणांकरिताच होते. ("...Which are intended for and open to Brahmins only.")

(२) 'बृहस्पति-सव-यज्ञ' परंपरेत कधीच बदल घडला नव्हता.("About the exclusive chorarcter of 'बृहस्पति-सव-यज्ञ' the tradition never changed.").

(३) वाकाटकांचे गोत्र 'विष्णु-वृद्ध' हे 'ब्राह्मणांचे गोत्र' असून ते महाराष्ट्रात अजूनही अस्तित्वात आहे. (''ही माहिती डॉ.दे.रा भांडारकर यांनी पुरविली''- काशीप्रसाद जायस्वाल.).

● (मात्र वाशीम ताम्रपटात तेच 'वृष्णिवृद्ध' गोत्र असे नमूद आहे.)

(४) 'विंध्यशक्ती'-वाकाटक नृपतीस '**द्विज**' किंवा '**ब्राह्मण**' असे म्हटले आहे-
[''.....**द्विज**-प्रकाशो भुवि विंध्यशक्ति :....।'']
● [ A. W. S. R. Vol. IV, PP. 125, 128 fn. Plate L VII. ]
(५) 'विंध्यक' (:'वाकाटक') राजकुल हे 'किलकिला' देशातील 'किलकिला' नदी-प्रदेशात उदयास आले. : (भाग.पु. विदिशानाग, प्रवीरक, किलकिल-नृपती).
(६) 'वाकाटक'-नृपती म्हणजे, 'वाकाटक' नामक जनांचा नृपती नव्हे; तर 'वाकाटक-वंशा' चा, 'वाकाटक-कुला'तील नृपती.(पृ.६७):(जसे:१. 'वाकाटकानां', २. 'कदंबानां'।)
-अर्थात हे 'जनजातिसमूहवाचक' नांव नव्हे, तर 'विशिष्ट वंशवाचक' नांव होय.
(७) 'वाकाटक' = of the place 'वाकाट' or 'वकाट' । (वागाट/ वगाट)।
(जसे : 'त्रैकूटक') ।
(८) अमरावतीच्या कोरीव लेखात इ. स.पू. १५० मधील 'वाकाटक' नामक ('वाकाट' देशींचा रहिवासी) प्रवासी पुरुषांची नोंद आढळते. (E. I. VOl. XV, P. 267, INSCRI. NO. 27)
(९) इतर पुराणे 'विंध्यका' चा 'वर्ण' /'जाती' सांगत नाहीत; पण 'विष्णुपुराण' संभ्रमात पडल्याचे जाणवते, : (मत्स्य पु. Text.२७३.२४).
१. ''तेषूत्सन्नेषु कालेन ततः 'किलकिलानृपाः' ॥
भविष्यंतीह यवना धर्मतो कामतोऽर्थतः ॥'' (मत्स्य : २७३.२४).
= (आभीर राजांनंतर कालेंकरून 'किलकिल' नामक राजे होतील; नंतर पृथ्वीवर 'यवन ' नृपती होतील. (तेथे 'किलकिल' हे 'यवन' नव्हेत !!) /
: ('यवन' = कुशाण, Yauna, Yavana; J. B. O. R. S. XVIII; 201)
२. यानुसार 'विष्णु पुराण' हे 'भागवत पुराणा' चे अनुक्रमण करीत नाही. उलट विष्णुपुराणाचा टीकाकार मात्र वेगळेच वाचन देतो, व स्पष्टीकरणात म्हणतो:- की, त्या वाचनानुसार 'विंध्यशक्ती'-वाकाटक-नृपती हा 'क्षत्रिय' (अर्थात् 'हिंदू' ही) नृपती होता. टीकाकार म्हणतो :-
-''विंध्यशक्तिर्-**मूर्धाभिषिक्त,** इति पाठे ''**क्षत्रिय-मुख्य**'' इत्यर्थः ॥''
-मात्र या वाचनानुसार 'विंध्यशक्ती' हा 'कैलकिला' हा यवनांपैकी ठरत नाही.
३. ''**यवनाः** ।'' हे (मत्स्य पु.) पुढचे ओळीतील शब्द आधीच्या 'कैलकिल'शी जोडून योजल्याने ही चूक घडल्याचे स्पष्ट दिसून येते.
४. 'विष्णुपुराणा' च्या कुठल्याही हस्तलिखितांत 'कैलकिला' हे 'यवन' होत, असे विधान टीकाकारास आढळलेले नाही.
'मत्स्यपुराणा' चे अनुकरण करणारांनी पुढील काळात 'कैलकिलां' ना 'यवन' गणले.
: (पाहा : १. वायु पु. ९९-३६४ ते ३७३; २. ब्रह्मांड. १७८-१७९; ३.भाग. ३२.३३?).
**(१०) 'हारीती-पुत्र' : वाकाटक : १)** 'चुटुकुलानंद सातकर्णी (विण्हुकड),

२) 'कदंब', ३) पल्लव, व ४) 'चालुक्य'-नृपती हे जसे स्वत:स 'हारीती-पुत्र' व 'धर्म महाराज' म्हणवितात, तद्वत 'वाकाटक' -नृपती हेही आपणांस 'हारीती-पुत्र' व 'धर्म महाराज' म्हणवितात :(वाशीम ताम्रपट) : (वा. वि. मिराशी : Annual Bulletin Nagpur University, No.1,P. 9) [ A study of Ancient India, P. 447. -Provatansu Maiti, Calcutta, 1964,]

(११) 'किलिकिला' : नगरी : (पौराणिक कोश : पृ. १११, (हिंदी) संस्क. २, १९८६. राणाप्रसाद शर्मा).

१. भूतनंद आदि राजांची राजधानी 'किलिकिला' नगरी होय.

२. 'किलकिल' हा 'किलकिला' नगरीत राज्य करणारा एक राजवंश होय.

: (ब्रह्मांड पु.)

**(१२). विष्णुवृद्ध (/गोत्र) :**

(अ) "दानाच्छ्रेयस्तथा यज्ञोच्छ्रेयस्तथा तपः ।
संन्यास्तपसः श्रेयांस्तस्माज्ज्ञानं गुरु स्मृतम् ॥
श्रूयन्ते हि तपःसिद्धाः **क्षात्रोपेतो द्विजातयः** ।
विश्वामित्रो नरपतिर्मांधाता संकृतिः कपिः ॥
कपेश्च पुरुकुत्सश्च सत्यश्चानृहवानृथुः ।
आर्ष्टिषेणोऽजमीढश्च भागान्योऽन्यस्तथैव च ॥
कक्षीवश्चैव जयस्तथाऽन्ये **महारथाः** ।
रथीतरश्च रुंदश्च "**विष्णुवृद्धा**"दयो नृपाः ॥
क्षात्रोपेताः स्मृता ह्येते तपसा ऋषितां गताः ।
एते **राजर्षयः** सर्वे सिद्धिं सुमहतीं गताः ॥

: (वायु पु. ९१-११४ ते ११८).

= (दानाहून अधिक श्रेयस, यज्ञ करणारा असतो; यज्ञाहून श्रेयस तप असते. तपाहून श्रेयस संन्यास (त्याग, विरक्ती) होय. त्याहूनही श्रेष्ठ ज्ञान होय.)

-तपः श्रेष्ठ, क्षात्रधर्मनिसंपन्न द्विजाति द्विज राजे विश्वामित्र, मांधाता, संकृति, कपी, कपीचा पुरुकुत्स, सत्य, आनृहवान्, ऋधु, अर्ष्टिषेण, अजमीढ, भागान्योन्य, कक्षीव, जय, महारथ, रथीतर, रुंद आणि "विष्णुवृद्ध" प्रभृति राजे हे सर्व "क्षत्रिय' होते. त्यांनी तपस्येने ऋषित्व प्राप्त केले. ('ब्राह्मणत्व' नव्हे!) हे सर्वजण 'राजर्षि' होते, त्यांनी महान (महती) सिद्धी प्राप्त केली होती.

**(आ) 'विष्णुवृद्ध'** : (एक गोत्र / एक राजाः) : (प्रा.भा.च.को. चित्राव शास्त्री पृ. ८९०). : (सूर्यवंश / इक्ष्वाकू).

१. (१) "विष्णुवृद्ध" हा एक "राजा." तो "त्रसदस्यू" या राजाचा पुत्र होता.

(२) हा प्रथम, **'क्षत्रिय'** होता. परंतु पुढे तो तपस्येमुळे **'ब्राह्मण'** झाला, बनला! (?) :(ब्रह्मांड. ३-६६-८८), (वायु. ९१-११४ ते ११८).

(३) याचे वंशज, 'अंगिरस' कुलोत्पन्न 'ब्राह्मण' बनले. (?) : (वायु. ६५ १०७)

२. 'विष्णुवृद्ध' की 'वृष्णि-वृद्ध-गोत्र ?'

:(सूर्यवंश/इक्ष्वाकू), (ब्रह्मांड पुराण : ३-६६.८५ ते ९०):

१) एक 'राजा'.
२) एक 'गोत्र'.

- "तपसा तु सुतप्तेन लोकान्विष्टभ्य तिष्ठति ।
सत्यं तु तपसः श्रेय स्तस्माज्ज्ञानं गुरु स्मृतम् ॥ ८५ ॥
श्रूयते हि तपस्सिद्धाः क्षत्रोपेता द्विजातयः ।
विश्वामित्रो नरपतिर्मांधाता संकृतिः कपिः ॥ ८६ ॥
काश्शश्च पुरुकुत्सश्च शलो गृत्समदः प्रभुः ।
आर्ष्टिषेणोऽजमीढश्च भार्गव्योमस्तथैव च ॥ ८७ ॥
कक्षीवांश्चैवोशिजश्च नृपश्च शिशिरस्तथा ।
रथान्तरः शौनकश्च विष्णुवृद्धादयो नृपाः ॥ ८८ ॥
क्षेत्रोपेता स्मृता ह्येते तपसा ऋषितां गताः ।
एते राजर्षयः सर्वे सिद्धिं तु महतीं गताः ॥ ८९ ॥
अत ऊर्ध्वं प्रवक्ष्यामि आयोर्वंश महात्मनः ॥ ९० ॥"

(इ) 'विष्णुवृद्ध गोत्री' : कोकणस्थ ब्राह्मण : (?)

● आडनांवे :

| | | | |
|---|---|---|---|
| १. | आळेकर, | ६. | नेने, |
| २. | करवीर, | ७. | परांजपे, |
| ३. | किडमिडे, | ८. | बाकळकर, |
| ४ | किणकिणे, | ९. | मंडलीक, |
| ५. | देव, | १०. | राणे. |

३) (वाकाटकांचे "वृष्णिवृद्ध' गोत्र त्यांच्याच 'वाशीम ताम्रपटा' त नमूद आहे. ते "गोत्रप्रवरनिबंधकदंबकम्" या ग्रंथामध्ये नमूद नाही.

१. ऋषय ऊचुः ॥ :(ब्रह्मांड पुराण. ३-६६-७६):

-"किलक्षणेन धर्मेण तपसेह श्रुतेन वा ॥ ७६ ॥
ब्राह्मण्यं समनुप्राप्तं विश्वामित्रादिभिर्नृपैः ।
येनयेनाभिधानेन ब्राह्मण्यं क्षत्रिया गताः ॥ ७७ ॥"

(ई) १. 'राजर्षि' । : (वायु. ९३-२३) :

"गार्ग्यस्य हि सुतं बालः स राजा जनमेजयः ।
दुर्बुद्धिर्हिंसयामास लोहगंधं नराधिपम् ॥ (९३.२२)
स लोहगंधो राजर्षिः परिधावन्नितस्ततः ।

पौरजानपदैस्त्यक्तो न लेभे शर्म कर्हिचित् ।। (९३.२३)
ततः सः दुःखसंतप्तो नालभत्संविदं क्वचित् ।
शशाप हेतुकमृषिं शरण्यं व्यथितस्तदा ।।"(९३.२४)

२. अश्वमेध : "इंद्रोतो नाम विख्यातो योऽसौ मुनिरुदारधीः ।
याजयामास चेंद्रोतः शौनको जनमेजयम् ।।
अश्वमेथेन राजानं पावनार्थं द्विजोत्तमः ।।" (९३.२५)

= राजा कुरुचा पुत्र आणि राजा परीक्षित याचा तो रथ धीमान 'गार्ग्य' च्या शापाने नष्ट झाला होता. (२१)

- त्या राजा जनमेजयाने बालकवयात दुर्बुद्धी होऊन गार्ग्यपुत्र लोहगंध नराधिपाची हिंसा (?) केली होती. (!) (२२)

तो राजर्षि लोहगंध इकडे-तिकडे धावत पौरजानपदद्वारा त्यागिलेला कुठेच शांती व कल्याण प्राप्त करू शकला नाही. (२३)

- नंतर दुःख-संतृप्ततेमुळे कोठेच 'संविद' प्राप्त करू शकला नाही. तेव्हा अत्यंत व्यथाग्रस्त होऊन त्याने शरण्य हेतुक ऋषीला शाप दिला होता. (२४)

- उदारबुद्धी मुनी इंद्रोत आणि द्विजोत्तम शौनक यांनी जनमेजय राजाला पावन होण्यासाठी 'अश्वमेध' यज्ञ करण्यासाठी योजिले. (२५)

**(१३) प्रस्तुत पूर्वपीठिकेचे सारसूत्र :** (वाकाटक वर्ण-निश्चितिसंदर्भात) :-

१. भारशिव हे 'क्षत्रिय' होते व त्यांचे विवाह-संबंधित असे 'वाकाटक' होते, व ते '**ब्राह्मण**' होते. (.....'**द्विज-प्रकाश**' भुवि.....।') (**द्विज** = '**ब्राह्मण**' च मानून.)
: (जयस्वाल, वा. वि. मिराशी).

२. वाकाटकांचे 'गोत्र' होते 'विष्णुवृद्ध'. हे 'गोत्र' महाराष्ट्र-ब्राह्मणांत आजही आहे; तेव्हा वाकाटक हे '**विष्णुवृद्ध गोत्री**' '**ब्राह्मण**' होते.
: (जयस्वाल, वा. वि. मिराशी).

३. वाकाटक हे 'यवन'/'ग्रीक' वंशाचे होते. : (डॉ. भाऊ दाजी).

४. 'आंध्र-कैंकिल यवन' राजे, म्हणजेच 'वाकाटक' हे होत. : (चिं. वि. वैद्य).

५. वाकाटक हे 'परिव्राजक' होते; हिंदू होते. : (डुब्रिइल).

६. वाकाटक हे 'ग्रीक' होते, ही समजूत चुकीची आहे. : (चिं. वि. वैद्य).

७. विष्णुपुराणाने 'कोलिकिल'-नरेशांची गणना 'यवनां' मध्ये केली आहे.
: (विष्णुपुराण) : (डॉ. रतिभानुसिंह 'नाहर').

८. '**द्विज**' म्हणून '**ब्राह्मण**' च असे नसून वाकाटकांविषयी ते '**क्षत्रिय**' ही होऊ शकतात. : (रमाशंकर त्रिपाठी).

९. केवळ ब्राह्मणांचेच / ब्राह्मणांसाठीच असणारे 'बृहस्पति-सव-यज्ञ' वाकाटकांनी केले, म्हणून ते (वाकाटक) '**ब्राह्मण**' होते. : (काशीप्रसाद जायस्वाल).

१०. विष्णुपुराण वगळतां इतर पुराणे वाकाटकांचा 'वर्ण', सांगत नाहीत. :(जायस्वाल).

११. विंध्यशक्ती-वाकाटक नृपती हा **'मूर्धाभिषिक्त'** (=राज्याभिषेकझालेला) होता, म्हणजेच तो **'क्षत्रिय-मुख्य'** होता. : (विष्णुपुराण-टीकाकार).
१२. **'विष्णुवृद्ध'**-हा **क्षत्रिय राजा** व गोत्र हे **'क्षत्रिय' राजवंशाचे गोत्र** असून, इतर अनेक ब्राह्मण गोत्रांप्रमाणेच (काण्व, गार्ग्य, भारद्वाज, अंगिरा) ते ब्राह्मणांत प्रचलित आहे; अर्थात **क्षत्रियांचेच तेही गोत्र आहे.**
१३. वाकाटकांच्या वाशीम ताम्रपटात त्यांच्या 'वृष्णिवृद्ध' गोत्राची नोंद आहे. वा. वि. मिराशी तेथे तळटीपेत म्हणतात, ''तेही इतर ठिकाणच्या प्रमाणे 'विष्णुवृद्ध' असे वाचावे.'' पण ते तसे कां वाचावे ? याचे स्पष्टीकरण कोणा अभ्यासकाने दिल्याचे आढळत नाही.
१४. **'वाकाटक'** हे **'मूर्धाभिषिक्त'** म्हणून क्षत्रिय, तद्वत **'भारशिव'** हेही **'मूर्धाभिषिक्त'** म्हणून **'क्षत्रिय'** च होते.
१५. भारशिव, गुप्त, वाकाटक हे परस्पर-विवाह-संबंधित होते, अर्थात एकाच वर्णाचे होते. (क्षत्रिय होते).



# (२) विभाग : २ रा : उत्तरार्ध :

**: वाकाटकांची 'वर्ण-निश्चिती : नवे आकलन :**
**(१) गोत्र : 'विष्णुवृद्ध'** (की, **'वृष्णिवृद्ध'** ? वाशीम ताम्रपट) व **'ब्राह्मणत्व'** : हे एक नाही.
१. 'विष्णुवृद्ध' हा राजा 'सूर्यवंशी' होता. त्याचा पिता, 'त्रसदस्यू' हा होय; हा **'क्षत्रिय'** होता. त्याने तपस्येने 'ब्रह्मवेत्तेपण' प्राप्त करून घेतले होते; म्हणजे तो स्वत: 'ब्राह्मण' ज्ञानाने झाला, ('वंश-वर्ण-कुल-जाती' ने नव्हे!) ('ऋषितांगता: ॥') त्यावरून पुढे त्याचे वंशजांपैकी काहीजण **'ब्राह्मण'** झाले ! (म्हणे !)
- १) **''रथीतरश्च रुंदश्च 'विष्णुवृद्धा'दयो नृपा: ॥''** ॥ ९१-११७ ॥
:(वायु. पु. ९१-११४ ते १२४)
**'' क्षात्रोपेता : स्मृता ह्येतेतपसात्रऋषितांगता: ।**
**एते राजर्षय: सर्वे सिद्धिंसुमहतींगता: ॥''** ॥ ११८ ॥
:(वायु. पु. ६५- १०३ ते १०८)
- २) **''रथान्तर शौनकश्च 'विष्णुवृद्धादयो नृपा: ।''** :(ब्रह्मांड पु. ३-६६-८८) ।
-**''क्षत्रोपेता: स्मृता ह्येते तपसा ऋषितांगता: ॥''** :(प्रा.च.को.)
२. तेव्हा 'विष्णुवृद्ध' गोत्र हे मूलत: क्षत्रियांचेच होय. हें निर्विवाद सत्य स्पष्ट होते. ('गोत्रप्रवर निबंधकदंबकम्' मध्ये हे गोत्र आढळते.) तेव्हा ते गोत्र आजच्या महाराष्ट्र 'ब्राह्मणांत' आहे, म्हणून सम्राट 'वाकाटकांना' 'क्षत्रिय, न मानता 'ब्राह्मण'ठरविणे

संयुक्तिक कसे ठरते ? 'वाकाटक' हे 'क्षत्रिय' आहेत, त्यांना अशा क्लृप्तींनी 'ब्राह्मण' ठरविण्याचे 'प्रयोजना' विषयी साशंकता उत्पन्न होणे साहजिक नव्हे काय ?

३. 'वृष्णिवृद्ध' गोत्रः/ (गोत्रप्रवरनिबंध-कदंबकम्' मध्ये हे गोत्र आढळत नाही.)

– वाकाटकांच्या 'वाशीम ताम्रपटा' त तर त्यांच्या 'वृष्णिवृद्ध' गोत्राची नोंद आहे.

: (वा. नृ. काल/मिराशी पृ. ३३२, लेख/ओळ : ३ री)

–"**वत्सगुल्माद्धर्म्ममहाराजस्य 'वृष्णिवृद्ध सगोत्रस्य–**"

– वाकाटकांचे हे 'विष्णुवृद्ध' नव्हे, तर 'वृष्णिवृद्ध' गोत्र ताम्रपटात आहे. याची दखल स्वतंत्रपणे घेऊन कोणी विचार केल्याचे दिसून येत नाही. मात्र, उलट–

४. "ते नेहमीप्रमाणे 'विष्णुवृद्ध' असे वाचावे," असे डॉ.वा.वि. मिराशी तळटीपेत (पृ. ३३२) सांगतात. ते तसे कां वाचावे ? याचा खुलासा तेही करीत नाहीत, वा इतर कुणीही करीत नाहीत. हे कसे ? ('वृष्णिवृद्ध' म्हणजे वृष्णीचे वंशज असा या शब्दाचा अर्थ होतो, आणि श्रीकृष्ण हा वृष्णी वंशातला आहे.)

**५. हे गोत्र 'निर्मूल' मानावयाचे काय ?**

१) 'बृहस्पति-सव-यज्ञ' हे केवळ 'ब्राह्मणां' साठीच असून ते 'ब्राह्मणां' नीच करावयाचे आहेत, असे प्रतिपादन करणाऱ्या कुणाही अभ्यासकाने त्याचे समर्पक 'आधार' दिल्याचे मिळत नाहीत.

२) या यज्ञाशिवाय इतर यज्ञ जे वाकाटकांनी केले, त्याबद्दल काय? तेही यज्ञ 'ब्राह्मणां' साठीच व 'ब्राह्मणां' चेच होते काय ? नसल्यास त्यांविषयीच्या निर्णयांचे काय ? याविषयी कोणीही अभ्यासक खुलासा करताना दिसत नाही. उदा.'राजसूय यज्ञ', 'वाजपेय यज्ञ', 'अश्वमेध यज्ञ', हे कोणाचे ? कोणांसाठी होते ?

३) किंबहुना 'धर्म', 'राज्य', 'वर्ण', 'दंडनीती', 'सेना (दलबल)' यांप्रमाणेच अशा यज्ञ-संस्थेचे स्वामीही 'राजे' च असत. कुणी 'प्रजा' नव्हे की 'विशिष्ट वर्णीय' ही नव्हेत !

४) या उलट 'अश्वमेध' व 'राजसूय' हे यज्ञ केवळ 'क्षत्रियांनी'च करावयाचे 'यज्ञ' आहेत, व ते 'क्षत्रियांनी' च केलेले आहेत; या प्रमाणांनी सारे 'भारतीय साहित्य' साद्यंत भरलेले आहे.

– आणि हे अश्वमेध, राजसूय, वाजपेय इ. यज्ञ वाकाटकांनीही केले होते. अर्थात 'वाकाटक' हे 'क्षत्रिय' होते, हे सत्य निश्चित ठरते.

**(अ) 'अश्वमेध' व 'क्षत्रिय' राजा :** ('राजर्षि = क्षत्रिय राजा) :

**१. "अश्वमेधोऽस्त्यस्य अर्श. अच् । ॥राजर्षिभेदे॥"**

**२. "यो दूति प्रवोचत्वश्वमेधाय सूरये ।"** :(ऋ.५.२७.४).

**३. "अश्वमेधाय राजर्षये ।"** :(भाग.)

**४. "राजा सार्व्वभौमः अश्वमेधेन यजेत नाप्यसार्व्वभौमः ।।"** (इति.)

**(ब)** 'वाजपेय यज्ञ' क्षत्रियांनी केला तर, त्यांना 'सम्राट' पदवी धारण करण्याचा अधिकार

प्राप्त होत असे.                                                     : (सं. मु. ३. / मिराशी पृ. १७).

६) राजसूययज्ञकर्ता व बारा मंडलांचा स्वामी तो "सम्राट"!

**(३) क्षत्रियत्वद्योतकशब्द :**

- 'राजन्', 'महाराज', 'सम्राट' या अशा उपाधी 'क्षत्रियत्व' व 'सार्वभौमत्व' दर्शविणाऱ्या, 'चक्रवर्तित्व' सिद्ध करणाऱ्या आहेत; त्या वाकाटक नृपतींनी धारण केलेल्या होत्या; म्हणून ते 'क्षत्रिय' होते; ते अन्य कोणत्याही वर्ण-वंश-जातीचे नव्हते !                                                     :(प्रथम रुद्रसेन. देवटेक लेख).

**(४) वाकाटक-विवाह : क्षत्रियांशीच :**

- वाकाटकांचे विवाह-संबंध 'क्षत्रियां' शीच होते; क्षत्रियेतरांशी नव्हते.

१) राष्ट्रकूट (कुंतलेश-कन्या'अज्झितभट्टारिका' / नरेंद्रसेन-वाकाटक),

२) गुप्त (प्रभावतीगपुत / रुद्रसेन (२रा) - वाकाटक) ;

३) भारशिव / गुप्त,

४) कदंब / वाकाटक,

- ही परस्पर विवाहसंबंधित राजघराणी 'क्षत्रिय' होती.

५) विष्णुकुंडी / वाकाटक:

(विष्णुकुंडिवाकाटकवंशद्वयालंकृतजन्मन: ॥)

**(५) 'द्विजत्व' व 'ब्राह्मणत्व' : आणि 'वाकाटक-राजे'!**

१. अजिंठा लेणे क्र १६ मधील एका कोरीव लेखात- "**रणदानशक्तिः द्विज-प्रकाशो भुवि विंध्यशक्तिः ।**" असा उल्लेख वाकाटक राजा विंध्यशक्ती याच्याबद्दल आला आहे; म्हणून 'वाकाटक' राजे 'ब्राह्मण' होते; असे प्रतिपादन करण्यात आले आहे; त्याचाच पुरस्कार वारंवार अनेकांकडून घडत आला आहे !

२. येथे '**द्विज**' या शब्दाचा अर्थ केवळ, '**ब्राह्मण**' च असाच घेतला गेला असून तो अप्रस्तुत होय. कारण-

'**द्विज**' = १. ब्राह्मण, २ क्षत्रिय, ३. वैश्य, किंबहुना संस्कारित 'शूद्र' सुद्धा.

- कारण - "संस्कारात् द्विज उच्चते ।" (शूद्रही संस्काराधिकारी आहेत.) हे तत्त्व भारतीय साहित्यात चिरस्थायी ठरलेले आहे, ते विचारवंतांनी मानलेले आहे; पण संशोधक-इतिहासाचे अभ्यासक इकडे लक्ष देत नाहीत.

३. भारतीय राजनीतिपरंपरेत 'राजा' हा 'क्षत्रिय' च असतो. (विशुद्धजन्मन्, औरससंतती, वर्णसंकरितास 'राजपद' नाही; 'राज्याभिषेक' नाही. प्रजेची मान्यताही नाही; या सिद्धांतांची दखल घेतली गेली नाही.

४. क्षत्रियेतरास 'राजपद', 'राज्यभिषेक' होतो, यास भारतीय दंडनीतिशास्त्रग्रंथांतून आधार उपलब्ध असल्याचे कुणीही दाखवून दिलेले आढळत नाही. आणि 'वर्णसंकरतेच्या परिणामातून उद्भवणाऱ्या विकृतींविषयी समर्पक समर्थनास कुणीही धजावलेले नाही !' हे कटु-कठोर सत्य आहे !

५. 'द्विज' चा अर्थ 'चंद्र' असाही आहे.
- क्षत्रिय 'राजा' हा 'द्विज' म्हणजेच 'चंद्र' असतो.
ज्याचा 'प्रकाश' अखिल भुवनतलास आल्हादक, शीतल, सुखावह, कल्याणप्रद ठरतो; तो "**द्विज-प्रकाश !**"
६. वाकाटकांच्या सर्वच्या सर्व कोरीव लेखांत (सर्व 'ताम्रपट' 'संस्कृत' भाषेत) त्यांनी स्वत:ला ना **'ब्राह्मण'**, म्हटले आहे, ना **'द्विज'** म्हटले आहे !
७. तसेच, **'क्षत्रिय'** हा शब्दही त्यांनी स्वत:साठी वापरलेला नाही. अर्थात 'क्षत्रियां' खेरीज कुणीही 'राजा' नसे; तेव्हा प्राचीन भारतीय 'राजाने' मी 'क्षत्रिय' आहे, असे म्हणवून घेण्याचे प्रयोजन अप्रस्तुत ठरते.
८. 'राजा' ने आपले 'क्षत्रियत्व' 'अलंकारिक भाषेत व 'अलंकारिक' रीतीने व्यक्त करणेच संयुक्तिक होय.
९. अजिंठा लेणी क्र. १६ मधील शिलालेखातील ज्या 'द्विज' - शब्दाचा आधार, 'वाकाटकां' ना 'ब्राह्मण' ठरविण्यासाठी देण्यात येतो, तो शिलालेख वाकाटकांचा स्वत:चा नाही. तो आहे त्यांच्या 'वराहदेव' नामक 'अमात्या' ने कोरविलेला. 'राजाश्रित', कुणी 'अधिकारी'/'अमात्य' हा आपल्या 'धन्याचा वर्ण' एका सार्वभौम, सम्राट, चक्रवर्ती राजवंशीयांचा 'वर्ण' कोणता आहे, याचे जाहीर प्रदर्शन उच्चारण/निवेदन व शिलांकन करण्याचे धाडस कसा दाखवू शकतो? ही निदान भारतीय संस्कृती नाही. भारतीय संस्कृतीच्या विचारवंत धुरीणांकडून तरी याचा विवेकाधिष्ठित विचार होणे आवश्यक आहे. जे राजे आपापल्या अनेकानेक 'संस्कृत-ताम्रपटांतून' 'आपला वर्ण' शब्दांकित करीत नाहीत, त्यांचा एक सेवक/अमात्य मात्र तो आपल्या स्वामींचा 'वर्ण' 'अमुक होता' हे या सेवकाने सांगण्यात प्रयोजन कोणते?
एक तर हा 'द्विज' शब्द, १) ब्राह्मण, २) क्षत्रिय, ३) वैश्य असे कोणतेही अनिश्चित वर्ण सूचित करतो; तरीही तेव्हा तो राजवंशवर्णाने 'ब्राह्मण' च हे कसे निर्णित होऊ शकते?
-म्हणूनच हा 'द्विज' शब्द 'विशिष्ट वर्णवाचक' न मानता त्याला काही 'वेगळा संदर्भ' आहे, याचे भान बाळगणे आवश्यक ठरते.
हा विचार पायाभूत मानतांच हा संभ्रम दूर होतो; आणि 'द्विज' चा अर्थ 'चंद्र' असा स्वीकारताच स्वच्छ 'प्रकाश' पडतो; आणि "राजा" हा "चंद्र-प्रकाशा" जसा सर्व भुवनतलावर प्रकाशत राहतो यात त्याच्या राजनीतीचे व कार्यकर्तृत्वाचे, स्वभावगुणांचे दर्शन सुस्पष्ट होते. क्षत्रिय राजा 'चंद्रांश'जन्मा असून तो चंद्रधर्माचे पालन करीत असतो.
१०. 'द्विज' चा अर्थ 'ब्राह्मण', 'क्षत्रिय','वैश्य' किंवा 'शूद्र' असा कोणताही एक स्वीकारू गेल्यास त्या व्यक्ती व वर्णविशिष्टाचा 'प्रकाश' साऱ्या 'भुवनात', 'भुवनतलावर' व्याप्त होणारा असू शकणे संभवनीय ठरते काय ? तर पूर्णत:च असंभव !

याचाही वास्तव विचार होणे महत्त्वाचे आहे. त्यासाठी 'चंद्र (द्विज) - प्रकाश' हाच सर्वार्थांनी, व सर्वपरींनी समर्पक ठरतो, हे ध्यानी घेण्यास कोणासही, कोणतीही अडचण उरू नये.

(६) चंद्र (द्विज) -प्रकाश :

"शिलातलं प्राप्य यथा मृगेंद्रो ।
महारणं प्राप्य यथा गजेंद्रः ॥
राज्यं समासाद्य यथा नरेंद्रः ।
तथा 'प्रकाशो' विरराज 'चंद्रः' ॥" :(वा.रा.५.५.७)

=(मध्यनभांगणींचा 'चंद्र' पाहून मारुती म्हणतो -
- शिलातलावर प्राप्त झालेला सिंह, मोठ्या रणांगणावर येऊन ठेपलेला गजश्रेष्ठ आणि राज्यप्राप्ती झालेला 'नरपती' (नृपती, राजा, क्षत्रिय) हे जसे शोभतात, त्याप्रमाणे, ह्यावेळी, "प्रकाशमान झालेला 'चंद्र' शोभत होता.!")

(७) 'राजा' जसा की 'वृष' तथा 'इंद्र'च ! :

१. "'वृषेव' देवा देवानां, राज्ञां राजा बभूव सः !" : (रघुवंश. १७-७७).
= ("तो राजा, 'इंद्र' (='वृष') जसा, 'देवांचा देव' झाला; तसा 'राजांचा राजा' झाला.").

२. "वृषा वै राजन्यः!" :(तां.ब्रा. ६. १०.९),

३. "ऐंद्रो वै राजन्यः!" :(तै.ब्रा. ३.८.२३.२) ।

(८) वाकाटक हे 'सम्राट' होते. (म्हणजेच 'क्षत्रिय' होते.)

१. "येनेष्टं 'राजसूयेन' मंडजलस्येश्वरश्च यः ।
शास्ति यश्चाज्ञया राज्ञः स सम्राट ॥" :(AK. R. 2.5).

(९) 'क्षत्रं राजन्यः।'

१. "क्षत्रं राजन्यः ।" :(ऐ.ब्रा. ८.६), ।

२. "ओजः क्षत्रं वीर्यं राजन्यः ।" :(ऐ.ब्रा.८.२.३, ४),

३. "शतस्य वा एतद् रूपं यद् राजन्यः ।" :(श.ब्रा. १३.१.५.३.),

४. "शुद्धं वै राजन्यस्य वीर्यम् ।" :(श.ब्रा. १३.१.५.६.).

(१०) 'राजा' म्हणजे कोण? (क्षत्रियच) :(अमरकोश : ८ क्षत्रियवर्ग : १ ते ७) पांच क्षत्रिय -

१) - "मूर्धाभिषिक्तो राजन्यो बाहुजः क्षत्रियो विराट् ।"

(११) वाकाटक राजा "युधिष्ठिर-वृत्ति" होता. (म्हणजे काय?)
: (म.भा. उद्यो. १४९३२, ३३) :

१) 'युधिष्ठिर' :
= १. (कौरव) कुलभर्ता, भरणपोषणकर्ता, स्वामी.
२. राज्यप्रशासक,

३. महानुभाव; (महान-प्रभावक: ।)
४. सत्यप्रतिज्ञ (सत्यसंघ: ।)
५. प्रमादरहित (अप्रमत्त: ।)
६. शास्त्राज्ञानुकारी, (शास्त्रे स्थित: । )
८. प्रजाप्रिय
९. सुहृदानुकंपी (कृपादयी)
१०. जितेंद्रिय
११. सज्जनपालनपोषणकर्ता : (साधुजनभर्ता ।)

२) **"युधिष्ठिरे राजगुणा: समस्ता: !"**

**–"क्षमा तितिक्षा दम आर्जवं च । सत्यव्रतत्वं श्रुतमप्रमाद: ।**
**भूतानुकंपा ह्यनुशासनं च । "युधिष्ठिरे' राजगुणा: समस्ता: ॥"**

: (म. भा. उद्यो. १४९-३४)

= ("क्षमा, सहनशीलता, इंद्रियदमन, सरलता, सत्यपरायणता, शास्त्रज्ञान, प्रमादशून्यता, समस्त प्राण्यांवर दयाभाव, गुरुजनांच्या आज्ञेत राहणे, असे समस्त "राजोचित" गुण "युधिष्ठिरा" मध्ये विद्यमान होते.")

३) 'युधिष्ठिर:' (=Firm in battle : युद्धात स्थिर ! धैर्यधुरंधर = युद्धधुरंधर !):
(धर्मयुग = 'कृतयुग' - कार्तयुग)।
१. धर्म (युधिष्ठिर) = 'युधिष्ठिर' ।
२. धर्मेंद्र = 'युधिष्ठिर' ।
३. धर्मात्मज = 'युधिष्ठिर' ।
४. धर्मज: = 'युधिष्ठिर' ।
[ duly or Lawfully born; = "a Ligitimate son."
(मनु. ९.१०७) ]
५. धर्मजन्मन्/धर्मजन्मा ='युधिष्ठिर' ।
६. धर्मनंदन:। = 'युधिष्ठिर'।
७. धर्मपुत्र: । = 'युधिष्ठिर' ।
८. धर्मराज = 'युधिष्ठिर' । 'राजा.'
१०. अजातशत्रू = 'युधिष्ठिर'.

४) **वाकाटक-नृपती** हा 'युधिष्ठिर-वृत्ति' होता, म्हणजेच तो युधिष्ठिराच्या वंशसंबंधित, चंद्रवंशीय क्षत्रिय होता.
=वाकाटक-नृपती "क्षत्रिय-वृत्ती" चा, वंश-वर्णाचा होता.असे मानण्यास हरकत नसावी.

**(१२) 'वृत्ति' :**
१. = (म्हणजे जीवन जगण्याची रीति; तसेच

= १) जीवनयात्रा,
२) अस्तित्व, स्थिती,
२. "वृत्ति" : (मातृ / पितृ-वृत्ति) ।
-"त्रिष्व प्रमाद्यन्नेतेषु त्रींल्लोकांश्च विजेष्यसि ।
पितृवृत्त्या त्विमं लोकं मातृवृत्त्या तथा परम् ॥" : (म.भा. १२.१०८.८).
३. "वर्षशतमभिवर्द्धमान कोश-दंड-साधन-संतान- पुत्र पौत्रिणः युधिष्ठिर-वृत्तेर्व्वाकाटकानाम् ॥"
=यात वाकाटकांची 'युधिष्ठिरवृत्ति' ही कोश दंड साधन संतान पुत्र-पौत्रांनुसारी, शतकांनुगामी व अखंडपणे अभिवर्धमान असल्याचे स्पष्टपणें निर्दिष्ट आहे. हे वाकाटकांच्या 'क्षत्रियवंशवर्ण'-निश्चितीस ठामपणे पुष्टिप्रद ठरणारे आहे.
: (प्रवरसेन- २ रा : जांब-ताम्रपट : मिराशी पृ. १९९)

**(१३) "कार्तयुग" ची स्पष्टता :**

१) कृतयुगात राजे मुळीच नव्हते; तेव्हा "शंभो-प्रसाद धृति-कार्तयुगस्य" (वाकाटक-लेख) या संदर्भात वाकाटक राजाने 'कार्तयुग' निर्माण केले असा अर्थ नसून 'कृतवीर्य', 'कृतवर्मा', 'कार्तवीर्य' सहस्त्रार्जुन या चंद्रवंशीय राजांशी वाकाटक हे वांशिक दृष्ट्या संबंधित होते ; हा स्पष्टार्थ आहे. 'कृत' चे अपत्य ते 'कार्त'.

**(१४)'वाकाटक'-शब्द व्युत्पत्ती व अर्थ : निष्कर्ष :**

१) वाक् + अट्ट/अट्टन = वाकट्ट । वाकट । वाकटक ।
'अट्ट' संबंधित वा जनित ते 'आट्ट' ।
वाक् + आट्ट = वाकाट्ट । वाकाट । वाकाटक । म्हणून -
वाक् = १. सरस्वती, वाचा, वाणी, इडा, इरा, इला, इळा ।
२. 'वचन' = 'दंड': (= राजदंड !)
अट्ट = 'चक्राकार फलकास्त्र.'
म्हणून-
वाकाट्ट/वाकाट/वाकाटक= **'वाणीचे-सरस्वतीचे/ दंडनीतीचे चक्राकार शस्त्र'** :
: (चक्राकार फलकास्त्र) :
- 'चक्र' हे एक 'शस्त्र' आहे; त्याला तीव्र धार असते. 'चक्र' म्हणजे 'सैन्य'. अर्थात् पृथ्वीतलावरील मानवलोकींचे **'वाणी रूप शस्त्र'** ते **"वाकाटक"**! अर्थात **"क्षत्रिय !"**
म्हणून, 'वाकाटक' = क्षत्रिय !'
या प्रकारें **'वाकाटक'** या संज्ञेतच **'वाकाटक'** राजकुलाचा वंश/वर्ण, - **'क्षत्रियत्व'** सुस्पष्टपणे निर्देशित आहे.
६) 'वाक्'/'वचन' = 'दंड' : (महाभारत. शांति. अ. १२१ व १२२ ) महाभारत उपसंहार : चिं. वि. वैद्य. खंड ८, पृ. २८९, प्रका. वरदा, पुणे. आ. ३ : (१९८६)

:(संपा. प्रा. भालबा केळकर).
'दंडस्वरूप' : 'वाक्' /'वचन' : (मभा : 'राजधर्मा' वरील 'शांतिपर्व'.)
१) राजाचे मुख्य कर्तव्य 'प्रजापालन' व 'प्रजेस न्याय देणे', हे होते.
-'दुष्ट मनुष्यास शिक्षा करण्याचा अधिकार' राजास होता.
-'राजाच्या या अधिकारा'स 'दंड' ही संज्ञा मिळाली होती.
(म.भा. शां. अ. १२१ व १२२ दंड स्वरूप वर्णन 'रूपक' स्वरूपात.) युधिष्ठिरांस भीष्मांचे कथन.
(२) हा 'दंड' ('राज-दंड') प्रजापतीने, अर्थातच 'प्रजेच्या संरक्षणाकरिता' उत्पन्न केला व त्याचेच नांव-अर्थात-
'दंड' = १.'व्यवहार',
२. 'धर्म'
३. 'वाक्'
४. 'वचन'
- असे आहे.
(३)या 'दंडा' चा सदैव व योग्य रीतीने उपयोग केला असतां-
१. धर्म, २. अर्थ, व ३. काम- यांची प्रवृत्ती होते.
-हा 'दंड' समबुद्धीने व रागद्वेषरहित असा उपयोगात आणिला पाहिजे.
(४) ''लोकांमध्ये अधर्माची प्रवृत्ती होऊ नये यासाठी विष्णूच्या अंशाने राजाची विभूती अशा ब्रह्मदेवाने 'दंडनीती' हे शास्त्रही उत्पन्न केले.''
असा, महाभारतकालीन तत्त्ववेत्त्यांनी राजसत्तेच्या / व राजाच्या उत्पत्तीचा सिध्दान्त प्रतिपादिलेला आहे.
**(१५) निष्कर्ष :** ('पुराणे' ही वाकाटकांना 'यवन' म्हणत नाहीत. त्यांचा वर्ण पुराणांत नमूद नाही.)
१. वाकाटकांविषयी 'द्विज-प्रकाश' म्हटलेय. त्याचा अर्थ, वाकाटक हे ''क्षत्रिय'' होते '' असाही होतो.
: (''द्विज'' = क्षत्रिय, ब्राह्मण, वैश्य इ.)
२. ''द्विज-प्रकाश'' चा अर्थ 'चंद्र-प्रकाश' असा घेतां वाकाटक हे 'सोम' (चंद्रवंशी) क्षत्रिय ठरतात.
३. 'युधिष्ठिर-वृत्ती' - आधारे वाकाटक हे 'क्षत्रिय' च ठरतात; 'सोम' (चंद्र) वंशीय ठरतात.
४. 'कार्तयुगस्य' च्या आधारे वाकाटक हे हैहय वंशीय, 'सोम/चंद्रवंशीय' क्षत्रियच ठरतात.
५. ''विष्णुवृद्ध गोत्र'' / की ? / ''वृष्णिवृद्ध'' गोत्र - ? यांतील ही दोन्ही गोत्रे

मूलतः क्षत्रियांचीच आहेत; त्यावरूनही वाकाटक हे सोम/ चंद्रवंशी 'क्षत्रिय' ठरतात.
६. विवाहसंबंध हे वाकाटकांनी 'क्षत्रियां'शीच केलेत. ह्या वरूनही वाकाटक हे 'क्षत्रिय' च ठरतात. त्यांनी वर्णसंकर स्वत:च होऊ दिला असता, तर त्यांना प्रजेने 'सम्राटपदा' पर्यंत पोहोचू दिलेच नसते.
७. क्षत्रियांखेरीज 'राजा' होण्याचा, 'मूर्धाभिषिक्त' होण्याचा अधिकार भारतीय दंडनीती इतर कुणासही देत नाही; तेव्हा मूर्धाभिषिक्त व सम्राट वाकाटक हेही 'क्षत्रिय' च होते.
८. 'अश्वमेध' / 'राजसूय' हे यज्ञ 'क्षत्रियां' चे आहेत. हे यज्ञ करणारे वाकाटक राजे 'क्षत्रिय' होते, हे यावरून सिद्ध होते.
९. 'विष्णुपुराण' हे 'किलकिलां' ना 'मूर्धाभिषिक्त'' (='क्षत्रिय') म्हणते. अर्थात वाकाटक हे 'क्षत्रिय' च होते.
१०. ''वाकाटक''या संज्ञेचा अर्थच ''क्षत्रिय'' ('वाक्' देवतेचे चक्राकारफलकास्त्र) आहे.
११. वाकाटक-नृपतींची नांवे 'सेन'/'षेण', 'शक्ति' याप्रमाणे 'क्षत्रियत्व द्योतक' नामान्त पदयुक्त आहेत. त्यांपैकी एकही नांव 'शर्मन'/'शर्मा' - (ब्राह्मणत्व-सूचक/ मनु. प्रणीत) नामान्त नाही. यातही वाकाटकांचे 'क्षत्रियत्व' स्वयंसिद्ध आहे.
१२. 'भारशिव' राजे 'मूर्द्धाभिषिक्त' (=क्षत्रिय) होते.
:(जांब-ताम्रपट/वाकाटक).
- 'भारशिव' राजे 'मूर्द्धाभिषिक्त' (=क्षत्रिय) होते; :(मिराशी/पृ.१९९) ते वाकाटकांशी विवाह- संबंधित होते; आणि 'वाकाटक' (किलकिला-राजे/विष्णु पुराण, ४.२४-१६) हेही 'मूर्धाभिषिक्त (:क्षत्रिय) होते.
'भारशिव' हे 'नागकुलीन' म्हणजेच 'क्षत्रिय' होते.
('नग' = सूर्य; नाग= १. सूर्यवंशोद्भव, २. चंद्र, ३. चंद्रवंशोद्भव.)
-''तेषूच्छिन्नेषु 'कैलिकिलायना' भूपतयो भविष्यन्ति 'मूर्द्धाभिषिक्त' स्तेषां 'विंध्यशक्तिः' ॥'' : (विष्णु पु. ४-२४-१६).
**१३. 'अश्वमेध'** - यज्ञ व वाकाटकांचे क्षत्रियत्व (संदर्भ : वा. नृ. त्यांचा काळ : मिराशी. पृ. २५) 'अश्वमेध' यज्ञ हा ''क्षत्रिय सार्वभौम चक्रवर्ती राजा'' ने करावयाचा असतो. हे ४ यज्ञ वाकाटकांनी केले होते, अर्थात ते ''क्षत्रियच'' होते.
**१४. 'राजसूय'-यज्ञ व वाकाटकांचे क्षत्रियत्व :**
''ज्याला 'राज्याभिषेक' (मूर्धाभिषिक्त, अवभृत) झाला आहे, अशा 'क्षत्रिया' लाच तत्पूर्वी 'राजसूय'-यज्ञ करण्याचा अधिकार असतो, 'इतरांना नाही'.

-'वाजपेय-यज्ञकर्त्यासच' 'राजसूय' यज्ञाचा अधिकार असतो.

- 'राजसूय'- यज्ञकर्ता, 'सम्राट' बनतो; 'राजांचाही राजा' बनतो.

- 'वाकाटक' नृपती या सर्व कसोट्यांना तंतोतंत उतरले होते. अर्थात ते ''क्षत्रियच'' होते. ते 'सम्राट' होते. म्हणजेच त्यांनीही हा यज्ञ केला होता.

**१५. ''वाजपेय''-यज्ञ व वाकाटकांचे 'क्षत्रियत्व' :**

- 'वाजपेय-यज्ञ' हा 'राजसूय-यज्ञा' चा प्रास्ताविक भाग आहे.

-'वाजपेय-यज्ञ' हा 'राजसूया' पेक्षा श्रेष्ठ आहे.

- या यज्ञाने यजमानाला (राजाला) 'श्वेतछत्र' धारण करण्याचा अधिकार प्राप्त होतो.

-'वाजपेय यज्ञ' हा 'आर्यपुरुष' करू शकतो. (शांखा. सू.)

-सम्राटाने करावयाच्या 'राजसूय'-यज्ञाच्या अगोदर 'वाजपेय यज्ञ' करण्याची प्रथा असे. ( वाकाटकांनीही हा यज्ञ केला होता.) अर्थात वाकाटक हे आर्य - क्षत्रिय होते.

**१६. 'बृहस्पति-सव-याग': व वाकाटकांचे 'क्षत्रियत्व':**

-'ब्रह्मवर्चस' - साधनार्थ हा 'याग' करता येतो.

- 'वाजपेय' यज्ञाचाच हा भाग आहे.

- 'वाजपेय - यज्ञ' केल्यानंतर हा 'याग' करावयाचाच असतो.

- वाकाटकांनी हे दोन्ही यज्ञ - याग केले. अर्थात ते 'क्षत्रियच' होते.

- या यागावर ब्राह्मण-वर्णाचे अबाधित सार्वभौमत्व असल्याचे ज्ञात होत नाही.

१७. पूरके :

**: पूरक (१) : वाकाटक, यज्ञ व वाकाटकांचे 'क्षत्रियत्व' :** (वा. नृ. आणि त्यांचा काल : मिराशी वा. वि. पृ. २५)

१) वाकाटकांच्या ताम्रपटांतील वर्णनांवरून असे दिसून येते की :- वाकाटक साम्राज्याचा खरा संस्थापक 'प्रथम प्रवरसेन' याने.

१. चार अश्वमेध यज्ञ, तसेच -

२. 'अग्निष्टोम', ३. आप्तोर्याम, ४. 'उक्थ्य', ५. षोडशी, ६. अतिरात्र, ७. 'वाजपेय', ८. 'बृहस्पतिसव' व ९. साद्यस्क्र हे श्रौतयाग केले होते. (पाहा : क्र. ३: द्वितीय प्रवरसेनाचा 'जांब-ताम्रपट (उपरोक्त :पृ. १९८)

- **''अग्निष्टोम-आप्तोर्याम-उक्थ्य-षोडशी-अतिरात्र-वाजपेय-बृहस्पतिसव-साद्यस्क्र-चतुरश्वमेधयाजिनः विष्णुवृद्ध-सगोत्रस्य सम्राट (=सम्राजो) वाकाटकानाम्महाराजश्रीप्रवरसेनस्य सूनो अत्यन्तस्वामिमहाभैरव भक्तस्य ॥''**

(२) हे उपरोक्त यज्ञही 'क्षत्रियांनीच' करावयाचे आहेत. हे सूर्यचंद्र-प्रकाशाइतके स्वच्छ आणि सत्य आहे. तरीही ते झाकून ठेवण्याचा आटोकाट प्रयत्न जो भारतीय इतिहास लेखन-संशोधनाच्या आंग्लविद्वानप्रणीत प्रारंभापासून सातत्याने इ. स. १९९५ पर्यंतही केला जावा यात कोणाचे आणि कसले पांडित्य मानावयाचे ? हा अट्टाहास का? लपवाछपवी का? भारतीय राजवंशांच्या क्षत्रियत्वाच्या सत्यस्वीकाराविषयी

ढिलाई- दिरंगाई-दुर्लक्ष टाळाटाळ का? ही प्रवृत्ती थांबलीच पाहिजे व भारतीय इतिहास लेखन (संशोधन-अध्ययन) यांतील विकृती समूळ निपटून काढली गेलीच पाहिजे. असा 'क्षण' फार दूर असणार नाही हे निश्चित आणि त्याला विनानिमंत्रण प्रत्येक सुज्ञाने सामोरे जाणे हे आद्य कर्तव्य मानावयास हवे. वृथा अवडंबरात्मक **प्रतिष्ठेचे** प्रयोजनच काय? आजवरच्या या प्रवृत्तींचा निषेध व विशुद्ध सत्याचा स्वीकार हा घडायलाच हवा : प्रांजळपणे !

'उक्थ्य'-'अग्निष्टोम' हे यज्ञ : क्षत्रियानेच करावयाचे ! (ते वाकाटकांनीही केले होते.)

(२) "क चैकाहा असर्वस्तोमा असर्वपृष्ठा ऐकाहिका एव तत्र होत्राः स्युस्तत्समृद्धमुक्थ्य एवायं पंचदशः स्यादित्याहुरोजो वा **इंद्रियं वीर्यं** पंचदश **ओजः क्षत्रं वीर्यं राजन्यस्तदेनमोजसा क्षत्रेण वीर्येण समर्धयति**....।"

:(ऐ. ब्रा. ८ अ. १-४).

= "**क्षत्रिय यजमानाचा** 'एकाह' क्रतू केव्हाही 'उक्थ्य' संस्थारूपच करावा; व त्यातून क्रतूंत सर्व स्तोमांच्या ठिकाणी 'पंचदश' नांवाचा स्तोमच उपयोगात आणावा, असे काही ब्रह्मवादी म्हणतात.

: कारण, पंचदशस्तोम हा 'ओज', 'इंद्रियपाटव' व 'शरीरबलरूप' आहे. तथा **'क्षत्रिय'** हा देखील **'ओज', 'क्षत्रियजातित्व' आणि 'शरीरबलसंपन्न'** असा असतो.

यासाठी पंचदशस्तोमाचा उपयोग केल्याने **'यज्ञकर्त्या क्षत्रिय'** यजमानाला **'ओज', 'क्षत्रिय जातित्व'** व **'शरीरबल'** यांनी समृद्ध केल्यासारखे होते.

: " क्षत्रियाने करावयाच्या 'उक्थ्य' संस्थारूप क्रतूमध्ये १५ स्तोत्रे व १५ शस्त्रे मिळून ३० संख्या पूर्ण करावी, तोच 'क्षत्रिययोग्य' यज्ञ होय."

: 'विराट छंद' - ३० अक्षरांचा आहे. तो 'अन्नप्राप्तीला साधनभूत' आहे.
: 'क्षत्रिय' - यजमानाचा 'ज्योतिष्टोम क्रतू' हा 'अग्निष्टोम संस्थच'' करावा. 'अग्निष्टोम संस्थ' अशा 'ज्योतिष्टोम' यज्ञामध्ये 'त्रिवृत्' इत्यादी चार स्तोमांचे अनुक्रमाने केलेले अनुष्ठान यज्ञकर्त्या 'क्षत्रिय' यजमानाला यज्ञसमाप्तीनंतर 'तेज', 'वीर्य', 'प्रजननसामर्थ्य' व 'प्रतिष्ठा' इ. च्या योगाने समर्थ करते. समृद्ध करते. वास्तव-

(३) १. - 'क्षत्रिय' यजमानाचा 'एकाह' क्रतू केव्हाही 'उक्थ्य' संस्थारूपच करावा व त्या क्रतूंत सर्वस्तोमांच्या ठिकाणी 'पंचदश' नांवाचा स्तोमच उपयोगात आणावा, असेही काही ब्रह्मवादी म्हणतात.

२. - कारण, पंचदशस्तोम हा 'ओज,' 'इंद्रियपाटव' व 'शरीरबलरूप' असा असतो.

३. - 'क्षत्रिय' हा देखील 'ओज', 'क्षत्रियजातित्व' आणि 'शरीरबलसंपन्न' असा असतो.

४. - यासाठी, 'पंचदशस्तोमाचा' उपयोग केल्याने यज्ञकर्त्या 'क्षत्रिय' यजमानाला 'ओज', 'क्षत्रियजातित्व' व 'शरीरबल' यांनी समृद्ध केल्यासारखे होते.

५. - 'क्षत्रिया'ने करावयाच्या 'उक्थ्य' संस्थारूप क्रतुमध्ये १५ स्तोत्रे व १५ शस्त्रे मिळून ३० संख्या पूर्ण करावी.

६. -'विराट' छंद, ३० अक्षरांचा आहे. तो अन्नप्राप्तीला साधनभूत आहे.

७. - 'उक्थ्य' क्रतु, तोच 'क्षत्रिययोग्य यज्ञ होय.'

८. 'क्षत्रिय' - यजमानाचा 'ज्योतिष्टोम' क्रतू 'अग्निष्टोम संस्थच' करावा.

:(ऐ. ब्रा. ८-१ ते ४)

९. अग्निष्टोम संस्थ अशा ज्योतिष्टोम यज्ञामध्ये'त्रिवृत्' इत्यादी चार स्तोमांचे अनुक्रमाने केलेले अनुष्ठान यज्ञकर्त्या क्षत्रिय यजमानाला यज्ञसमाप्तीनंतर तेज, वीर्य, प्रजननसामर्थ्य व प्रतिष्ठा इत्यादिकांच्या योगाने समृद्ध करते.

१०. यास्तव त्रिवृदादि स्तोमचतुष्ट्यविशिष्ट व अग्निष्टोमसंस्थ असा 'ज्योतिष्टोम' यज्ञच क्षत्रियांना प्रशस्त होय.

११. क्षत्रियाला प्रशस्त अशा या अग्निष्टोमसंस्थ ज्योतिष्टोम यज्ञाची १२ स्तोत्रें व १२ शस्त्रे मिळून २४ होतात.

संवत्सराचे पंधरवडेही २४ असतात.

: पूरक-२ : 'राजा = १ चंद्र, २. क्षत्रिय इ. (अमरकोश : १. स्वर्गवर्ग : १७).

'राजा' : १. -''राजा प्रभौनृपेचंद्रे यक्षे क्षत्रिय कक्षयोः ।''

: पूरक : ३ रे :

१. 'द्विज' म्हणजे 'चंद्र' / 'चंद्रमा' ! -

: चंद्राचा जन्म दोन वेळा झाला असे मानले गेले आहे; पहिला जन्मः अत्रीऋषींचा पुत्र म्हणून चंद्र जन्मला; आणि त्याच चंद्राचा दुसरा जन्मः समुद्रमंथनाचेवेळी समुद्रातून झाला, म्हणून 'चंद्र' आहे 'द्विज'/ 'द्विजन्मा' ! : (पुराणे),

: (पौ. सं.को../पिलै; पौ.को./रा.प्र. शर्मा)



परिशिष्ट : १ :

# पुळुमावि सातवाहनाचा एक सर्वोच्च महत्त्वपूर्ण नाशिक लेणी शिलालेख

१. सिद्धं[6] [ ।* ] रञो वासिठीपुतस[7] सिरिपुळुमाविस सवछरे[8] एकुनवीसे १० [ +* ] ९ गिम्हाण[1] पखे वितिये २ दिवसे तेरसे १० [+* ] ३ राजरञो गोतमीपुतस हिमव [ त ] मेरु-

२. मंदरपवतसमसारस असिकअसकमुळकसुरठकुकुरापरंत[2] अनुपविदभआकरावंतिराजस विझछवतपरिवात[3] सचहकण्ह-गिरिमचसिरिटनमलयमहिद-

३. सेटगिरिचकोरपवतपतिस सवराज [ लोक ] मडलपतिगही-तसासनस दिवसकर [ क ] रविबोधितकमलविमलदिसवदनस तिस-मुदतोयपीतवाहनस पटि [ पु ] णचदमडलससिरीक-

४. पियदसनस वरवारणविकमचारुविकमस भुजगपतिभोग-पीनवाट[4] विपुलदीघसुद[ र* ] भुजस अभयोदकदानकिलिननिभयकरस अविपनमातुसुसूसाकरस सुविभततिवगदेसकालस

५. पोरजननिविसेससमसुखदुखस खतियदपमानमदनस[5] सक-यवनपल्हवनिसूदनस धमोपजिकरविनियोगकरस कितापराधे पि सतुजने अपाणहिसारुचिस दिजावरकुटुबविवध-

६. नस खखरातवस[6] निरवसेसकरस सातवाहनकुलयसपतिथापन[7] करस सवमंडलाभिवादितच [ र* ] णस विनिवतिचातुवणसकरस अनेकसमरावजिसतुसघस अपराजितविजयपताकसतुजनदुपसधनीय-

७. पुरवरस कुलपुरिसपरपरागतविपुलराजसदस आगमान निलयस सपुरिसान असयस सिरिये अधिठानस उपचारान[8] पभवस एककुसस एकधनुधरस एकसूरस एकबम्हणस राम-

८. केसवाजुनभीमसेनतुलपरकमस[9] छणघनुसव[10] समाजकारकस नाभाग[11] नहुसजनमेजयसकरययातिरामाबरीससमतेजस अपरिमितमखयमचितमभुत-[12] पवनगरुळसिधयखरखसविजाधरभूतगधवचारण-

९. चददिवाकरनखतगहविचिणसमरसिरसि जितरिपुसघस

नामवर[13] खया गगनतलमभिगाढस कुलविपुलसिरिकरस सिरिसातकणिस मातुय महादेवीय गोतमिय बलसिरीय सचवचनदानखमाहिंसानिरताय तपदमनिय-

१०. मोपवासतपराय राजरिसिववधुसद[1] मखिलमनुविधीयमानामय कारित देयधम [ केलासपवत* ] सिखरसदिसे तिरण्हुपवतसिखरे वि [मा]-नवरनिविसेसमहिढीकलेण [।*] एत च लेण महादेवी महाराजमाता महाराज [पी]तामही ददाति निकायस भदावनीयानं भिखुसघस [।*]

११. एतस च लेण [स] चितण[2] निमित महादेवीय अयकाय सेवकामो[3] पियकामो च णता .... दखिणापथेसरो[4] पितुपतियो धमसेतुस [ददा] ति गाम तिरण्हुपवतस अपरदखिणपसे पिसाजि[5] पदकं सवजातभोगनिरठि [।*]

---

● पाठ : 6. 'सिधं', 7. वासिठिपुतस; 8. संवछरे; 1. गिम्हान, 2. पखत, 3. परिवात. 4. पीन-वट, 5. वाचा : 'दमनस' (?), 6. वंश ?/वश - ?, 7. पतिथापन, 8. उपचाराणां, 9. पराकमस, 10. छाण-यनुसव/छाण-घनुसव/छाण-धनुसव, 11. नभांग, 12.-मभूतम्, 13. नाग-वर/नग-वर.

---

●●●

: २ :

## कदंब राजकुलोत्पत्ति-दर्शक

### तालगुंड-शिला-स्तंभलेख :

(संस्कृत : इ.स. ४५५-७०). (जि. शिमोगा, कर्नाटक)

- या अभिलेखाविषयी डॉ. बी. आर. गोपाल म्हणतात :-

(कदंब-अभिलेखसंग्रह : सन. १९८५ पृ. १० ते २१) :

- "This (Kadamb-Inscription from Talgunda) is one of the most important inscriptions of Karnataka, nay, of India, that sheds light on several aspects of Karnataka histrory and culture".

- तालगुंड येथील, काकुत्स्थवर्मन कदंब याचा (शांतिवर्मन कदंब याच्या वेळचा ?) हा लेख दक्षिणापथाच्या व भारताच्याही इतिहासाच्या, संस्कृतीच्या अभ्यासाच्या दृष्टीने सर्वोच्च मोलाचा आहे. कारण तो कुंतल-देश अर्थात सिंहलदेशाच्या इतिहास व संस्कृतीच्या अनेकाअनेक पैलूंवर प्रकाश टाकतो.

[ ● संदर्भ : 1. Rice, B.L.,E.C. - 7 (सं. 176), पृ. 200 ते
2. Kielhorn, F.E,I. - 8, पृ. 31.
3. Buhler : Indian Anti. 15, p. 27 f.]

- या अभिलेखातील जरुरीपुरता भाग येथे उद्धृत केला आहे :-

●●●

● ॥ सिद्धम् ॥ नमश्शिवाय ॥

॥ जयति विश्वदेव संघात-निचितैकमूर्त्तिस्सनातनः ॥
॥ स्थानुरिन्दु-रश्मि-विच्छुरित-द्युतिमज्जटाभार-मण्डनः ॥ १ ॥
॥ तमनु भू-सुरा द्विज-प्रवरास्सामर्ग्यजुर्वेद-वादिनः ॥
॥ यत्प्रसादस्त्रायते नित्यं भुवन-त्रयं पाप्मनो भयात् ॥ २ ॥
॥ अनुपदं सुरेंद्रतुल्यवपुः काकुस्थवर्म्मा विशाल-धीः ॥
॥ भूपति कदंब-सेनानी-बृहदन्वय-व्योम-चंद्रमाः ॥ ३ ॥
॥ अथ बभूव द्विज-कुलं प्रांशु विचरद्गुणे-न्द्वंशु-मंडलम् ॥
॥ त्र्यार्षवर्त्म-हारितीपुत्रमृषिमुख्य-मानव्य-गोत्रजम् ॥ ४ ॥
॥ विविधयज्ञावभृथ-पुण्यांबु-नियताभिषेकार्द्र-मूर्द्धजम् ॥
॥ प्रवचनावगाह-निष्णातं विधिवत्समिद्धाग्नि-सोमपम् ॥ ५ ॥
॥ प्रणवपूर्व्व-षड्विधायेय-नानर्द्यमानान्तरालयम् ॥

।। अकृशचातुर्म्मास्यहोमेष्टिपशुपार्व्वणश्राद्धपौष्टिकम् ।। ६ ।।
।। अतिथि-नित्यसंश्रितावसर्थ सवनत्रयावंध्य-नैत्यकम् ।।
।। गृहसमीपदेश-संरूढ-विकसत्कर्दंबैकपादपम् ।। ७ ।।
।। तदुपचारवत्तदास्य-तरोस्सानाम्य-साधर्म्यमस्य तत् ।
।। प्रववृते सतीर्त्थ्य-विप्राणां प्राचुर्य्यतस्तद्विशेषणम् ।। ८ ।।
।। एवमागते कर्दंब-कुले श्रीमान्बभूव द्विजोत्तमः ।।
।। नामतो मयूरवर्म्मेति श्रुत-शील-शौचाद्यलंकृतः ।। ९ ।।
यः प्रयाय पल्लवेंमद्र-पुरीं गुरुणा समं वीरवर्म्मणा ।
अधिजिगांसु प्रवचनं न्निखिलं घटिकां विवेशाशु तक्कुकः ।। १०।।
(तर्क्कुकः।)

तत्र पल्लवाश्वसंस्थेन कलहेन तीव्रेण रोषितः ।
कलियुगेऽस्मिन्नहो बत क्षत्रात्परिपेलवा विप्रता यतः ।। ११ ।।
गुरुकुलानि सम्यगाराद्धच्य शाखामधीत्यापि यत्नतः ।
ब्रह्म-सिद्धिर्य्यदि नृपाधीना किमत परं दुःखमित्यतः ।। १२ ।।
पल्लवेंद्रा यस्य शक्तिमिमां लब्ध्वा प्रतापान्वयावपि ।। १९ ।।
प्राप पट्ट-बंध-संपूजां कर-पल्लवैः पल्लवैर्द्धृताम् ।। २० ।।
विबुध-संघ-मौलि-संमृष्टचरणारविंदष्षडाननः ।
यमभिषिक्तवाननुध्याय सेनापतिं मातृभिस्सह ।। २२ ।।
तस्य पुत्र कंगवर्म्मोग्र-समरोद्धुर प्रांशु-चेष्टितः ।।
प्रणत-सर्व्व-मंडलोत्क्रिष्ट-सित चामरोद्धुत-शेखरः ।। २३ ।।
तत्सुत कंदब-भूमिवधू-रुचितैकनाथो भगीरथः ।
सगर-मुख्य स्स्वयं कदंबकुल-प्रच्छन्न-जन्मा जनाधिपः ।। २४ ।।
अथ नृप-महितस्य तस्य पुत्रः ।
प्रथित-यशा रघु-पार्थिवः पृथु-श्रीः ।
पृथुरिव पृथिवीम्प्रसह्य योऽरीन् ।
अकृत पराक्रमतस्सवंश-भोज्याम् ।। २५ ।।
भ्रातास्य चारु-वपुरब्द-गभीर-नादो ।
मोक्ष त्रिवर्ग-पटुरन्वयवत्सलश्च ।।
भागीरथिर्न्नरपतिर्मृगराज-लीलः ।
काकुस्थ इत्यवनि-मंडल-घुष्ट-कीर्तिः ।। २७ ।।
ज्यायोभिस्सह विग्रहोऽर्थिषु दया सम्यक्प्रजा-पालनम् ।

दीनाभ्युद्धरणं प्रधान-वसुभिर्मुख्यद्विजाभ्यर्हणम् ॥
यस्यैतत्कुल-भूषणस्य नृपतेः प्रज्ञोत्तरं भूषणम् ।
तम्भूपा खलु मेनिरे सुर-सखं काकुस्थमत्रागतम् ॥ २८ ॥
घर्म्माक्रान्ता इव मृगगणा वृक्षराजिं प्रविश्य ।
च्छाया-सेवा-मृडित-मनसो निर्वृत्तिं प्राप्नुवन्ति ॥
तद्वज्ज्यायो-विहत-गतयो बांधवास्सानुबंधाः ।
प्रापुश्शर्म्माव्यथित-मनसो यस्य भूमिं प्रविश्य ॥ २९ ॥
नानाविध-द्रविण-सार-समुच्चयेषु ।
मत्त-द्विपेंद्र-मद-वासित-गोपुरेषु ॥
संगीत-वल्गु-निनदेषु-गृहेषु यस्य ।
लक्ष्म्यंगना धृतिमती सुचिरं च रेमे ॥ ३० ॥
गुप्तादि-पार्त्थिव-कुलांबुरुह-स्थलानि ।
स्नेहादर-प्रणय-संभ्रम-केसराणि ॥
श्रीमन्त्यनेक-नृपषट्पद-सेवितानि ।
योऽबोधयद्दुहितृ-दीधि तिभिर्नृपार्कः ॥ ३१ ॥
सयिह भगवतो भवस्यादिदेवस्य सिद्धपालये
सिद्ध-गांधर्व्व-रक्षो-गणैस्सेविते ।
विविध-निमय होम-दीक्षा-परैर्ब्राम्हणैः स्नातकैः
स्तूयमाने सदा मंत्र-वादैश्शुभैः ॥
सुकृतिभिरवनीश्वरैरात्म-निश्श्रेयसं
प्रेप्सुभि''स्सातकर्ण्यादिभि''श्श्रद्धयाभ्यर्च्चिते : (सातकर्णि).
इदमुरुसलिलोपयोगाश्रयं भूपति कारयामास
काकुत्स्थवर्म्मा ''तडाकम्म हत'' ॥ ३३ ॥ : (तळे बांधले).
तस्यौरसस्य तनयस्य विशाल-कीर्त्तेः ।
पट्ट-त्रयार्षण-विराजित-चारुमूर्त्तेः ॥
श्रीशांतिवर्म्म-नृपतेर्व्वर-शासनस्थः ।
कुब्जस्स्वकाव्यमिदमश्मतले लिलेख ॥ ३४ ॥
नमो भगवते स्थानकुंदूर-वासिने महादेवाय ।
नंदतु सर्व्वं समन्तागतोऽयमधिवासः ॥
॥ स्वस्ति प्रजाभ्य इति ॥

●●

## ●''तालगुंड'' शिला-स्तंभ-लेख : (मराठी अनुवाद)

●'' ॥ सिद्धम ॥ सत्यब्रह्म व सूर्यतत्त्व यांस वंदन !

''शिवास वंदन असो ! त्याचा जय असो !

: सर्व देवतांच्या समुदायांपासून सिद्ध झालेली अशी शिवाची ही एकमेव सनातन मूर्ती आहे; तो चिरंतन देव आहे. त्या विश्वदेवाचा जय असो !

: त्यानंतर जय असो, त्या भू-सुर, (आदित्यदेवांश क्षत्रिय नृपती वेदवेदांग) ॥ १ ॥ ऋग्वेद, सामवेद यजुर्वेद यांचे अध्ययन करणाऱ्या विद्वानांचा, की ज्यांची कृपा तिन्ही लोकांचे पापाच्या भयापासून नेहमी रक्षण करते. ॥ २ ॥

: त्यानंतर सुरेंद्र-देवासमान देह असणाऱ्या काकुत्स्थवर्मा याचा विजय असो ! तो विशाल बुद्धीचा आहे. तो राज-सेनापती कदंबांच्या विशाल (बृहद्) व महान वंशरूपी जे विशाल आकाश, त्या आकाशात प्रकाशित होणारा युगानुयुगे साक्षी चंद्रमा आहे. ॥ ३ ॥

: पूर्वी एक 'द्विज-कुल' होते. त्याच्या गुणांचा समूह प्रखर सूर्यकिरणांजसा तथा चंद्राच्या किरणांप्रमाणे पसरत असे. तो ''हारीती-पुत्र'' (सरस्वती देवीचा, सरस्वती नदीचा पुत्र) होता. तो तिन्ही वेदांनी दर्शविलेल्या मार्गाने जात असे. तो मानव्य ऋषि-गोत्रात जन्मलेला सुपुत्र होता. ॥ ४ ॥

: निरनिराळे यज्ञ समाप्त करून त्यावेळी त्याने जी पवित्र समाप्तिसूचक (अवभृथ) स्नाने केली, त्या स्नानांच्या पवित्र जलाचा नित्य अभिषेक झाल्यामुळे त्याचे केस नेहमी ओले असत. तो प्रवचनांचा किंवा उपदेशांचा अर्थ ग्रहण करण्यात हुशार होता. विधिवत होम करून, अग्नी पेटवून तो सोमपान करीत असे. [ चंद्रप्रभाप्राशन ! चंद्रदर्शन] ॥ ५ ॥

: ओंकाराचा उच्चार करून ज्यावेळी तो सहा प्रकारच्या विद्याध्ययनांची आवर्तने उच्च स्वरांत करीत असे, त्यावेळी संपूर्ण आकाश निनादित होत राही. चातुर्मास्य, होमेष्टी, पशुयज्ञ, पार्वणश्राद्ध आणि पौष्टिक यज्ञ तो करीत असे ॥ ६ ॥

: तो राजा असताना सर्व धर्मशाळांतून नेहमी त्याचे नित्यकर्म फलदायी होई. त्याच्या घराजवळच्या एका जागी एक कदंबाचा वृक्ष वाढीस लागलेला होता. ॥ ७ ॥

: त्याच्या साहचर्याने व गुणधर्म प्रभावांमुळे औपचारिकरीत्या खरोखरीच त्या वृक्षामुळे त्या राजाचे नांव व गुणधर्म हे कदंबवृक्षा जसे विकसित झाले ! ॥ ८ ॥

: त्यानंतर त्याचे जे 'वेदाध्यायी' होते, त्यांच्यामध्ये ते 'कदंब' हे विशेषण (पुष्कळ) प्रचारात आले. अशा रीतीने 'कंदब कुल' प्रचलित झाले असताना व त्या कुलात एक 'द्विजोत्तम' (वेदवेदांगविद्याविशारद,पारंगत विद्वान) जन्मला, त्याचेच नाव **'मयूरवर्मा'** असे होय. तो शील, पावित्र्य इ. गुणांनी मंडित झाला होता. ॥ ९ ॥

: तो 'वीरवर्मा' नांवाच्या आपल्या गुरूंबरोबर (पितामहांबरोबर) एकदा पल्लव राजांच्या नगरीस गेला. त्यास तेथे सर्व उपदेश जाणून घेण्याची इच्छा झाल्यामुळे तो याचक म्हणूनर एका विद्वत्सभेत आला. ॥ १० ॥

: तेथे पल्लवांच्या पागेत (अश्वशाळेत) तो गेला असतां, तेथे अश्वपालांशीं झालेल्या कडाक्याच्या भांडणामुळे तो रागावला. अरेरे ! खरेच आहे, की या कलियुगात ब्रह्मसिद्धी परब्रह्मविद्याप्राती ही क्षत्रियत्वापेक्षाही संवेदनक्षम (नाजूक-हलकी परावलंबीय उपेक्षणीय असावी ना !) ॥ ११ ॥

: गुरुकुलांची योग्य प्रकारें आराधना करून आणि प्रयत्नपूर्वक स्वतःच्या शाखेचे (म्हणजे तत्संबंधी वेद-भागांचे) अध्ययन करून देखील जर ब्रह्मसिद्धी अंतिमतः केवळ राजावर, त्याच्या अधिकारांतर्गत म्हणजे क्षत्रिय नृपतींच्याच मर्जीवर अवलंबून राहणार असेल, तर त्योपक्षा जास्त दुःख काय असणार ? ॥ १२ ॥

: ज्याचा हात कुश, समिधा, अश्मा (दगडी चमचा ?), चमचा, तूप, चरू (?) आदि ग्रहण करण्यात पटाईत होता, त्याने पृथ्वीला जिंकण्याची इच्छा बाळगून त्याच आपल्या हातांत लखलखणारे शस्त्र धारण केले. ॥ १३ ॥

: त्याने पल्लवराजांच्या सीमारक्षकांचा आपल्या पराक्रमाने युद्धात धुव्वा उडविला. त्यानंतर तो श्रीपर्वताच्या दाराशी असलेल्या एका गहन अरण्यात मुक्काम करता झाला. ॥ १४ ॥

: थोर अशा ''बाण'' इत्यादी राजांकडून त्याने खंडणी वसूल केली. पल्लवराजांच्या क्रोधाविष्टतेने भुंवया चढण्यास कारणीभूत झालेली- ॥ १५ ॥

: आपली प्रतिज्ञा शेवटास नेण्यासाठी करावयाच्या उत्थानामुळे हलकी वाटणारी आणि जी सफल झाली आहेत, अशा आपल्या कृत्यांनी, आणि जोरदार हल्ला करणे सुरू झाल्यामुळेही तो शोभिवंत दिसू लागला. ॥ १६ ॥

: त्याचे शत्रू कांचीचे राजे, जे आपल्या सैन्यासह त्याच्यावर चालून आले ॥ १७ ॥

: ते खडबडीत प्रदेशांत रात्रीच्या वेळी कधी आगेकूच करीत होते; तर कधी

ते विश्राम करीत होते; ॥ १८ ॥

: अशा परिस्थितीत हल्ला करण्यास योग्य अशा ठिकाणांवर त्यांच्या त्या शत्रूरूपी समुद्रांवर त्याने उडी घेतली. त्याने आपली संपूर्ण शक्ति पणास लावून त्यांच्यावर एखाद्या ससाण्याप्रमाणे हल्ला केला. स्वतःच्या हातांत असलेल्या तलवारीवर पूर्णतः विसंबून राहून त्याने सर्व कष्ट सहन केले. ॥ १९ ॥

: त्याची शक्ती, पराक्रम आणि वंश यांची जाणीव झाल्यामुळे पल्लवराजांनी त्याचा विनाश करण्यात काहीच फायदा नाही, असा विचार करून, त्याच्याशी मैत्री करणेच त्यांनी पसंद केले. ॥ २० ॥

: त्यानंतर मयूरवर्मन् कंदब याने त्या राजांचा आश्रय घेतला. युद्धात पराक्रम गाजवून त्याने त्या राजांना आनंदित केले. पल्लवांनी स्वतःच्या करपल्लवांनी देऊ केलेल्या राजसत्तासन्मानोचित 'पट्टबंधा'चा मान त्याने मिळविला; त्याचबरोबर त्याला एक प्रदेशही मिळाला. ॥ २१ ॥

: त्याच्या राज्यप्रदेशाच्या चहुदिशांना पश्चिम समुद्र होता. त्या सागराचे पाणी वर उठणाऱ्या (उचंबळून वर उसळ्या मारणाऱ्या ) व खाली कोसळणाऱ्या लयदार वक्र लहरीं बरोबर नृत्य करीत होते. त्याच्या सरहद्दीवर प्रेहरा नामक गांव होते. दुसऱ्या कोणीही त्यात प्रवेश करू नये, या आशेवरच ते त्याच्या स्वाधीन सत्तेखाली सुपूर्द करण्यात आले होते. ॥ २२ ॥

: षण्मुख (षडानन = कार्तिकेय) स्कंदाची चरणरूपी कमले, देवांच्या समूहांच्या (प्रणाम करतेवेळी) मुकुटांच्या नित (पूर्णतः पायांवर मस्तके झुकल्याने) सतत संपर्कामुळे व त्यांतील रत्नराशींच्या तेजोप्रभावाने सतत अधिक चमकदार झालेले असतात. ॥ २३ ॥

: त्याने निज मातांचे स्मरण करून सेनापतीसह त्याला (स्वतःस ?) राज्याभिषेक करविला होता. 'कंगवर्मन्' हा त्याचा एक पुत्र होता. त्याने तुमुल युद्धांत अनेक अद्भुत पराक्रम दाखविले होते. त्यामुळे अनेकानेक मंडलाधिपती नृपतीही त्याला विनम्र राजाभिवादन-वंदन करीत असत, त्यांनी विनम्रतापूर्वक व सन्मानदर्शक ढाळलेल्या पांढऱ्या शुभ्र चवऱ्यांनी त्याचा राजमुकुटमणी डोलायमान होत असे ॥ २४ ॥

: कदंबभूमिरूपी ललनेचा प्रियकर असा त्या राजाचा एक पुत्र होता; त्याचे नांव 'भगीरथ' होते. तो स्वतः सम्राट 'सगर' नृपतीच्या कुलातील एक प्रमुख वंशज होता, ज्याने 'राजा' म्हणून कदंबवंशात गुप्त रीतीने जन्म घेतलेला होता. ॥ २५ ॥

: त्याला जो मुलगा झाला, त्याचा आदर सर्व राजे करीत असत, त्याचे नांव 'रघु' होते. त्याची कीर्ती दूरवर पसरली होती. त्याला विशाल (विपुल) समृद्धी प्राप्त झाली होती. आपल्या पराक्रमाने शत्रूंचा पराभव करून प्रसिद्ध आद्य नपती त्या पृथुराजांप्रमाणे त्याने आपल्या वंशजांनादेखील भूमीस उपभोग्य बनविले -(वंशजांनाही या भूमीचा उपभोग घेण्याचे भाग्य प्राप्त करून दिले !) ॥ २६ ॥

: भयंकर अशा युद्धांत प्रतिस्पर्धी असणाऱ्या शत्रूंचा त्याने पूर्णपणें नायनाट केला; पण त्यावेळी त्याच्या चेहऱ्यावर मात्र शत्रूंच्या शस्त्रांचे वार (घाव, जखमांचे व्रण) पडले होते. श्रुतींसंबंधीच्या वेदविद्या आदि सर्व विषयांत तो प्रवीण होता. तसेच तो कवी, दाता, निरनिराळ्या कलांत निपुण आणि लोकप्रिय असा राजा होता. ॥ २७ ॥

: 'भगीरथा'चा मुलगा तो 'काकुत्स्थ' तो त्याचा भाऊ होता. त्याचे शरीर सुंदर होते. त्याचा आवाज मेघाप्रमाणे गंभीर होता. मोक्ष, तसेच इतर तीन (= १. धर्म, २. अर्थ, ३. काम) पुरुषार्थ संपादन करण्याच्या कार्यात तो कुशल होता. आपल्या सर्व नातेवाईकांवर त्याचे प्रेम होते. त्या राजाची चाल सिंहाप्रमाणे होती. त्याची कीर्ती सर्व भू-मंडलांत दुमदुमली होती. ॥ २८ ॥

: स्वत:पेक्षा अधिक शक्ती असलेल्यांशी युद्ध करणे, याचकांवर कृपा करणे, प्रजेचे योग्यप्रकारें (सुयोग्य रीतीने) रक्षण करणे, गोरगरिबांचा उद्धार करणे, प्रमुख द्विजांचा, भारी संपत्ती देऊन सत्कार करणे इत्यादी त्याचे गुणकर्तृत्वविशेष आणि त्याची बुद्धी ही सर्व त्या कुलभूषण राजाची भूषणे होती; अशा त्या काकुत्स्थ याला पाहून, 'जणु काही देवांचा मित्रच आला आहे,' - असे इतर राजांना वाटले. ॥ २९ ॥

: ज्याप्रकारे उन्हाने हैराण झालेले हरिणांचे कळप (किंवा पशूंचे तांडे) वृक्षांच्या राईत आश्रय घेतात, आणि वृक्षांच्या सावल्यांत बसल्यामुळें त्यांची मने शांत व टवटवीत होतात व त्यांना एक विशिष्ट प्रकारचे समाधान लाभते, त्याप्रमाणे सबलांनी ज्यांना रोखून धरले आहे; असे त्याचे नातेवाईक, इतर आप्तेष्टांसह ज्यावेळी त्याच्या भूमीत, सन्निध आश्रयास येत, त्यावेळी त्यांच्या मनांतील विषण्णता पूर्णत: नाहीशी होई व त्यांना विशेष आनंद होत असे. ॥ ३० ॥

: त्याच्या राजप्रासादांत विविध प्रकारच्या संपत्तींचे निधी-खजिने-संग्रह-साठे होते. त्या राजप्रासादांची शिखरे मदोत्कट अशा गजराजांच्या मदस्रावाने सुवासित झालेली असत. (तेथे असंख्य हत्ती झुलत असत.)

: त्याच्या राजप्रासादांत मधुर संगीताच्या लकेरी, स्वरतानलहरी ऐकू येत असत. त्या राजप्रासादांत लक्ष्मीरूपी स्त्री उत्साहाने प्रदीर्घ काळ रममाण झाली होती. ॥ ३१ ॥

: त्या 'सूर्यरूपी' राजाने आपल्या कन्यारूपी किरणांच्या द्वारें -
'गुप्त' आदि (राजकुलांचे) राजकुलरूपी कमळांचे ताटवे (कमळांची स्थळे) प्रफुल्लित केले. प्रेम, आदर, अनुराग, सन्मान (सम्मान), हे त्या कमळांचे पराग होते. त्या कमळांवर अनेक नृपरूपी भ्रमर गुंजारव करीत असत. ॥ ३२ ॥

: त्यास त्याचे दैव (भाग्य, नशीब) अनुकूल होते. त्याच्या (सर्व) कार्यात दैन्य असे कधीच दिसत नसे. त्याच्याजवळ तीन शक्ती (प्रभू, मंत्र, उत्साह) होत्या. त्याचे 'आसन्न' अत्यंत स्थिर होते. (तो आपल्या आसन गुणांवरच निर्भर, आश्वस्त, निर्भय, अवलंबून राहिला होता.) ॥ ३३ ॥

: उरलेल्या पांच गुणांनी देखील जे जिंकण्यास कठीण होते, अशा सामंतश्रेष्ठांनी त्याला नमस्कार केला.
अशा काकुत्स्थवर्मन या नृपतीने एक मोठे तळे बांधले. ते, निरनिराळ्या कामांसाठी त्याचे पाणी उपयोगात यावे, असा त्याचा हेतु होता.

: भगवान आदिदेव जो शिव, त्याच्या सिद्धमंदिराच्या परिसरात ते तळे होते. त्या मंदिरात सिद्ध, गंधर्व, राक्षस यांचे समूह राहत असत. निरनिराळे नियम, होम यांच्या दीक्षा घेण्यात गर्क असलेले वेद-विद्वान द्विज, तसेच स्नातक हे तेथे नेहमीच शुभकारक अशा मंत्रांनी त्याची स्तुती करीत असत. स्वतःला मोक्ष प्राप्ती व्हावी अशी इच्छा करणारे (सत्कार्य करणारे) पुण्यात्मे ''सातकर्णी'' आदि भूमिपाल तेथे मोठ्या श्रद्धेने पूजा-अर्चा करीत असत. अशा त्या त्याच्या औरस पुत्राची- ॥ ३४ ॥

: कीर्ती सर्वत्र पसरली आहे, असा तो 'शांतिवर्मा' हा सर्व श्रेष्ठ राजा होता. 'तीन पट्टबंध' धारण केल्यामुळे त्याचे सुंदर शरीर अधिकच तेजस्वी झाले होते. त्या राजपुत्राच्या उत्कृष्ट आदेशांचे पालन करण्यासाठी 'कुब्ज' याने हे श्लोक स्वतः पाषाणतलावर कोरले. ॥ ३५ ॥

'स्थाणुकुंदर' येथे वास करणाऱ्या भगवान श्री महादेवास नमस्कार असो ! सर्व बाजूंनी एकत्र जमलेल्या माणसांनी गजबजलेले हे पवित्र स्थळ नेहमीच आनंदपूर्ण राहो ! सर्व प्रजा-जनांचे कल्याण असो !''

: ३ :

: प्रस्तुत लेखांतर्गत -

## ● कदंब वंश-विस्तार :

● **मयूरवर्मन्** : (कदंब-बनवासी-वैजयंती : कर्नाटक)

● [ See : Ind. Ant. VI, p. 22]

कंगवर्मन

भगीरथ

रवी (किंवा) रविवर्मन शिवरथ भानुवर्मन

हरिवर्मन

## कदंब - नृपती :

[१] वैजयंती - अर्थात् बनवासी, कर्नाटक : राजकुल :

- या घराण्याच्या वंशावली संशोधक विभिन्न प्रकारें देतात :-

●१. फ्लीट : : (Fleet = I. A. VII. \)

२. पै : "कर्नाटकड अरसुमने तेनगल्लु" : पृ. १५.

३. राव, एन. एल. आणि पंचमुखी आर. एस. : (- ,, -)

४. डॉ. गोपाल बी. आर. : " (कदंब-अभिलेख संग्रह = १९८५ स.)"..

- यांपैकी : इ.स. १९८५ : ('कदंब लेखसंग्रह') : डॉ. गोपाल बी. आर. यांनी सुचविलेली वंशावळ :- (+ मोराएस ने सुचविलेली.)

(+ पै-सूचित राज्यकाल चौकटी कंसांत.)●

●शिवस्कंदवर्मा

वीरवर्मा

बंधुषेण

मयूरवर्मा.(३२५-४५ इ.स.), [१८०-२१०]●

कंगवर्मा (३४५-६५) [शिवस्कंदवर्मा]● [२१०-२५]

भगीरथ (३६५-८५) [२२५-४०]● ● (पै-सूचित)

रघू (३८५-४०५), (२४०-६५)● काकुस्थ वर्मा (४०५-३०) मांधातृवर्मा

(२६५-८२) (२८२-८७)

मूलोत्पत्तींतच कलंकित करून त्यांच्या हीनतेची परिसीमा गाठण्याच्या चढाओढींतच, काही निरलस अपवाद वगळतां, बहुतांशी संशोधकांनी आपापले जीवित-ईप्सितांची इतिकर्तव्यता मानलेली आहे. याचा प्रारंभ केला विदेशी अभ्यासकांनी असे मानले, बोलले व प्रसृत केले जाते ! त्याला साथ दिली, परंपरा पुढे चालवून आज अखेर जिवंत-वळवळती ठेवलीय आमच्याच भारतीय संशोधकांनी ! आणि त्यासाठी आधार घेतले जाणे अपरिहार्य ठरते, विदेशी संशोधकांचेच ! यालाही अपवाद काही भारतीय संशोधक निश्चितपणें आहेत, प्रमाणिकतेचे परिमाण व सत्त्यासत्त्यतेची विवेकनिष्ठ जाण सांभाळूनच ते श्रमलेले आहेत.

याबाबतीत ठोस निर्णायक भूमिका स्वीकारून, आजवरच्या भारतीय इतिहास-संशोधन-लेखनातील खेळींचे-लीलांचे दिग्दर्शन घडवून, निवडक राजवंशांचे वर्ण-वंश, त्यांच्याच ताम्रपट-शिलालेख-नाणी यांच्या पीठासनांधारें जे इतिहासात नमूद आहेत; त्यांना विस्मृत ठेवून, विकृत बनवून, त्यांचे विद्रूपीकरण जे आज प्रतिमा स्वरूप साकार दिसून येते; ते स्पष्ट करून; त्यांचे वास्तवाचे स्वयंसिद्ध दर्शन करविण्याचे कार्य, भारतीय इतिहासाच्या इतिहासात, सर्वप्रथमतः सुस्पष्टपणे श्री. रा. आ. कदम, पुणे, यांनी आरंभिलेले असल्याचे प्रत्ययास येते. श्री. रा. आ. कदम यांचा पहिला महत्त्वपूर्ण लेख प्रसिद्ध झाला आणि त्यांचा इतिहास-संशोधन-क्षेत्रात आवर्जून उल्लेख करून दखल घ्यावी लागावी इतपत दबदबा व प्रभाव सर्वत्र सातत्याने जाणवू लागला. लेखाचे शीर्षक आहे -"कदंब क्षात्र-राजकुलाच्या वंश-वर्णाविषयी ऐतिहासिक सत्याचा विपर्यास !"

अनेकानेक इतिहास संशोधक/तज्ज्ञांनी या लेखातील प्रतिपादने उमद्या मनाने व सत्यप्रियतेने स्वीकारली आहेत; काही 'संकोचून' आहेत. (!). (कै.) डॉ. वि. त्र्यं. गुणे यांनी तर श्री. कदम यांच्याशी बोलताना स्पष्ट नैतिक-भक्कम असे आश्वासन देऊन ठेवले होते की, "कदम सर, तुमच्या या लेखावर अनुकूल आलेल्या प्रतिक्रिया तुम्ही मला दाखविल्या नाहीत, तरी चालेल ! मात्र, जर चुकून कुणाची एखादी जरी प्रतिकूल/विरोधी सुराची प्रतिक्रिया आलीच, तर ती माझ्याकडे आणून द्या. मी तिचे निराकरण करणारे उत्तर देईन !" केव्हढी ही दुर्दम्य आत्मविश्वसनीयता ! अशा त्या डॉ. वि. त्र्यं. गुणे यांच्या पुण्यस्मृतीस आमचे विनम्र अभिवादन आहे. दुर्दैवाने आज ते इहलोकी नाहीत, ही भारतीय इतिहास क्षेत्रातील शोकान्तिक वास्तवता आहे. असा जिंदादिल आणि सत्यप्रेमी, अभिनिवेशविरहित, विनम्र, सालस संशोधक-अभ्यासक व इतिहासकार, गुणांचे कौतुक असणारा लेखक हजारांतून एखादाच जन्म घेत असेल का ?

डॉ. गुणे यांनी 'गोवा गॅझेटियर' खं. १ ते ३ हे इंग्रजीत संपादित करून गोवा प्रशासनाच्यावतीने प्रकाशित केले आहेत. त्यांत त्यांनी 'गोवे-कदंब-नृपती हे ब्राह्मण-वर्णाचे होते,' असेच प्रतिपादिले आहे. पण त्याच डॉ. गुणे यांनी श्री. कदम यांचेजवळ

प्रांजळ कबुली देताना आपले अंत:करण उघडे केले की, ''मी कदंबांचे मूळ ताम्रपट-शिलालेख पाहिलेच नाहीत ! इंग्रजीतील उपलब्ध ग्रंथांधारेच कदंबांचा इतिहास संपादित केला होता. पण आता या तुम्ही सादर केलेल्या अभ्यासपूर्ण प्रमाणांधारे 'कदंब राजकुल' हे संपूर्णतः व मूलतः/अंतिमतःही 'क्षत्रियच' होते, हे निर्विवाद सत्य आपण दाखवून दिले आहे; आणि ते मीही मान्य करतो ! ''

तर, अशा या लेखावर ज्यांनी आपल्या सविस्तर प्रतिक्रिया लेखी कळविल्या आहेत व 'कदंब राजकुला' चे ''क्षत्रियत्व'' ग्राह्य मानले आहे, ते विद्वद्वर पुढीलप्रमाणे आहेत :- १) डॉ. वि. त्र्यं. गुणे, २) डॉ. प्र. ग. लाळे, ३) डॉ. म. श्री. माटे. ४) डॉ. ग. वा कवीश्वर, (इंदूर), ५) डॉ. अ. रा. कुलकर्णी, (कुलगुरु : टि. म. वि. पुणे), ६) डॉ. वि. भि. कोलते (भूतपूर्व कुलगुरु : नागपूर विद्यापीठ), ७) डॉ. ना. बा. मराठे, ८) डॉ. सीता कुलकर्णी, ९) डॉ. म. प. पेठे, १०) प्रा. कृष्णराव गुरव (कोल्हापूर), ११) मा. ब. का. विप्रदास, १२) मा. ह. ना. व्यास, १३) मा. द. स. झोडगे, : (संपादक : गांवगाडा'), १४) प्रा.श्री. ग. दाढे, (डोंबिवली).

दि.२२ व २३ ऑक्टो, १९९४ रोजी कोल्हापूर येथे न्यू पॅलेस छत्रपती शहाजी राजे-नगरीत संपन्न झालेल्या ''अखिल महाराष्ट्र इतिहास परिषदेचे ३ रे वार्षिक अधिवेशनात (१. उद्‌घाटक : सन्माननीय नामदार डॉ. पतंगरावजी कदम, उच्च व तंत्र शिक्षणमंत्री महाराष्ट्र राज्य, २) स्वागताध्यक्ष : सन्मा. स. मा. गर्गे, करवीर रियासत-ग्रंथांचे संपादक; ४) परिषद अध्यक्ष : डॉ. जयसिंगराव पवार; श्री. रा. आ. कदम यांनी आपले उपरोक्त शोधनिबंध सादर केले. 'सातवाहनांच्या वर्णा' विषयी तर आमच्या इतिहास संशोधक-अभ्यासकांनी आपापली अभिरुचिसंपन्न विवेकाची झूलही फेकून देऊन असंबद्ध सिद्धात प्रस्थापित करण्याचे आटोकाट व विपुल संख्येने, सातत्यपूर्णतेने प्रयत्न केलेले आहेत. श्री. कदम यांच्या या निबंधांना वरील अधिवेशनातही फार उत्तम, अनुकूल व सत्याग्रही प्रतिसाद मिळाला; यातच या लेखांचे स्वयंसिद्ध महत्त्व अंतर्निहित आहे. या वेळी काही तज्ज्ञांनीही प्रांजळपणे परंपरागत संकल्पनांच्या संदर्भात विचारलेल्या स्पष्टीकरणांना श्री. कदम यांनी समर्पक व नेमकी उत्तरे दिल्याने ज्ञात्या श्रोत्यांतही प्रभावी समाधान दिसून आले. या वाचनाचे वेळी सन्मानीय छत्रपती शाहू महाराज कोल्हापूर, मा.स.मा. गर्गे, मा. डॉ. जयसिंगराव पवार (अ.म.इ. परिषदेचे ३ रे अधिवेशन-अध्यक्ष व महाराष्ट्र इतिहास प्रबोधिनीचे संस्थापक, अध्यक्ष तथा अनेक मौलिक ऐतिहासिक ग्रंथांचे सिद्धहस्त, समर्थ सव्यसाची ग्रंथकार) प्रत्यक्ष स्वतः उपस्थित होते. एव्हढेच नव्हे तर, निबंध वाचनानंतरच्या समारोपात, प्रश्नोत्तरांत, चर्चेत त्यांनी प्रत्यक्ष स्वतः स्पष्टीकरणे देऊन सहभागही घेतला. मा.स.मा. गर्गे यांनी 'मातृगोत्र,' 'मातृगोत्रनाम' संदर्भात स्वतःच पौराणिक उदाहरणे स्पष्टीकरणार्थ सादर केली. मा. डॉ. जयसिंगराव पवार यांनी तर,

'जर सातवाहनलेखातच "मदन" शब्द आहे, तर तेथे "मर्दन" शब्द कल्पनेने तरी अपेक्षित का धरावयाचा ?' असा प्रतिप्रश्न एका श्रोत्यांस विचारून, त्यांच्या शंकेचे परस्पर समर्थ निरसन तर केलेच; पण शिवाय श्री. कदम यांच्या निबंधातील प्रतिपादनास भक्कम नैतिक/ऐतिहासिक "बळ" (बळी/बळीप नव्हे ! ) प्राप्त करून दिले. (एका श्रोत्यांनी विचारले होते, 'खत्तियदपमान मदन' मधील "मदन" जे जागीं "मर्दन" शब्द असू शकणार नाही काय ?)

विशेष म्हणजे, 'कदंब-लेखातील प्रतिपादनांविरोधात एकही विरोधी/प्रतिकूल प्रतिक्रिया प्राप्त झालेली नाही. संभवतः (कै.) डॉ. वि. त्र्यं. गुणे यांनी स्वतः होऊन स्वीकारलेल्या उत्तरदायित्वाचा हा 'पुण्यप्रभाव' असणार हे निश्चितच होय ! डॉ. वि. त्र्यं. गुणे यांच्या पुण्यस्मृतींस पुनश्च अभिवादन !

तसेच, 'सातवाहन'- लेखासंदर्भात, उपरोक्त अधिवेशनात श्री. कदम यांचे निबंधा प्रसंगी एकही विरोधी मत प्रदर्शित करण्यात आलेले नाही !

भारतीय, विशेषतः महाराष्ट्रीय व दक्षिणीही, राजवंशांना, त्यांच्या स्वयंसिद्ध वंशपरंपराप्राप्त क्षत्रियत्वास हीन लेखून कलंकित करण्याचीच नव्हे तर ते मूलतःच नाकारण्याची प्रक्रिया, अहमहमिका, इतिहास-लेखनाच्या प्रारंभ-कालापासून ते आज पर्यंतही या भारत देशात, महाराष्ट्रात चालूच आहे; सहेतुक क्रियाशील आहे; हे सजगसुजाण वाचकांस वेगळे सांगावयास नको ! वस्तुतः या प्रवृत्तीचा सुस्पष्ट निर्देश महाराष्ट्रीय ज्ञानकोशकार डॉ. श्री. व्यं. केतकर यांनी स्वतःच्या 'प्राचीन महाराष्ट्र'- भा. १ (इ.स. १९३५; पृ. ३०८ व ३०९ ) वर नोंदवून ठेवला आहे. या प्रवृत्तीचा खंडनपर निषेध श्री. के. बी. देशमुख, (अमरावती) यांनी इ.स. १९३० मध्येच खणखणीतपणे स्वग्रंथांत केलेला आहे. तरीही धर्म-संस्कृती वा परमार्थ यांच्या 'संत/संथ' पानांआडून वंशपरंपरासिद्ध भारतीय क्षत्रियत्वाच्या मूल अस्तित्वावरच नथणीतल्या पंक्चर पिचकाऱ्या उडविण्यातील समाधान पदरी पाडून घेऊ पाहणारी हेकट प्रवृत्ती आजही पुण्यातून पोथ्यापुराणे, स्थलपुराणे-हस्तलिखिते पारायणित करून महाराष्ट्रीय नृपतींच्या-छत्रपतींच्या क्षत्रियत्वाचे अनस्तित्व सिद्ध करण्याच्या खटपटी/लटपटींच्या रमण्यातून झटापटी लढवीतच आहे. इतिहासाच्या आरंभ-कालापासूनच उभा महाराष्ट्र दक्षिणी भटक्या-विमुक्त-जमातीगर्भ अशा प्रयत्नशील निज महत्त्वाकांक्षी लालसेतून राजन्य-क्षात्र-प्रतिष्ठा-प्राप्तीसाठी क्रियाशील व इच्छाशील राहिला होता ! त्याचेच दृश्य व मूर्त स्वरूप म्हणजे आजचा 'महाराष्ट्र' ! आणि त्याचे 'क्षत्रियकुलवंत सत्त्व !, हे त्या प्रतिपादनाचे सिद्धच आहे : हेतु स्पष्ट आहेत ! ते फुलोत ! फळोत ! फळफळोतही ! तर, याला औषध ? "कालाय तस्मै नमः ।" विकृत वायसी वाचाळतेची विद्रूप विलसिते ही, वाग्देवीची चिरंतन ललामभूत गुणभूषणे ठरत नसतात ! मग, सत्याची- सत्य-इतिहासाची तर नव्हेच नव्हे ! याचे भान तरी अहं-भोक्त्यास कोठून ? कालही विपुल आहे ! पृथ्वीही विपुल आहे !

श्री. कदम यांच्या लेखांच्या किरण-दिशेने विचारवंत विचार करोत, व भारतीय इतिहासाचे उचित-सर्वंकष पुनरपि 'संशोधन' लवकरात लवकर ठामपणे, निर्णायकपणे होवो, याच प्रत्येक सच्च्या भारतीयाच्या प्रामाणिक व सामान्यशा किमान अपेक्षा आहेत.

शिवाय, परंपरेने चालत आलेल्या संशोधन-स्वांतत्र्या-भिलक्षित प्रवृत्तीनेही अंतर्मुख होऊन अधिक समंजस व उदार बनण्याचा विवेक आविष्कृत करण्याचा संयम दाखवून देणे महत्त्वाचे आहे.

अंतिमत: हेच म्हणावयाचे की, "सत्यं शिवं सुंदरम् !" तेच भारतीय इतिहास संशोधन-लेखन-क्षेत्रात अवतरो ! "सत्यमेव जयते नानृतम् !" इत्यलम् !

अशा सत्याभिलाषी व समन्वयकारी प्रयत्नांना व तळमळींस "पैलतीर" ने जे 'पीठासन' प्राप्त करून दिले ते मोलाचे व प्रत्ययकारी निश्चितच आहे. पण त्याच साथसंगतीने महाराष्ट्रातील व भारतीयही सुजाण अभ्यासकांनी अशा प्रामाणिक हेतूंना अधिष्ठित ठेवून हा सत्य-शोधनाचा स्फुल्लिंग प्रखरतम प्रकाशमान ठेवणे नितान्त गरजेचे आहे ! अस्मितेच्या दर्शनाचे ते परिचायक पर्व ठरणार आहे ! तेही ईश्वरी वरदानाहून कमी मोलाचे नक्कीच नव्हे !

●●

: ९ :

*प्रा. कृष्ण सदाशिव गुरव,*

संपादक : 'पैलतीर', कोल्हापूर.

शिलालेख ताम्रपटांचा आधार असलेले लेखन हे प्रमाणभूत मानले जाते. पण इथे सगळ्यांत 'महाभयानक' धोका हा आहे की, त्या शिलालेखांच्या चुकीच्या वाचनाने चुकीचा इतिहास लिहिणे ! भल्याभल्यांनी शिलालेखांचे अत्यंत चुकीचे वाचन करून इतिहास लिहिला; नि ते नामवंत इतिहासकार असल्याने त्यांचे लेखन प्रमाण मानूनच पुढल्या पिढीने इतिहासलेखन केले, शिकविले आणि आजही अनेकजण विभिन्न स्तरांवर लिहितात, शिकवितात. काही वेळ असा हा सारा चुकीचा पाढाच वाचला जातो, लिहिला जातो ! ते लेखन किती चुकीचे आहे हे दर्शविण्यासाठी तितक्याच ताकदीचा अभ्यास, व्यासंग, प्रचंड साक्षेप, घटनांचे, शब्दांचे 'इंटरप्रिटेशन' करण्याची कुवत हवीय. अशा साक्षेपी इतिहासकारांत श्री. रा. आ. कदम यांचे नांव घ्यावे लागेल. श्री. कदम यांनी लेखन करून प्राचीन इतिहासावर साधार नवा प्रकाश टाकला आहे. 'हा नवा प्रकाश' विद्यमान इतिहास अभ्यासकांनी मान्य केला आहे. कदंब सातवाहन व वाकाटक हे त्यांचे सप्रमाण सडेतोड लेख वाचले की, भल्याभल्यांनी जाणीवपूर्वक तर चुकीचे इतिहासलेखन केले नाही ना अशी शंका मनात चाटून जाते.

जाणत्यांनी हे सर्व लेख अवश्य पाहावेत. संभ्रम निर्माण करणाऱ्या इतिहासलेखनात-अनेक राजवंशांबाबत श्री. कदम यांनी लिहावे असे वाटते. खरे तर त्यांचे हे लेखन इंग्रजी व हिंदी भाषेतून तात्काळ प्रकाशित व्हायला हवे. कुणा इतिहासप्रेमी गुणज्ञ प्रकाशकांद्वारा हा स्वच्छ इतिहास जागतिक स्तरावरील वाचकांसमोर येवो.

'कदंब' - लेखापासून श्री. रा. आ. कदम हे एक समृद्ध व्यासंग असलेले व्यक्तित्व इतिहासज्ञांना ज्ञात होत आहे. 'कदंब क्षात्रकुलाच्या वंश-वर्णाविषयीचा त्यांचा लेख'एक वादळ' ठरले. पण त्यांचे निष्कर्ष अखिल भारतीय कीर्तीच्या इतिहास-संशोधकांनी निर्विवादपणे मान्य केले. कोणतेही ज्ञानक्षेत्र अत्यंत निकोप असते, तेव्हा ते समस्तांना आनंदपूर्ण ठरून जीवन समृद्ध करते. या दृष्टीने त्या त्या विषयांवरील निर्मळ मनाने केलेल्या लिखित-अलिखित चर्चा ज्ञानक्षेत्रात दुराग्रहाने किंवा पूर्वग्रहदूषित वृत्तीने वाढविल्या जाणाऱ्या तृणास दूर सारून ते ज्ञानक्षेत्र निकोप व निरोगी ठेवतात. या दृष्टीने श्री. रा. आ. कदम यांचा शककर्ता 'शालिवाहन' तथा सम्राट 'सातवाहन' हा लेख ही महत्त्वपूर्ण ठरतो.

●●

: १० :

*'लोकप्रभा'* : मुंबई : दि. २८.१०.१९९४

"श्री. रा. आ. कदम यांनी सातवाहनांच्या क्षात्र-वंश-वर्णाविषयी 'एक सत्यसंशोधन' या लेखात, या विषयावरील, यापूर्वीच्या ढिसाळ संशोधनाचा परखड परामर्श घेऊन; 'सातवाहनांच्याच' शिलालेखांधारे, सातवाहन हे क्षत्रियच असल्याचे सिद्ध केले आहे. त्यांच्या या अत्यंत मूलगामी संशोधनांधारे भारतीय राजवंशकुलांच्या इतिहास-चिंतनाला नवे वळण मिळाले आहे,"

●●

: ११ :

*:-डॉ. म. प. पेठे*, पुणे-३७.

***श्री. रा. आ. कदम यांचा संशोधनपूर्वक लेख, संशोधन कसे करावे याचा सुंदर वस्तुपाठच म्हटला पाहिजे.***

कदंब हे क्षत्रिय वर्णाचे होते या त्यांच्या लेखाप्रमाणेच शालिवाहन हेही क्षत्रियवर्णीच होते, असे त्यांनी सिद्ध केले आहे. विषयाची तर्कशुद्ध मांडणी, उपलब्ध पुराव्यांचा सर्वांगीण अभ्यास करून निर्विकारपणे त्यांची केलेली मांडणी, सुसंगत तर्कपद्धती हे त्यांच्या लेखणीचे गुण वाखाणण्यासारखे आहेत. माझ्या दृष्टीने संयम हा त्यांच्या लेखणीचा गुण आवर्जून उल्लेख करण्यासारखा आहे. श्री. कदम यांचे

हे दोन्हीही लेख त्यांच्या संशोधन कार्याबद्दल अपेक्षा उंचावणारे आहेत.

नव संशोधन कार्यात ही भरच घातली गेली आहे.

●●

: १२ :

***श्री. माधवराव बाबूराव शेवाळे,*** पुणे-३७.

-" श्री. रा. आ. कदम यांचा 'सातवाहन' राजवंशाच्या निर्णायक वंश, वर्ण निश्चिती बद्दलचा संशोधनपूर्ण प्रदीर्घ लेख वाचून त्यांच्या संशोधनात्मक कार्याचे कौतुक करावे तेवढे थोडेच. श्री. रा. आ. कदम यांचे मन:पूर्वक अभिनंदन."

●●

: १३ :

***मा. श्री. रा. शं. नगरकर,*** पुणे-३०.

-"आणखी एका गोष्टीसंबंधीचे मत कळविले पाहिजे असे वाटते. गेल्या दोन वर्षांपासून निरनिराळ्या राजकुलांसंबंधी श्री. रा. आ. कदम यांनी जे लेख लिहिले आहेत, त्याबद्दल त्यांचे अभिनंदन करावयाला पाहिजे. अपार अभ्यासाच्यास आधारावर त्यांनी काढलेले निष्कर्ष त्यांच्या निर्भय अभ्यासू प्रवृत्तीला साजेसे आहेत !"

●●

: १४ :

***प्रा. कृष्ण सदाशिव गुरव,***

संपादक : 'पैलतीर', कोल्हापूर. :

-" महापद्मनंद या सार्वभौम/चक्रवर्ती/सम्राटाविषयींचा श्री. रा. आ. कदम यांचा लेख, हा इतिहास संशोधक-लेखकांच्या डोळ्यांत अंजन घालणारा आहे; एक संपूर्ण नवा दृष्टिकोण प्राप्त करून देणारा आहे. 'क्षत्रिय' राजाला/सम्राटाला, 'नापित', 'वेश्यापुत्र', 'बदफैली मातेचा पुत्र', 'जारज संतती' इ. ठरविणाऱ्या हीन पातळीवर लेखणाऱ्या इतिहास-संशोधकांची बुद्धी किती 'प्रगल्भ' व 'सुसंस्कृत' (तीही भारतीय परंपरेचा वारसा सांगणारी) आहे, हे त्यांच्या लेखनाने कळून येते ! अशा मुक्तसंचारी बुद्धीतून जाणीवपूर्वक क्षात्रधर्मीयांना हीन लेखणारे निराधार विचार प्रकटणे म्हणजे ती इतिहास क्षेत्रांतील 'प्रतिभापुनीत' , 'वायसविहारी' तीर्थेच जशी आहेत ! यांचेही इतिहास 'सं-शोधन' करण्यात जाणकारांची निर्माणक्षमशक्ती वर्षांनुवर्षे किती प्रचंड मोठ्या प्रमाणात-थेट जागतिक कॅनव्हासवरही-वाया जात आली आहे याचा विचार

मनात येताच खेद वाटतो ! वाईट वाटते ! श्री. कदम यांच्या संशोधनपर लेखांमुळे भारतीय इतिहास-क्षेत्रात बड्या-बड्या दिग्गज (?) संशोधकांनीही किती अफलातून विकृती निर्माण करून ठेवल्या आहेत, हे दिसून येते आहे. हे लेखन हिंदी-इंग्रजीतही ग्रंथरूपाने यायला हवे, असे प्रत्येक सच्चा भारतीय जरूर अपेक्षील !

●●

: १५ :

***श्री. द. स. झोडगे :*** संपादक : 'गांवगाडा',

- ३/सी, योगायोग सोसायटी, बिबवेवाडी, पुणे-३७.

" महापद्म नंद " विषयक लेखात श्री.रा.आ.कदम यांनी महापद्माचे विशुद्ध क्षत्रिय कुल वंशवर्णत्व सप्रमाण सिद्ध केले आहे. भारतीय इतिहास संशोधनलेखनातील अभ्यासात, या शोधलेखातील सिद्धतेस इतरत्र तुलना नाही ! ही अतिशयोक्ती नव्हे !

धर्म-नीतिनिमय-वांशिक परंपरा पाळणारे वंश कुलीन मानण्यात येतात. तसाच वंश-शिशुनाक वंश-हा महापद्माचा आहे, हे लेखकाने उपलब्ध व संबंधित त्या सर्व-प्रत्येक पुराणांतील दाखले देऊन चांगल्या प्रकारें सिद्ध केले आहे. आपली काही पुराणे ही एक प्रकारची प्राचीन इतिहासच आहेत. तथापि आजपर्यंत लिहिला गेलेला व लिहिला जात असलेला भारतीय राजवंश कुलत्वविषयक इतिहास पुराणांशी पूर्णत: विसंगतिपूर्ण प्रकृति-प्रवृत्तीचाच प्रसृत करणारा आहे. तेव्हा विचारवंतांकडून या बाबींचा साकल्याने विचार होऊन हा विकृत केला गेलेला इतिहास पुन्हा नव्याने सत्याश्रित लिहिला गेला पाहिजे. राजवंशांच्या कुलमूलत्वाचा संशोधनपूर्ण शोध का घ्यावा लागावा याचे प्रयोजनच न उमजणारे आहे. संशोधन स्वातंत्र्य म्हणजे एकाच वंशाला शंभराहून अधिक (उदा. सातवाहन कुलमूलत्व शोधातील उपलब्ध उपपत्त्या ! ) जाती-प्रकार चिकटवू पाहणे, हे कसले स्वातंत्र्य म्हणावयाचे ? विचार व्हावा - विवेकशीलतेने !

महापद्माविषयींच्या प्रमाण-साधनांचा मूलभूत स्वतंत्रपणें अभ्यास न करताच त्यास, तो कुलहीन-जारज होता असे इतिहासकारांनी म्हटले आहे. अनेक कपोल-कल्पित विधाने करकरून महापद्माचे विशुद्ध क्षत्रियत्व-सार्वभौम चक्रवर्तित्व अकुलीनतेच्या भ्रामक दोषारोपांनी कलंकित केले आहे ! याचेही यथायोग्य परीक्षण श्री. रा. आ. कदम यांनी समर्पकपणें केले आहे. आणि ते भारतीय इतिहासाच्या लेखनशुद्धीस मौलिक वरदान ठरण्यास पूर्णत: सक्षम आहे हे नि:संशय होय ! आवश्यक आहे, आजच्या विचारवंतांची प्रामाणिक सत्यप्रिय अंतर्मुखता व क्रियाशीलता !

लेखकाने नमूद केलेल्या पुराणांनी महापद्माच्या कार्यासही पूर्णत्वाने गौरविलेच आहे. त्यांतील शब्दांचे अर्थ, अन्योन्य संबंधपूर्ण अर्थ समजून न घेतल्याने

श्री. पार्गिटरांसारख्यांनी त्यास दूषण-सम्राटपदाचा अभिषेकच वाहिला आहे. तेच अनुकरण आजअखेर चालू आहे. थांबलेले नाही. ते थांबायला नकोय काय ?

संशोधक, महापद्माविषयी काय-काय म्हणतात ते समग्रपणें लेखात एकत्र वाचावयास मिळते. ते वाचून अंगावर कांटे उभे न राहतील असा इतिहासाचा वाचक विरळाच गणावा लागेल !

जे पराक्रमी क्षत्रिय राजे होऊन गेले त्यांना ''हीन-दीन-अकुलीन-परकीय-ब्राह्मण-शूद्र-वैश्य-जैन-वन्य'' वगैरे सर्व काही आजवर ठरवून टाकण्याची चढाओढच या देशात विदेशी अभ्यासकांनी पेरून ठेवली आहे ! तिचेच भरघोस पीक आज तरारून सर्वत्र डोलते आहे ! रुचिविशेष त्या-त्या रसिकांना ते डोलवितेच आहे ! हा क्षत्रियराजकुलीनांचे ठायीं हीनकुलीनत्व शोधक इतिहास लिहिण्याची, ही इतिहास कारांची प्रवृत्ती बनली आहे; विलक्षण खोड म्हणून ती बद्धमूल होण्यात प्रयत्नरत आहे. हा आटापिटा या एकाच विषयावर तुटून पडण्याविषयीच कां ? ही भारतीय इतिहासाची शोकांतिका अद्वितीय ठरणारी आहे.

विष्णु व भागवत या पुराणांविषयींची विद्वानांची मते व द्व्यर्थी भावनिर्मितीचे त्या पुराणकारांचे कौशल्य नीट तपासून घेण्यासाठी मत्स्य, वायु, व ब्रह्मांड ही तीन पुराणे कालक्रमानेच आश्रयभूत आहेत. तेथेच आपल्या इतिहासाच्या तथ्यांचा शुद्ध कस सिद्ध होऊ शकतो हे विचारात घेऊन, व राजवंशांच्या क्षत्रियकुलत्वास पर्याय नाही हे विस्मृत होऊ न देतां या राजवंशांचे कार्यकर्तृत्व वर्ण्य व अभ्यसनीय मानण्यात यावे. उगीचच ऊठसूट त्यांच्या कुलशोधाच्या पर्याय निर्मितीचे प्रणेते ठरण्याचा हव्यास सामाजिक जडणघडणीच्या हितसंवर्धनाचा नव्हे ! जरी कुणाला तो नको त्या कारणांसाठी आत्मप्रौढीचा वाटला तरीही !

महापद्म हा क्षत्रियांच्या शत्रूंचा (हृत/हर/मथ अशांचा) विनाशक असूनही उलटे तर त्यासच, ''सर्वच्या सर्व क्षत्रियांचा विनाशकर्ता'' ठरवून त्याची तुलना एका 'भार्गवा'शी करणारे, निदान दोन शतके तरी संशोधन भारतीय इतिहास संशोधनात प्रतिष्ठा पावावे या सारखा महापद्माचा दैवदुर्विलास दुसरा कोणता ? बृहदारण्यकादि प्राचीन ग्रंथांतील ''पृथ्वीचेच शूद्रत्व'', आदित्यदेवांचे पृथ्वीच्या शूद्रत्वाशी व यच्चयावत क्षत्रिय नृपतींच्या राजकर्तव्यगर्भ शूद्रत्वाशी असणारी अटळ व चिरंतन एकात्मता आजपर्यंत कोणांसच कशी उमजली नाही ? उत्तर ज्याने-त्याने आपापल्या हृदयगर्भी शोधावे ! आणि मगच क्षत्रिय नृपतींना 'शूद्रागर्भोद्भव', 'शूद्रीगर्भसमुद्भव', 'शूद्रयोनयः', असली अर्थगर्भ तथ्ये समजून न घेतां यांतून ''वंश-वर्ण-कुल-जाती'' चा साक्षात्कार झालेला असल्याचे वावदूक थोतांड विचारवंतांनी इतिहासातून हद्दपार करणे नितान्त गरजेचे व हिताचे आहे. ''मत्स्य.-वायु.-ब्रह्मांड.'' पुराणांतील यथार्थ बोल आमचे मुखांतून बाहेर पडून राजवंश कुलेतिहासास क्षत्रियेतर पर्याय नव्हता, हेच, ''हे मत (तथ्य) लोकां कळवू द्या !'- या केशवसुतवचनानुसारी सदैव सिद्ध

असायला हवे ! याचा समग्र विचार विद्यमान कालातच होऊन भावी पिढ्यांसाठी स्वच्छ व सत्य इतिहास देण्याचे अभूतपूर्व कार्य अभ्यासकांनी पार पाडले तर भविष्यकाळ त्यांच्याविषयी ऋणी राहीलच राहील.

●●

: १६ :

*प्रा. श्रीधर गणेश दाढे,* : M.A.
(प्राचीन भारत : इतिहास-संस्कृती व पुरातत्त्व) :
(डोंबिवली (पूर्व) : जि. ठाणे.) :

श्री. रा. आ. कदम यांच्या संशोधन-लेखांमधून आमच्या प्राचीन भारतीय (ऐतिहासिक) राजवंशांच्या कुलमूलवर्णत्वाविषयींची एक सजग, ठसठशीत व निर्मळ प्रतिमा इतिहास संशोधक-अभ्यासकांच्या पुढे साकार, साक्षात्-मूर्तिमंत सुरम्य शिल्पकृती जशी उभी करण्यात आलेली आहे ! ऐतिहासिक सत्य, ही कल्पित बखर नव्हे ! भावभक्तिपूर्ण स्थलपुराण नव्हे की आविर्भावपूर्ण स्थलकाल-अनिर्बंध स्थान-दैवत-माहात्म्यही नव्हेच नव्हे ! कादंबरी नव्हे ! दंतकथा नव्हे ! इतिहास संशोधकांनी त्या-त्या कालातील सांस्कृतिक व राजकीय इतिहासाचे जिवंत चित्रण करून आपल्या महान पूर्वजांचे अभिमानास्पद दर्शन घडविले पाहिजे. त्यामुळेच समाजाला नवप्रेरणा, चैतन्य मिळून समाज एकसंध सर्वांगांनी फुलत असतो, विकसित होतो.

राजसूय, अश्वमेध हे क्षत्रिय राजांच्याच अधिकारातले यज्ञ करून, राज्याभिषिक्त होऊन "एकराट्-एकछत्र-एकक्षत्र" ही सार्वभौम सम्राट-चक्रवर्तीची बिरुदे मिरविणाऱ्या क्षत्रियकुलीन, क्षत्रियहितैषी राजालाच 'हीनकुलीन' व 'सर्व क्षत्रियविनाशकारी' सिद्ध करण्याचा विदेशी अभ्यासकांचा बुद्धिविलास भारतीय राजकुलप्रतिष्ठेस ग्रहणाजसा ग्रासून राहिला आहे. या ग्रहणाचे ग्रहण आजवर कोणाहीकडून नाकारण्याचे प्रयत्न झाल्याचे अनुभवास येऊ नये, हे खेदजनकच खरे ! मि. पार्गिटरांच्या प्रतिपादनांचा प्रतिवाद आजवर कुणी करू नये हे दुर्दैव नव्हे ?

श्री. कदम यांनी पुराण-संदर्भांचा तुलनात्मक सूक्ष्म अभ्यास करून त्यातून सर्वोचित सिद्धतापूर्ण भावलेला हिरण्य-गर्भ-सुवर्णगर्भ नवनीताशय विवेकशील अभ्यासकांपुढे विचारार्थ मांडला आहे. त्यांनी प्रारंभीच निदर्शनास आणून दिलेली महत्त्वाची दोन सत्ये दृष्टीआड करता येत नाहीत. एक; पुराणांची कालज्येष्ठता व कालकनिष्ठता ! दोन : कालकनिष्ठ पुराणांचा हेतू, विशिष्ट धर्ममताला पोषक कार्याचा अंगिकार व त्यातून द्व्यर्थी भावार्थ उत्पत्तीतील त्यांचे मायाजालपूर्ण कौशल्य व कसब ! सत्यान्वेषणशील सत्यवृत्तान्तलेखन हा या उत्तरकालीन विष्णु. व भाग. पुराणकारांचा हेतू नव्हताच ! त्यांतील शब्दरचनाजनित माहितीही बेभरंवशाची व

एकदेशीय ! असेच डॉ. रा. गो. भांडारकर, पार्गिटरही मानतात.

आश्चर्य म्हणजे, कालज्येष्ठ पुराणांतील महापद्माचे स्वत्व, चारित्र्य व कुलमूलत्व हेच विष्णु./भाग. पुराणांनी पूर्णतः गाळले आहे, ते कां ? उदा. 'कालसंवृत्तः !', 'कलिकांशजः', 'सर्वक्षत्रांतरे', तथा 'सर्वक्षत्रमथोत्साद्य', 'सर्वक्षत्रहरो', 'सर्वक्षत्र-हतो', यांतील 'हत'/'मथ'/'हर' इ. सर्व संदर्भपूर्ण शब्दपदे जी मत्स्य./वायु./ब्रम्हांड. मध्ये असूनही तीच नेमकी विष्णु./भाग. पुराणांनी वगळली; आणि 'महापद्मास' सर्व प्रकारची अप्रतिष्ठा प्रदान केल्याचे पुण्य पदरीं पाडून घेऊन ती समाजमानसीं प्रचुर पावन बनून राहिली !!

मि. पार्गिटर यांनी 'मत्स्य'./'वायु'./'ब्रह्मांड'. यांचा एकत्र (संपृक्त) अर्थ देतानाही विष्णु./भाग. चे अर्थ डोळ्यांसमोर ठेवूनच अर्थ सिद्ध करण्याचे क्षणीं उपरोक्त महत्त्वपूर्ण शब्दबंध मुख्य अर्थांत समाविष्ट न करतां, त्यांना 'पाठभेद' मानून 'तळटीपां'त त्यांची कायमची निवासव्यवस्था करून ठेवली. जनगणनेच्या वेळी पक्क्या घरांना क्रमांक मिळतात, त्यांतील निवासींची नोंद होते. धर्मशाळेत अगर ग्रामसीमाक्षेत्रीं वा माळरानांवर वा फुटपाथवर संसार थाटलेल्यांना ना क्रमांक ना गणना ! झालीच तर एकाद दुसऱ्या दिवशी रात्रीं १२ वाजता सर्वत्र सामसूम झाल्यानंतर-असलाच योग तर ! तरी असो !

'यावत्कलि' क्षत्रिय राजे होतील, महापद्मास राज्याभिषेक झाला होता, हे उल्लेख सहा पुराणांत आहेत, हे उल्लेखनीय नव्हे काय ?

'शूद्रा' अशी पृथ्वी ''वरुण-काल-चंद्र-अंश'' आदि क्षत्रिय आदित्य देवांची जन्मदात्री माता आहे, व त्या चार आदित्य देवतां-स्वरूप महापद्म नंद हा सम्राट 'एकराट्-एकक्षत्र' होता, हेच हिरण्यगर्भ रहस्य आजवर कोणीही बोलू नये हा विस्मय खेदकारकच ठरतो. तसेच 'शूद्रयोनयः' ही संकल्पनाही पार्गिटर-पठडीतल्यांच्याही पचनीं पडण्यास प्रत्यवाय राहू नयेत ! व याचा प्रत्यय प्रचलित कालातच येण्यात अडचण उरू नये.

पुराणांची प्रामाणिकता प्रशंनीय मानूनही श्री. कदम यांनी समर्थपणें दाखवून दिले आहे की, ती पारखून कशी घ्यावीत ! तसेच कालकनिष्ठ/उत्तरकालीन पुराणांनी कालज्येष्ठ पुराणांतील मूलसत्त्याचे सूत्र न डावलतां नवे वळण देण्याचा केलेला प्रयत्न संशोधकीय परीक्षणाने कितपत सत्य, कितपत फसवा व तो तसा कां भासतोय याविषयी श्री. कदम यांनी केलेले विश्लेषण अद्वितीय, अभूतपूर्व, किंबहुना अकाट्य सिद्ध झाले तर त्यात कोणासही कसलेही वैषम्य वाटण्याची संभवनीयता कल्पनीयही नाही.

जैन-बौद्ध-साधनांचा व विदेशी अभ्यासकांचा अज्ञानजन्य वा हेतुतः पक्षपात, दुष्टावा यांच्या पार्श्वभूमीवर कालज्येष्ठ पुराणांची प्रथितयश, विश्वख्यात प्रामाणिकता प्रकर्षाने प्रचीतीस येते ! उठून दिसते.

या ठिकाणी श्री. कदम यांनी सहाही पुराणांतील, महापद्मसंबद्ध श्लोक व

त्यांचे, पुराणांच्या ४४ हस्तलिखितांतील उपलब्ध पाठभेद एकत्र देऊन, त्यांचा सूक्ष्म सिद्ध अभ्यास आपणांसमोर प्रस्तुत केला आहे; ही त्यांची एका एतद्देशीयाची-अभूतपूर्व कामगिरी अत्यंत मौलिक व प्रतिष्ठेची आहे.

: द्व्यर्थी अर्थनिर्मितीने अभ्यासकांची पंचाईत करणारी पुराणेही 'सत्याचा अपलाप' करू धजली नाहीत; हेही उमगले न गेल्यानेच आजवरचे संशोधन लेखन एकांगी-एक चाकोरी-एक वळणी-एकेरी च घडत राहिले, हे ध्यानात येताच; अभ्यासकांची झालेली पंचाईत कणवेच्या दानास पात्र ठरते, विस्फुट विषण्ण खंतकारी हास्यही उमटते ! हेही खरे आहे.

श्री. कदम यांनी उलगडून दाखविलेले पुराणांतील शब्दबंधांचे अर्थ लक्षणीय आहेत. ते वाचतां वाचतां मनोमनीं उलगडत जातात तसतसे महापद्माच्या पाकळ्या व पर्णांवरीलच काय पण मूलतळींच्या पंकींचे ही किल्मिष कुठच्या कुठे विरून जाते, आणि आमच्या उदात्त पूर्वेतिहासाविषयींची उदात्तता हृदय व्यापून टाकते.

'अति बलो,' 'अतिलुब्धो', 'अतिलुब्धोऽतिबलो', 'शूद्रपायास्त्वधार्मिकः !' इ. शब्द विष्णु./भाग. मध्ये पाहून, महापद्मास हीनकुलत्व जोडण्यास दुष्टहेतु प्रेरितांना हातीं एक प्रकारचे कोलीतच मिळून राहिले !

क्षतृ+आंतरे, क्षत्र+आंतरे म्हणजे 'क्षत्रांतरे', सर्वक्षत्ररूप अंतक(कालदेवता), सर्वक्षत्रियांच्या अंतकांचा अरी, परशुराम म्हणजे जमदग्निपुत्र 'राम' नव्हे तर,-'वरुण', भार्गव म्हणजे परशुराम नव्हे, तर तोही 'वरुण' ! ही तथ्ये जेव्हा श्री. कदम आपल्या पुढे ठेवलात, तेव्हा कोणते सच्छील हृदय भारावून जाणार नाही ?

श्री. कदम यांनी विष्णु./भाग. मधील विशिष्ट शब्दबंधांतील द्व्यर्थी भाव/अर्थ तर सुस्पष्ट-सुगम-सुबोध तेही सप्रमाण सादर केले आहेतच आणि महापद्माच्या कुल-मूलत्वावरचा दुष्कलंक पार पुसून टाकला आहेच, एवढेच नव्हे तर तर जैन-बौद्ध साधनांचा दुष्टावा कोणत्या बीजांतून अंकुरला ती बीजेही पृथ्वीगर्भातून निपटून आपणांपुढे ठेवली आहेत, हे विशेष लक्षणीय मानावे लागते . त्यासाठी त्यांना छत्रिन्/छत्रीण, क्षुद्र, गणिका, भद्रा, चोरपूर्वः इ. च्या अर्थांचे विकृतिकरण पूर्वसंदर्भांसह साधार आपणांसमोर ठेवता येणें ही श्री. कदम यांची, भारतीय इतिहास संशोधन क्षेत्राला अभिनव, एकमेवाद्वितीय उपलब्धीच मानण्यावाचून गत्यंतर नाही. हे माझे वैयक्तिक, प्रांजळ व स्वानुभूत मत आहे. त्यास अन्यही कुणा एक दोन मतांचीही जरी समांतरता लाभली तरी तो या शोधसिद्धीचा यथार्थ गौरव ठरेल.

श्री. कदम यांनी समतोल, समंजस, विवेचक बुद्धीने आपल्या इतिहासपरंपरेतील विशिष्ट कल्पना, ठोस प्रमाणांद्वारा, समर्थ पोषक संदर्भांसह सुस्पष्ट केलेल्या आहेत, ती त्यांची संयमी शैली अनुभवताच भारावले न जाणे हे आपल्या अधिकारातून नकळत निसटून केव्हा स्वतंत्र झाले हे उमगतच नाही.

-'शूद्रयानयः', 'शूद्रयोनयः' मधील 'योनी' म्हणजे उत्पत्तिस्थान नव्हे ! तर

सूचन असे आहे की-शौर्यादि गुणांनी युक्त असे कर्म हा क्षत्रियांचा स्वभावसिद्ध, जन्मजात स्वधर्मच आहे, हे अभ्यासकांनी दृष्टिआड करू नये !

श्री. रा. आ. कदम हे गेली चार वर्षे तळमळीने, प्रामाणिकपणें, जीवतोड मेहनत करून-परिश्रमांची पर्वा न करतां, अर्थापत्तीची क्षितीही न बाळगतां, प्राचीन भारताच्या इतिहासाभ्यासकांच्या गंजलेल्या बुद्धीत दडून राहिलेले सुवर्णसत्य संशोधन-पूर्वक बाहेर काढणेचा अथक प्रयत्न करीत आहेत. त्यांचे शोधलेखन हिंदी-इंग्रजीतूनही प्रकाशित होणे नितान्त गरजेचे आहे; त्यातूनच भारतीय इतिहासलेखनाचा 'कायाकल्प' घडून यावयाचा आहे; घडवून आणावयाचा आहे आणि त्यासाठी भारतीय तथा जागतिक स्तरावरीलही विचारवंत इतिहास-लेखनाधिकारी खडबडून भानावर यायला पाहिजे आहेत. त्यातूनच प्राचीन भारताच उज्ज्वल इतिहास उजेडात आणण्याच्या भगीरथ प्रयत्नांना हातभार लागणार आहे. याविषयी श्री. कदम यांच्या कार्यास सर्वतोपरी सदिच्छा व हार्दिक धन्यवाद !

इतिहास संशोधकांना-अभ्यासकांना पटतील असे आवश्यक ते पुरावे श्री. कदम यांनी सादर केले आहेत. विचारवंतांनी-ज्ञात्यांनी त्यांची साधक-बाधक विचक्षणा करून आपले स्पष्ट मत जरूर नमूद करावे. त्यातूनच खरे काय, बनावट काय, कसाचे कोणते, हीणकस कोणते हे कळून येईल. भारताच्या सलग इतिहासाच्या अनुषंगाने असे होणेच इष्ट आहे, असे मला वाटते !

●●

: १७ :

*प्रा. श्रीधर गणेश दाढे.* डोम्बिवली.

M. A. (A.I.C. / बनारस)

'कदंब-राजवंशा' बद्दलच्या, श्री. रा. आ. कदम यांच्या लेखातील काही निष्कर्षांविषयी निर्देश करणे महत्त्वाचे ठरते. श्री. कदम यांच्याशी प्रत्यक्ष चर्चेतून व्यक्त होणारे जे इतर विचार जाणवले ते असे, मातृवंशपद्धती, मातृगोत्रनामे इ. गोष्टी 'कदंब' राजकुलावर (तथा अन्यराज कुलांवरही) आरोपित करून त्यांना हीणकस व कलंकित ठरविण्याचा प्रयत्न करून, तसेच-

''-'राजत्वा'मुळे अन्य वर्णीयांच्या स्त्रियांशी कदंब-नृपतींना विवाह करता येत असावेत.'' अशा प्रकारची बिनबुडाची विधानेच ठोस ''सिद्धान्त'' म्हणून घुसडून देऊन, -तसेच-

-'कदंब' हे वर्णव्यवस्थानियंता असले तरीही (!), 'मनुस्मृती' म्हणते म्हणून व तशी परवानगीच देऊन ठेवते म्हणूनही जसे काही, 'अनुलोम' (वर्णांचा उतरता क्रम) विवाहांची परिपाठी असल्याचे ध्वनित करून आजवरच्या आंग्ल पठडीतील संशोधक-अभ्यासकांनी आपल्या कल्पनांच्या विलासांची हौस भागवून घेतली आहे ! त्याचे 'प्रमाण' म्हणून 'उदाहरण' तर एकही, कुणीही देत नाही; अधिक सविस्तर चर्चाही नाही. त्यातून निर्माण होणाऱ्या राजनैतिक शतकानुगामी परंपरांशी फारकत, विचित्र सामाजिक कोंडी, त्यांच्या भविष्यकालीन समस्या, त्यातून निर्माण होणाऱ्या मनुस्मृति-प्रणीत हजारोहजारजाती-उपजाती व त्यांची सामाजिक व्यवस्थेची तर्कशुद्ध मांडणी याविषयीची समस्या यांची संशोधकांना काहीच अनुभूती वा कल्पना वा अनुबंध वा जबाबदारीच नसल्याने त्या-त्या प्रांतांत त्यांच्या संशोधनांच्या व अभ्यासकीय कक्षांतर्गत कल्पनादि विहारांना जसा की मज्जावच असावा, इतकी त्या सर्वांनीच मुग्धता राखलेली दिसून येते; आणि नेमके हेच ''भयानक असून सात्त्विकतेलाही चीड आणणारे'' आहे ! आणि याचीही पुसटीशीही दखल एकाही संशोधकाने घेतल्याचे वा तशी निदान कल्पना केल्याचेही आजपर्यंत तरी आढळलेले नाही ! विचारांवर 'अकुंश' ठेवूनच लिहावयाचे तर हेच विवेचन यापेक्षा परखड भाषेत लिहावे लागेल आणि तिथेच महानुभावांचा मर्यादाभंग, उपमर्द व्हायचादेखील ! सुज्ञांस अधिक ते समजवावयाचे कसे ? इत:पर मूलभूत व आवश्यक ती समज व जबाबदारी, अशा सर्वांसाठी अनिवार्य

ठरणेच सर्वोचित समाजहिताचे व इतिहास लेखन-प्रकाशनाच्या सं-शुद्धिकरणाचे ('शोधना'चे) सुयोग्य पीठासन होय.

क्षत्रिय राजकुलीन औरसपुत्रासच, प्रजेच्या मान्यतेअंतीं, यथाविधी राज्याभिषेका द्वारेंच सिंहासनारूढ होऊन 'राजा' ही पदवी धारण करणे शक्य होत असे.

तेव्हा या विचारांची दखल सद्यकालीन व इथून पुढच्या, इतिहासलेखकांनी घेणे नितान्त आवश्यक आहे.

इति शम् !

★★

: १८ :

***डॉ. शोभना गोखले, पुणे-३७***

M. A. Ph. D.

श्री. रा. आ. कदम यांनी 'कदंब-राजकुला'च्या मूल वंशोत्पत्तीविषयी व त्यांच्या 'वर्णा'-विषयी जी माहिती संकलित केली आहे, त्यावरून त्यांच्या सखोल अभ्यासूवृत्तीचे दर्शन होते. 'कदंब'-राजे हे 'ब्राह्मण' नसून ते 'द्विज' म्हणजे 'क्षत्रिय' होते; हे श्री. कदम यांनी सप्रमाण दाखवून दिले आहे. त्यासाठी याविषयी पूर्वसूरींचे सिद्धान्त कोणते होते हे ही त्यांनी या लेखात सांगितले आहे.

'कदंब'-कुलाची पार्श्वभूमी सांगताना त्या कुलाचे नाते 'कदंब-वृक्षा'शी जोडण्यात आले आहे, की ज्याविषयी सविस्तर कथा कदंब-नृपतींच्या ताम्रपटांत फार पूर्वीच अंकित केल्या गेल्या आहेत त्या, याविषयातील आधुनिक आंग्ल व भारतीय अभ्यासकांना आधुनिक भारतीय इतिहास लेखनाच्या प्रारंभा पासूनच तपशिलाने ज्ञात आहेत. ऐतिहासिक काळाविषयी लिहिताना तपशील अतिशय महत्त्वाचा असतो. कदंबवृक्षाशी कदंब-कुलाचे नाते तर जोडले आहेच, पण त्याच बरोबर या कुलाचे ''मूल'' काय व ''वर्ण'' कोणता यांबाबत मात्र यापूर्वी निरनिराळ्या संशोधकांनी त्या-त्या काळात उपलब्ध असलेले पुरावे सादर करून निरनिराळे सिद्धान्त मांडले, कदंब कुलातील राजा 'मयूरवर्मा'चेच 'राजा मयूरशर्मा' हे नांव 'शर्मन्'-नामान्त (चुकीच्या वाचनाने) आढळल्यामुळे तो 'ब्राह्मण' होता असे समजले जात असे. परंतु डॉ. बी. आर. गोपाल यांनी इ. स. १९८५ मध्ये 'मयूरशर्मा' हे नांव त्या 'तालगुंड'-शिलालेखामध्ये (व अन्यही सर्व कोरीव लेखांत) 'मयूरवर्मा' असे आहे; हे डॉ. रमेश व त्यांनी स्वतः त्या लेखाचे जे पुनर्वाचन व पुनर्संपादन केले त्यावरून निश्चित ठरते असे नमूद केले आहे. :(Corpus of Kadamba Inscription", - Dr. B.

R. Gopal; Sirsi, Karnataka, 1985 A. D.). आणि हा 'मयूरवर्मा' वैजयंती येथे साम्राज्य उभारतो व पुढे तो 'सम्राट' म्हणून नांवलौकिकास येतो. (इ. स. ४५५ सुमारे).

आता प्रश्न असा की, कदंबवंशीय राजे 'ब्राम्हण' होते का 'क्षत्रिय' होते ? आजवर 'मयूरवर्मा' हे नांव 'मयूरशर्मा' असेही इतिहासकारांना वाटत होते, याचे कारण मुख्यत: 'शर्मन्', या (ब्राह्मणांसाठीच्या !) उपाधीमुळे ! आणखी या बाबतीतील, ग्राह्य संशोधकांनी आजवर मानलेला पुरावा म्हणजे 'तालगुंड' येथील शिलास्तंभ लेखातीलच कदंबकुलाविषयींचे 'द्विजकुल', 'द्विजोत्तम' हे शब्द होत. ते शब्द या लेखात आले आहेत, यावरून कदंब राजवंशीय हे 'द्विजकुलीन' होते म्हणून ते 'ब्राह्मण' होते, असा अर्थ इतिहासकारांनी काढला यात वरकरणी काही वावगे नाही असे दिसते. परंतु श्री. कदम यांनी आता या लेखाद्वारें, 'द्विज' या विशेषणाने तीन वर्णांचा बोध होतो, हे स्पष्टपणें दाखविले आहे'

राजवंशीय कदंबकुलाची श्रेष्ठता दर्शविताना लेखकाने शतपथब्राह्मण, ऐतरेय ब्राह्मण, बृहदारण्यकोपनिषद, छांदोग्य उपनिषद इ. प्राचीन ग्रंथांतील, राज्यकर्त्या क्षत्रियांचे श्रेष्ठत्वही दाखवून दिले आहे; 'द्विजोत्तम कदंब कुल' या संदर्भात. आणि याविषयीं, कदंबकुलाच्या क्षत्रिय मूल-कुलोत्पत्तीविषयी उपोद्बलक पुरावा म्हणजे कदंबनृपतींनी स्वत:चे गोत्र 'मानव्य' हे सर्वत्र कोरीव लेखांत नमूद केलेले आहे. अर्थातच मानव्य गोत्र हे क्षत्रियांचे होते, याबद्दल दुमत नाही. श्री. रा. आ. कदम यांनी हा मुद्दा साधार सांगितला आहे. तसेच, कदंबकुलातील राजे स्वत:स 'हारीतीपुत्र' म्हणवितात. ते शिव-भक्त होते, विष्णु-भक्त होते, सिद्ध-भक्त होते व स्कंदभक्ताही होते. परंतु या कुलातील मयूरवर्मन् हे नांव मयूरशर्मन् असे सर्वप्रथम डॉ. बुल्हेर यांनी 'तालगुंड'- शिलालेखात वाचले, आणि पुढे तेच ग्राह्य मानले जाऊ लागले. आणि या दोन्ही उपाधी भिन्नभिन्न ठिकाणीं 'मयूरवर्मन्' राजाच्या नांवास लावण्यात आल्याचे आढळून आल्याने आजवरचे/यापूर्वीचे इतिहासकार बुचकळ्यात पडले. तो सर्व संभ्रम श्री. कदम यांनी या लेखाद्वारें दूर केला आहे. त्यामुळे, कदंब-कुल हे क्षत्रियकुलाचे होते, हे कदंब-नृपती स्वत:स हारीतीपुत्र म्हणवीत असत, आणि त्यांचे गोत्र 'मानव्य' होते; आणि मानव्य गोत्र हे क्षत्रियांचे होते, हे सर्वमान्य असून त्यास ग्रंथांचा आधारही आहे. तसेच-

मयूरवर्मन् हा कदंबकुलीन नृपती ब्रह्मसिद्धीच्या प्राप्तीसाठी गोळा केलेली

'चमस,' 'कुश' इत्यादी साधने फेकून देऊन क्षत्रियांची रणसंग्रामाची तेजस्वी आयुधे धारण करतो; अशा वर्णनामुळेही कदंब-नृपती हे प्रथम 'विप्र'-वर्णीय असून नंतर त्यांनी 'क्षात्रधर्म' स्वीकारला अशा तऱ्हेचे अनुमान पूर्वीच्या संशोधकांनी काढले. श्री. रा. आ. कदम यांनी कदंब हे सूर्यवंशी असून, ते क्षत्रिय होते, हे साधार सप्रमाण दाखविले आहे. अभिलेखीय पुरावे हे सर्वांत विश्वसनीय असतात; आणि श्री. कदम यांनी हे असे विविध अभिलेखीय पुरावे हे तपशिलाने दिले आहेत.

श्री. कदम यांनी काही मुद्दे अतिशय परखडपणें मांडले आहेत, उदा. 'शर्मन्' या नामान्ताला वर्णबाधा नाही, वर्णमर्यादा नाही ! प्राचीन भारतातील बऱ्याच सूर्य व सोमवंशीय क्षत्रिय नृपतींची नांवे शर्मान्त आढळतात.

क्षात्रधर्माचा पुरस्कार करणारे कदंब राजे मूळात ब्राह्मणवर्णाचे होते आणि नंतर त्यांनी क्षत्रियधर्माचा अवलंब केला, हे जे यापूर्वीच्या संशोधकांना वाटत आले, ती तशी वस्तुस्थिती नसून , प्रथमपासूनच ते क्षत्रियवर्णाचे होते, हे श्री. कदम सिद्ध करतात ते निश्चितच स्वागताई आहे. कदंबांचे वंशज ते आजचे कदम-मराठे होत. हे त्यांचे म्हणणे कुणालाही पटण्यासारखेच आहे.

★★

★(प्राचीन (क्षत्रिय) नृपतींनाही "वेदविद्या अध्ययन" अनिवार्य होते :-
"त्रैविद्येभ्यस्त्रयीं विद्यां दंडनीतिं च शाश्वतीम् ।
आन्वीक्षिकीं चात्मविद्यां वार्तारंभाश्च लोकतः ॥" (मनु. ७.४३)
= तीन वेद , अर्थशास्त्र, व तर्कशास्त्र त्यांतील पारंगतांकडून शिकावे. ! 'सुखदुःखेसमेकृत्वा लाभालाभौ जयाजयौ' ही वृत्ती आत्मज्ञानाने प्राप्त होते. लोक व्यवहार राजाने सामान्यांकडूनही ग्रहण करावेत.")

★★

: १९ :

### डॉ. अशोक प्रभाकर कामत, पुणे-९

M. A. Ph. D. (हिंदी), Ph. D. (मराठी).
: प्राध्यापक व प्रमुख : 'संत नामदेव अध्यासन'
: पुणे विद्यापीठ : (संतअध्ययन व संशोधनकेंद्र)

श्री. रा. आ. कदम, सानंद सप्रेम नमस्कार !

तुम्ही मोठ्या साक्षेपाने आणि परिश्रमपूर्वक कदंबक्षात्रराजकुलाच्या वंशवर्णाविषयी लिहिले आहे.

प्राचीन शिलालेखात (तेही एकाच व एकदाच) कदंबांना 'द्विज' संबोधिल्यामुळे घोटाळे झाले, वा केले गेले.

ज्याची मुंज होते तो ब्राह्मण, असे कोशकारांनी म्हणावे या बद्दल काय म्हणावे ? गुरु नानाक देवांचीही मुंज निश्चित झाली होती. पण त्यांनी ऐनवेळी मुंजीत अडसर आणला. ते भिक्षुकांना म्हणाले :-

''-यज्ञोपवीत संस्काराला विरोध नाही. फक्त मला जे धारण करायचे मनात आहे, ते जानवे तुम्ही समजावून घ्यावे.

: दयेचा कापूस पिंजावा.
: संतोषाने सूतकताई करावी.
: त्या सुताला संयमाची गांठ नि सत्त्वगुणांची पूर्णता यावी.
: असे जानवे कधी तुटणार नाही; मळणार नाही, जळणार नाही.
: असे शाश्वत जानवे घेऊन इहलोकातच काय परलोकामध्येही राहता येईल.''

:('सिक्ख गुरुचरित्र:शोध आणि बोध:' डॉ. अशोक कामत.)

-तात्पर्य, मुंज क्षत्रियांचीही होते.

एकेकाळीं लेखक-अभ्यासक-संशोधक-समीक्षक-प्रकाशक (आणि अंततः वाचकही !!) सारेच प्राधान्याने एककुलीन होते. मराठीप्रमाणे हे हिंदीतही आढळते. त्यामुळे बऱ्याच (संमती) गंमती अभिनिवेशपूर्वक झालेल्या आहेत- आताच्या शिक्षणप्रचार-व प्रसाराच्या जागृतीमुळे, पूर्वीच्या काही मंडळींनी केलेले काही घोटाळे दूर करण्याचे काम हिरीरीने करणे शक्य होते आहे. तुम्ही हे काम हातीं घेतले हे चांगलेच होय.

डॉ. ग. बा. कवीश्वर, डॉ. प्र. ग. लाळे, डॉ. वि. त्र्यं. गुणे, डॉ. म. श्री. माटे, डॉ. वि. भि. कोलते, डॉ. म. प. पेठे, डॉ. शोभना गोखले यांच्यासारख्या मान्यवरांनी तुमच्या म्हणण्याची दखल घेतली. तुमच्या संशोधनाबद्दल आस्थेने लिहिले, हे खरोखरीच अभिनंदनीय आहे.''

★★

: २० :

*डॉ. अ. रा. कुलकर्णी,* पुणे - ३०.
M. A. Ph. D.

श्री. रा. आ. कदम, यांच्या, 'कदंब क्षात्रराजकुला'च्या वर्णनिश्चितीविषयीचा निबंध मी वाचला.

प्राचीन इतिहासाचा विशेषत: त्या इतिहासासाठी ताम्रपट, शिलालेख, नाणी, भूर्जपत्रे, संस्कृत आणि इतर प्राचीन भाषेतील ग्रंथ इ. साधनांशी मी परिचित नसल्याने, ''कदंब'- राकुलाविषयी आजवर जे संशोधन झाले आहे, त्यावर आधिकारवाणीने मी बोलू - लिहू शकत नाही. तथापि श्री. कदम यांनी हा विषय जाणून घेण्यासाठी जे परिश्रम केले आहेत, प्रतिकुल परिस्थितीतही जे वाचन केले आहे, आणि आपली मते मांडली आहेत, ते निश्चितच स्वागतार्ह आहे. त्यांनी मांडलेल्या मतांचा डॉ. प्र. ग. लाळे आणि कै. डॉ. वि. त्र्यं. गुणे या जाणकारांनी योग्य तो परामर्श घेतला आहे, व त्यांनी काढलेल्या निष्कर्षाला पाठिंबाही दिला आहे.

आपला नित्याचा व्यवसाय सांभाळून या संशोधनाच्या क्षेत्रात श्री. कदमांनी केवळ जिज्ञासूवृत्तीने भाग घेतला, आणि कदम-कदंब, द्विज-क्षत्रिय अशा एकामागून एक समस्या उकलण्यात ते रंगून गेले. त्यांनी या विषयाचे ज्या पद्धतीने अध्ययन केले आहे त्याबद्दल त्यांचे कौतुक नि:संशय करावे लागेल. या विषयात विस्तृत व सर्वक्षेत्रीय तपशील संकलनाची नितान्त गरज आहे असा जो निष्कर्ष त्यांनी काढला आहे, त्याची पूर्ती त्यांनीच करावी अशी माझी त्यांना विनंती आहे.

:भूतपूर्व इतिहास विभाग प्रमुख; पुणे विद्यापीठ;
:भूतपूर्व कुलगुरू;टिळक महाराष्ट्र विद्यापीठ; पुणे.

★★

## : २१ : *डॉ. ना. वा. मराठे,* पुणे-२९.

M. A., Dip. Lib. Sc.

साहित्य विशारद, काव्यतीर्थ.

महाभारत प्रकल्प : डॉ. भां. प्रा. वि. सं. मं. पुणे-४

: 'संशोधन' हा तसा सहजसाध्य विषय नव्हे; तो कष्टसाध्य होय. पुढच्या-पुढच्या संशोधकांना पूर्वकालीन संशोधकांच्या हातीं लागलेल्या माहितींमधील 'मिथ्यात्व' दाखवून, 'तथ्य' दाखविणे हे काम करायचे असते.

: कदंब-नृपती हा 'क्षत्रिय-पुंगव' आहे, हे श्री. रा. आ. कदम यांनी 'कदंबां'च्याच ताम्रपटांतून निदर्शनास आणून देऊन, तसेच आणखी, कदंबांचे क्षत्रियत्व सिद्ध करणारी २० प्रमाणे (काही कदंब-ताम्रपटांतील उतारे उद्धृत करून) देऊन सिद्ध केले असल्याने, (पूर्वकालीन इतिहासकारांनी गृहीत धरलेली) इतर सारी 'प्रमाणे' 'गतार्थ' ठरतात. इतःपर कुणी त्यांचा पुनःपुन्हा उद्धार करण्यात फारसे तात्पर्य दिसत नाही. श्री. कदम यांच्या संशोधनकार्यात सुयश चिंतितो !''

★★

## : २२ :
## *श्री. ब. का. विप्रदास,* पुणे-२९.

''श्री. रा. आ. कदम यांच्या राजकुल-मूलइतिहास संशोधनपर लेखाचे शीर्षकच पूर्णत: बोलके व ठाम आत्मविश्वासपूर्ण व विषयास न्याय देणारे निर्णायक-रूप आहे. :(''कदंब-क्षात्र-राजकुलाच्या वंश-वर्णाविषयी ऐतिहासिक सत्याचा विपर्यास !'').

संशोधनात्मक लेखासाठी लागणारे अनेकानेक पुरावे दिल्यामुळे 'सत्य-सम्-शोधन' (शुद्धी, शुद्धिप्रक्रियापूर्ण लेखन) होण्यास अडचण पडत नाही.

मूलत:'कदंब'- राजकुल व नृपती हे ब्राह्मण वा अन्य वंश-वर्ण-जातीचे नसून, विशुद्धकुलीन सनातन वैदिकधर्मीय आर्यक्षत्रियच होते, हा मुद्दा श्री. रा. आ. कदम यांनी या लेखात विस्ताराने मांडून निर्णिल्यामुळे; भारतीय इतिहास-संशोधन-लेखन-प्रकाशन व विद्यापीठीय स्तरावरील अध्ययन-अध्यापन-क्षेत्रांतील गेल्या पूर्णशतकातील पूर्वपक्ष समूल उखडून टाकल्याप्रमाणे झाले आहे. कदंबांना 'ब्राह्मण' कुलीन वा अन्य जातीय ठरविण्यासंदर्भातील आजवर छतातून ठिबकणारे अशुद्ध पाणी एक शतकानंतर

थांबविण्याचा सर्वप्रथम उपक्रम श्री. रा. आ. कदम यांनी केला आहे. जरी काही विचारवंतांनी 'कदंबां'चे क्षत्रियत्व अबाध असल्याचे दाखवून देणारे लेखन यापूर्वी केलेले आहे, तरी श्री. रा. आ. कदम यांनी प्रस्तुत लेखात सादर केलेली प्रमाणे त्यांनी कुणी यापूर्वी पुढे मांडल्याचे निदर्शनास आलेले नाही. तसेच कदंबांचे क्षत्रियत्वास भिन्न दिशा देणारी जी 'प्रमाणे', पूर्वकालीन प्रतिपक्षी अभ्यासकांनी पुरस्कारिली ती समूळ कशी व्यर्थ ठरतात हे ही यापूर्वी कुणी समर्पकपणे चर्चिल्याचे आढळात नाही. श्री. रा. आ. कदम हे त्यांच्या परिश्रमांविषयी व उद्देशपूर्तीसाठी अभिनंदनास पात्र ठरतात. त्यांचे प्रयत्न अभिनंदनीय आहेत.

हे संशोधन हिंदी-इंग्रजी व शक्य त्या अन्य भारतीय भाषांतही प्रकाशित होण्यास वेगळे महत्त्व आहे. तेणेंकरून या लेखांतील 'सत्य-शोधन' सर्वत्र, सर्वक्षेत्रांत ज्ञात होऊन ते पुढीलांसाठी व नवनवीन अभ्यासकांसाठी उपयुक्त ठरावे, मार्गदर्शक बनावे, हा आत्मीय मनोदयही पूर्णत्वास जाण्याच्या दृष्टीने अवश्य प्रयत्न झाले पाहिजेत. श्री. कदम व त्यांचे हे संशोधन यांविषयी सुयश चिंतितो.''

★★

: २३ :

***श्री. हरि नारायण व्यास*.पुणे-३७.**

श्री. रा. आ. कदम की ओरसे प्राप्त 'कदंब' - राजवंश:मूलत्व-शोध-संबद्ध लेख पढने का सुअवसर प्राप्त हुआ।

'कदंब'-राजकुल-पर ब्राह्मण-कुल वा अन्य जाति का हेत्वारोप करनेके आजतकके कुछ विद्वानोंके प्रयत्न कितने असंगत रहे हैं इसका समर्थ दर्शन प्रस्तुत लेख में होता है। पूर्ण एक शताब्दितक की गलत धारणा का उद्घाटन इसी लेख द्वारा हुआ है! कदंब-राजवंश के क्षत्रियत्व-मूल के बारे में जो मौजूदा गलत-असत्य-अधूरी-असंबद्ध-अनैतिहासिक धारणाएँ हैं उनको इस लेखद्वारा बडेही सूक्ष्म तर्कोंसे काटा गया है!

'ब्राह्मण', 'द्विज', 'विप्र' ये शब्द तीनों वर्णोंके लिए प्रयुक्त हो सकते हैं! लेकिन जब येही शब्द प्राचीन भारतीय किसी 'राजा' के बारेमें प्रयुक्त होते हैं तब वह राजा का 'क्षत्रियकुलवंशवर्ण'का होनाही सर्वथः न्यायसंगत है! और यही सत्य वेद, उपनिषद, ताम्रपट आदिके आधारपर इस लेखमें सुचारुरूपसे स्पष्ट और पुष्ट किया गया है।

श्री. रा. आ. कदम जी के सभी प्रतिपादित तथ्य इतने अकाट्च हैं कि उनको मानने के लिए विवश होना पडता है !

★★

: २४ :

*डॉ. सीता सखाराम कुलकर्णी,*

M. A. Ph. D.

:(१३५३, शुक्रवार पेठ, नातूबाग, पुणे-२)

कदंब हा ऐतिहासिक संशोधनपर लेख प्रकाशनापूर्वी मी वाचला होता. तो याहीपेक्षा खूप मोठा विस्तृत आणि सखोल अभ्यासाचे प्रतीकरूप जाणवला.

प्रस्तुत लेखात श्री. कदम यांनी सर्वविध व सर्वस्पर्शी ठोस अभिलेखीय 'प्रमाणां' द्वारें, अकाट्च पुराव्यांनिशी दाखवून सिद्ध केले आहे की, 'कदंब' (कदम) हे प्राचीन व मध्ययुगीन राजघराणे विशुद्धतया आर्य-क्षत्रिय (भारतीय) होते. इत:पर या निष्कर्षास अपवादानेही आक्षेप घेण्यास कुणी धजावण्याचे मनातही आणणार नाही. इतके हे त्यांचे संशोधन, किंबहुना 'शोधन'-विधान भक्कम व मूलगामी तथा सुवर्णकसास शंभर टक्के उतरणारे व विशुद्ध असे आहे. म्हणजे असे की-

'कदंब'-राजकुल हे आर्य-क्षत्रिय वैदिक सनातन धर्म-अनुयायी व पालनकर्ता होते; हे विधान बावन्नकशी 'सुवर्णा' इतके 'शुद्ध' व 'सत्य' आहे. पण आजवर अनेकानेक 'आंग्ल' तथा भारतीय विद्वान पंडित संशोधक व अभ्यासक यांनी या 'कदंब'-राजकुलाच्या 'वंश-वर्ण-जाती' विषयीच्या 'सुवर्ण'-रसात विविध प्रकारची काल्पनिकता व तर्कदुष्टता मिसळवून कदंबांचा वर्ण क्षत्रियेत्तर मानण्याचे वा समजण्याचे व तसेच प्रसारित, प्रकाशित करीत राहण्याचे जे प्रयत्न केले त्या पार्श्वभूमीवर 'कदंबां'च्या क्षत्रिय वर्णाचे मूळ विशुद्ध 'सुवर्ण'च जगातल्या सर्व इतिहास संशोधक-अभ्यासक व लेखकांपुढे ठेवण्याचे सर्वप्रथम महत्त्वपूर्ण कार्य श्री. रा. आ. कदम यांनी केले आहे ! त्याला इतरत्र तोड नाही !

'आंग्ल-वाक्यं' व/वा 'बाबा-वाक्यं प्रमाणं' वाल्यांनी भविष्यात जाणीव-जोखीम व सतर्क-जबाबदारीपूर्वक राजवंशीय 'इतिहास-लेखना'चा प्रपंच मांडणे अनिवार्य ठरावे, हे वेगळे सांगण्याचे प्रयोजन राहू नये. अशा रीतीने हे श्री. कदम यांच्याकडून घडलेले 'संशोधन' आहे हे तर खरेच, पण त्याहूनही अधिक व आगळे-वेगळे असे एक प्रकारचे 'शोधन'-विधान मौलिकच ठरते.

'कदंब'-राजकुल हे 'क्षत्रिय-वर्णीय' होते, हे चिरंतन वास्तव सत्य, नित्य शाश्वत आहे. अशा या निर्विकल्प सत्याकडे पाठ फिरविणाऱ्यांविषयी सहानुभूत राहणेच समयोचित ठरावे. आणि हे असे विधान केले तरी ते बरोबरच होय; असे म्हणण्यास कारण की, भारतीय राजनैतिक-सामाजिक प्राचीन व मध्ययुगीन परंपरा, रूढी, नीती, नियम, वेद, उपनिषदे, रामायण, महाभारत, श्रुती-स्मृती-पुराणे-शास्त्राधारभूत ग्रंथ आदि धार्मिक ग्रंथांचे अवलोकन-निरीक्षणा अंतीं असे आढळून येते की, 'भारतीय परंपराप्राप्त राज्यभिषेकसंपन्न राज्यकर्ते नृपती पूर्वापारपणें केवळ 'क्षत्रिय'-वर्णीयच होते. 'क्षत्रियां'नीच वंशपरंपरेने राजधुरा सांभाळावयाची हा शतकांनुशतकांचा भारतीय समाजजीवनाचा राजनीतिक अतूट वारसा होता. वर्णव्यवस्थेचा विवेचक विस्तार मी येथे अप्रस्तुत मानून आहे.

प्रस्तुत लेखातून स्पष्ट दिसून येते की, श्री. कदम हे मूलस्पर्शी अभ्यासी असून त्यावर मनन, चिंतन करणारे आहेत. आणि ते त्यांनी आपल्या या शोधन'- लेखात सिद्ध करून विद्वान-पंडितांपुढे सादर केले आहे.

१९९४ पर्यंत इतर अनेकानेकांनी 'पूर्ण' मूलगामी, मूलदर्शी अभ्यास उपेक्षून लिहिले, किंवा पूर्वसूरींनी यापूर्वी जे इतिहास संशोधन क्षेत्रात नोंदविले तेच जसेच्या तसे पुढीलांनी पुनरावृत्त केले. 'मूळातून' शोधून पडताळण्याचे परिश्रम गणतीत धरले नाहीत. त्यायोगें प्रारंभींच जो काही, सत्याचा अपलाप होऊन बसला तोच आजही विराजमान असावा याचा श्री. कदम यांना मनापासून खेद वाटतो, तें विषादून राहतात. त्यांच्या दृष्टीने खरा सखोल-मूलगामी पुनराभ्यास करून मगच; निदान सद्यपिढीतील संशोधक-अभ्यासकांकडून तरी; योग्य ऐतिहासिक निर्णय-विशेषतः राजवंशांचे वंश-वर्ण-रीतिरिवाज याबाबतीत सिद्धान्त ठरविले जाणे व पूर्वसूरींच्या अध्ययनातील उणिवा, त्रुटी दूर करता येणें सहज शक्य होते; ते आजही शक्य आहे व यापुढील काळात तरी नक्कीच आवश्यक आहे. राजवंशांचे वंश-वर्ण हे संशोधकीय तर्ककल्पनांच्या प्रयोगशाळेतील एक 'उपकरण', किंबहुना 'खेळणे' ठरता कामा नये, आगंतुक कल्पनाविलासांचे ते 'नंदनवन' बनविले जाता उपयोगी नाही. आमचा इतिहास हे आमचे 'आनंदवन भुवनच' राहू द्यावे व तसे वर्णित केले जावे. 'नाग' संकल्पना, 'मातृ गोत्र नाम -पद्धती; अनुलोभ-प्रतिलोभ विवाहांची गोडगुलाबी स्वप्रसृष्टीतील विहारलीला असल्या टेकूंच्या आधारें मांडण्यात आलेली भारतीय इतिहास-संशोधन-लेखनाची विटंबना नि विडंबना थांबणे, थांबविली जाणे आवश्यक आहे. आपापले संशोधकीय वेगळे व्यक्तिमत्त्व संयशोधनाच्या आधारें सिद्ध करण्याचा प्रयत्न करून

समाजरचना व समाजसिद्धान्त यांमध्ये वितुष्टे निर्माण केली जात आहेत याचे भान बाळगणे प्रत्येकाचे कर्तव्य ठरावे. भारतीय इतिहास हा एकविसाव्या शतकाच्या उष:कालापासून तरी पुढील काळासाठी आधुनिकतम अशी स्थल-जन-पुराणे बनविण्याचे थांबविण्यात यावे. 'इतिहास' म्हणजे 'रंजककथा' वा 'रहस्यकथा' बनविण्याचे सोडून द्यायलाच हवे; विशेषतः राजकुलांच्या वंश-वर्णांच्या बाबतींत याविषयींचे समग्र भान अनिवार्य मानण्यात यायला हवे.

उत्खननांतून आजवर वेळोवेळी सांपडलेली नाणी, ताम्रपट, शिलालेख, मूर्ती, प्रतिभा यांचा सुद्धा मूलस्पर्शी व सर्वस्पर्शी एकमताभिमुख, सर्वसंमत निर्णायक अभ्यास-मनन-चिंतन-लेखन व्हावयास पाहिजे. संशोधनात सारी अवधाने व संयम विवेकपूर्वक बाळगणे महत्त्वाचे, 'आपले मत' प्रकट करीत असतां ते 'आपले'च असल्याचा अभिमान बाळगण्यात अभ्यासकाला कमीपणा किंवा चुकचुकल्यासारखे वाटतां कामा नये. तसेच 'दुसऱ्याचे मत' स्वीकारताना, किंवा 'आपल्या मताला' पुष्टिकारक म्हणून ते उद्धृत करण्यापूर्वी आपण त्या 'अन्य' मताच्या मूळ तळा-गाळाशी जाऊन त्याची सर्वंकष निश्चिती करून घेणे हे आपले सर्वप्रथमचे कर्तव्यच आहे; ही अभ्यासकाची भूमिका असणे मौलिक ठरावे.

प्रस्तुत 'शोधन'-लेखात वरील सर्व गोष्टींचे सर्वोपरी भान श्री. कदम यांनी ठेवल्याचे सर्वत्र प्रत्ययास येते. 'आधी केले, मग सांगितले !'- या उक्तीनुसार श्री. कदम यांची प्रतिपादने वाचकास खिळवून ठेवतात.

संस्कृतमधील एकेका शब्दाचे अनेकानेक 'अर्थ' होतात. एखाद्या शब्दाचा 'अमुक'च अर्थ कां घ्यायचा, हे श्री. कदम यांनी सप्रमाण, पूरक प्रमाणांनिशी पटवून दिले आहे.

'कदंब', 'कळंब'-वृक्ष हा महाराष्ट्रातील शेकडो कुलांचे 'देवक' आहे; (९६ पैकी ३७ मुख्य मराठा कुळांचे व त्यांतील शेकडो पोटकुळांचे.) हे नमूद करण्यातही त्यांनी समाजाची बारकाईने केलेली निरीक्षणात्मक अध्ययने स्पष्ट होतात. 'कदंब' राजघराण्याच्या ६-७ शाखांनी भारताच्या दक्षिणी बऱ्याच प्रदेशांवर-ओरिसामध्येही, राज्य केले. 'कदंब' हे नांव 'राजकुला'स कसे प्राप्त झाले, याच्या बहुविध कथा भारतीय इतिहासात, ताम्रपटादि कोरीव लेखांतून, लोकजीवनात कथा रूपाने अस्तित्वात आहेत; यांचेही सूचक दर्शन श्री. कदम हे आपल्या लेखात आपणांस घडवितात.

श्री. कदम यांच्या अभ्यासात कमालीची उत्कटता, आपुलकी, व तळमळ, विषयनिष्ठा, तत्त्वनिष्ठा, सत्याची ओढ व प्रतिष्ठा, आणि इतिहास-लेखनात धुमाकूळ घालून राहिलेल्या फसवेगिरीविषयीचा उत्कट विषाद ओळी-ओळींतून प्रत्ययास येतो. प्रसंगीं ते संयमितपणें चिडून उठलेलेही दृष्टिगोचर होतात. ज्ञानविश्वाच्या परिणतावस्थेतील परिसीमेस स्पर्श करण्याइतपत 'इंग्रजी-संस्कृत'च्या ज्ञानाच्या आवश्यकतेच्या विचाराने कुठेही अडून न राहतां इंग्रजी-संस्कृतादि ग्रंथांतील अनुकूल-प्रतिकूल मतांचे संयमपूर्वक व साकल्याने दर्शन घडविण्याचा श्री. कदम यांचा प्रयत्न अभूतपूर्व व स्तुत्यच मानावा लागेल ! ती-ती 'बरोबर' वा 'चुकीची' विधाने कोणकोणत्या लेखकांनी कोठे-कोठे व कसकशी प्रतिपादित केलेली आहेत आदि-आदि सर्व काही पुराव्यांसह सर्वांसाठी उपलब्ध करून देणे असे-तसे काम नोहे ! अनेकविध 'शब्द-कोश' धुंडाळून त्यांतील एका-एका शब्दास विविध प्रतिशब्द किती; त्याच्या विभिन्न अर्थच्छटांच्या खुलावटी किती, यांतील कोणता अर्थ इच्छिल्या संदर्भाशी ठीक समर्थपणे समुचित ठरतो, ते शोधणे, जिकिरीचे कार्य असते. संशोधनात किती बारकावे पाहावे लागतात, तपासावे लागतात. उलट-सुलट पडताळावे लागतात, अनेकांशी अनेक प्रकारें चर्चावे लागतात, व मगच ते निश्चित करता येऊ शकतात, व असे ते मग अंतीं बहुतांना मान्य करावे लागतात. अर्थात प्रस्तुत लेखातही हे सर्व काही श्री. रा. आ. कदम यांनी विपुल परिश्रमांद्वारा व अथकपणें न कंटाळतां, मध्येच प्रयत्न सोडून न देतां केले आहे.

श्री. कदम यांचा मूळ प्रसिद्धिपूर्व विस्तृत 'शोधन-लेख' मी पूर्णतः वाचलेला असल्याने, त्यातील परिपूर्ण विश्लेषणे, विवेचने व अखंड श्रृंखलाबद्धता येथे विरलशी जाणवतात. भराभर एका मुद्यावरून दुसऱ्या मुद्यावर चपळगती हरिणाप्रमाणें श्री. कदम यांनी उड्डाणे घेतल्याचे लक्षात येते. पण ती उड्डाणे वा झेपावणे यांतही जरूर ती सुसंबद्धता निश्चितच आहे; हे ही ध्यानात आल्यावाचून राहत नाही.

प्रस्तुत लेखाविषयीं साररूपाने असा विचार करणे रास्त होईल की, सव्वाशे-दीडशे पानांमधील, अर्थदृष्ट्या व शब्द-हानी होऊ न देतां सारांशाने काढणे; आणि तो सुद्धा कमीत कमी पृष्ठांत बसविताना श्री. कदम यांना किती कुशलतेने निर्णित करावे लागले असेल याची इतरजनांनी केवळ कल्पनाच केलेली बरी !

अशा व्यासंगी श्री कदमांचा हा व्यासंग शुद्धभावशील विचारांनी परिप्लुत आहे. अशा तऱ्हेच्या या संशोधन कार्यसिद्धीत श्री. रा. आ. कदम यांना प्रदीर्घायुरारोग्य लाभावे, अशी दयाघन ईश्वराजवळ प्रार्थना करून मी थांबते ! ★★

: २५ :

*श्री. द. स. झोडगे.*

**संपा. 'गांवगाडा,' पुणे-३७.**

१. श्री. रा. आ. कदम यांनी भारतीय इतिहासाच्या प्राचीन व मध्ययुगीन काल-खंडातील 'कदंब' या राजवंशाचे आमूलत:चे क्षत्रियत्व,' इतिहास. संशोधकांच्या नजरेस आणून देण्याची फार मोलाची व महत्त्वाची कामगिरी सदर लेखाद्वारा केली आहे.

२. रा. आ. कदम यांनी प्राचीन/मध्ययुगीन राजवंशांच्या इतिहासाचा सखोल अभ्यास केल्याचे जाणवते. 'कदंब-राज-घराण्याविषयीही त्यांची सत्यश्रद्धाशील बुद्धी विवेचनातून स्पष्ट आढळून येते.

३. 'कदंब' राजघराण्याचा शोध मोठ्या मेहनतीने व काळजीपूर्वक श्री. कदम यांनी घेतला आहे. त्यामुळे सदर लेख व्यापक व उद्बोधक सिद्ध झाला आहे.

४. 'कदंब' राजघराण्याविषयी भारतीय इतिहासक्षेत्रात संशोधनाच्या नांवाखाली गेली सुमारे १२५ वर्षे इतिहासकारांनी प्रसृत करून संगोपित केलेल्या असत्य विधानांची पाळेमुळे मोठ्या कौशल्याने सखोल उखडून-खोडून काढून, श्री-कदम यांनी अंतिम व आद्य निखळ सत्य तेच उजेडात आणण्याचे एकमेकाद्वितीय व सर्वप्रथम श्रेय मिळविले आहे ! त्यामुळे त्यांना इतिहास अभ्यासकांच्या भावी सर्व पिढ्या निश्चितच धन्यवाद देणार आहेत. कारण-

५. सदर लेख म्हणजे एक प्रकारचा **अचूक मार्गदर्शक-दीपस्तंभ** वा ध्रुव तारा. ठरतो. तेजोगर्भ प्रकाश झोत ठरतो.

६. स्वकीयत्वाचे दृष्टीने सखोल अभ्यास करून आपले विचार जनतेपुढे मांडणारे फार थोडे लोक सांपडतील. कविवर्य कदम यांनी मोठ्या मेहनतीने राजवंशीय 'कदंब' कुलीनांच्या 'क्षत्रियत्वा'चा शोध घेतला आहे, त्याचे आम्हांस व कोणासही निश्चित कौतुकच वाटेल, असे या लेखाचे आगळे-वेगळेपण प्रत्येकाच्या चटकन नजरेत भरणारे व विवेक-विचार, भावना आणि कल्पना यांचा अचूक वेध व ठाव घेणारे आहे, हे नक्कीच होय. सदर लेख हा मौलिक सारस्वरूप शोधप्रबंध वाटतो !

७. विषय-मांडणीतील श्री. कदम यांची भाषा साधी आणि सरळसोपी तर

आहेच, पण त्याच बरोबरीने ती विचारप्रगल्भही आहे ! दुर्बोधतेकडे वळतहीनाही; हे वाखाणणीय होय !

८. 'कदंब'-क्षात्र राजकुलाच्या ऐतिहासिक वर्ण-वंशविषयक मूलत्त्वावर व सातत्यपूर्णतिवर व विशुद्धतेवर ऐतिहासिक सत्यशोधक दृष्टीने सत्याचा प्रकाश टाकण्याचा प्रयत्न श्री. कदम यांनी केला आहे. त्यात श्री कदम यांची शोधदृष्टी, व्यासंग व मुद्दे मांडण्याची पद्धती पाहिल्यावर मनाला खूप आनंद होतो.

९. निबंधातील विवेचनाची दिशा-पद्धती रीतिनीती , व वैविध्यपूर्ण गति-संगती पूर्णतः निराळी व नवीन वाटते. ती वाचकांचे मन वेधून घेते.

१०. मुद्यांची स्पष्टीकरणे करण्यास श्री. कदम यांनी जी ''प्रमाणे'' घेतली आहेत, तीही प्रातिनिधिक सुस्पष्ट व बिनतोड अपूर्व आहेत; उगीच काहीतरी, कुठूनतरी, कशीतरी ओढून-ताणून धरून आणलेली, उगीचच अकारण भरीस घातलेली वा घेतलेली वेठीस धरलेली नाहीत ! तर ती निर्विवाद ''स्वयंसिद्ध ऐतिहासिक'' सिद्धान्तगर्भ आहेत-हिरण्यगर्भ आहेत !

११. सदर सर्वांगसुंदर निबंधात प्रस्तुत लेखकाने एक कोड्याचे गणित मांडले आहे, ते असे; महाराष्ट्रातील अनेक राजघराण्यांपैकी 'कदंब' हे राजघराणे 'ब्राह्मण' होते ? की 'क्षत्रिय' होते ? आणि-याचे 'उत्तर' देण्यापूर्वी 'कदंब' हे 'ब्राह्मण' होते, याची विविध संशोधकांनी आजवर पुढे केलेली 'प्रमाणे' प्रथमतःच खोडन काढून, ते आद्य-मध्य वा अंतीं कधीच 'ब्राह्मण' नव्हते, हे सप्रमाण सांगावयास हवे; आणि श्री. कदम यांनीही या लेखात नेमके तेच व तसेच उत्तम कौशल्यपूर्ण रीतीने प्रतिपादित केले आहे. सदर विवेचनाची पद्धत अगदी नवीन असून फारच लक्षणीय व विचारणीय आहे ! चिंतनशील आहे.

१२. श्री. कदम यांनी मांडलेल्या प्रतिपादनांस भरपूर पण आवश्यक तेच आणि तेव्हढेच पुरावे दिले आहेत. त्यामुळे 'कदंब' हे राजघराणे 'क्षत्रिय'च होते, हाच सिद्धान्त निर्विवाद सिद्ध होतो, याविषयी इतःपर कोणतीही व कुणासही शंका-संभ्रम राहू शकत नाहीत; आणि ते तसे आता मुळी राहूही नयेत !

१३. यात लेखकाने अन्य गण्यमान्य पुरातत्त्व तथा पुराणसंशोधक-अभ्यासकंची मतेही घेऊन ती सोबत सादर केलीच आहेत. यांतील-

(१) डॉ. प्र. ग. लाळे म्हणतात की, सर्व 'प्रमाणे' तपासून श्री. कदम यांनी 'कदंब' या राजवंशाचे 'क्षत्रियत्व' सिद्ध करून, प्राचीन राजवंशाच्या इतिहासाच्या संशोधनात एक नवीन, मोलाची व अभूतपूर्व व नितान्त आवश्यक अशीच भर टाकिली आहे.

(२) डॉ. वि. त्र्यं. गुणे यांनी आपले मत व्यक्त केले आहे, ते असे आहे, 'श्री. कदम यांनी 'मयूर वर्मन कदंब' याचे वर्णन व माहिती दिली आहे, ती निःसंशय अगत्यपूर्वक वाचनीय व चिंतनपर आहे.

१४. लेखकाने आपल्या लेखात गृहीत धरलेली कृत्ये अचूक आहेत, त्यामुळे ती इतिहासकारांस मार्गदर्शन करण्यास उपयुक्त होणारी आहेत हे निश्चितच !

१५. श्री. रा. आ. कदम यांचा लेख पुरातत्त्व-संशोधनपर आहे. काव्य-प्रतिभेच्या शक्ति-बळावर तो जरूर निर्धारिलेला आहे पण केवळ कल्पनांच्या वा अंदाज-अनुमानांच्या स्वैर-विहारांवर तो रचलेला वा विसंबिलेला नाही ! हे महत्त्वाचे आहे !

निबंधाचा विषय इतिहासाच्या दृष्टीने फारच महत्त्वाचा आहे. म्हणूनच या विषयाचे सविस्तर विवेचन-विश्लेषणात्मक विवरण-वर्णन करून विवेचनात आपल्या प्रमेयांची रचना साध्य-सिद्धान्त मोठ्या शोधक बुद्धीने व मार्मिकपणें मांडून ती सिद्ध केलेली आहेत. या सर्व विवेचनात श्री. कदम यांचा, 'कदंब'-राजघराण्याविषयीचा सत्याश्रित निष्ठाभाव उत्तमप्रकारें सुस्पष्ट व अभिव्यक्त झालेला आहे; तो सर्व लेखास व्यापून राहिलेला आहे. ते समर्पकही आहे. विदेशी संशोधक आपल्या स्वाभिमानासाठी 'आर्य' हे कॉकेशस. पर्वतावरून हिंदुस्थानात आले. ते आमचे सुसंस्कृत असे 'पूर्वज' होते. हा अपसिद्धान्त मांडून त्या आधारें खोट्याचे खरे करू पाहतात. तसे काहीही श्री. कदम यांच्या प्रतिपादनात अपवादानेही आढळून येत नाही, हे निश्चितच मौलिक आहे ! यात लेखकाचा 'संयमपूर्ण विवेक' ठामपणें कौतुकास्पद जाणवतो. त्यामुळेच लेखकाच्या प्रतिपादनात नवीन धाटणी आणि नवीन मांडणी स्पष्ट आढळून येते; हे स्वागतार्ह होय ! आम्ही त्यांचे मनापासून स्वागत व अभिनंदन करतो !

१६. अशा या सूर्यवंशातील राजांचे वंशज, 'कदंब' - कदम हे राजघराणे आहे, हे सिद्ध आहे.

१७. या संदर्भात श्री. रा. आ. कदम, यांनी उपलब्ध व उचित तीच ऐतिहासिक

परिमाणे देऊन सिद्धता साकारविली आहेच. आणि त्याच बरोबरीने, ते सिद्ध करीत असतां पूर्व कालीन व सद्यकालीनही इतिहास संशोधकांचा, अभ्यासकांचा, इतिहास-लेखकांचा यथायोग्य संयमपूर्ण समाचार घेतला आहे. तो समाचार घेताना त्यांनी कुणाही विषयींचा आदर उणावू दिलेला नाही ! की आकसाचे अस्पष्टसे-निसटतेही बोट धरण्याचा मोह दाखविलेला नाही.

१८. ऐतिहासिक 'शर्मन' की 'वर्मन' असे जे विचार आहेत; ते अत्यंत अनुचित, अनुदार त व हीन म्हणायचे नसेल तरी पक्षपातीवृत्तीचे निदर्शक जरूर असून इतिहासाचा विपर्यास करणारे व आत्यंतिक भ्रममूलकही आहेतच आहेत; याची सूज्ञांनी नोंद घेणे अनिवार्य, अपरिहार्य आहे !

★★

: २६ :

***प्रा. श्री. ग. दाढे. डोंबिवली.***

**M. A. (पुरातत्त्वविद्या)**



श्री. रा. आ. कदम यांच्या, 'कदंब-सातवाहन-वाकाटक' या राजवंशांविषयीच्या प्रगल्भतापूर्ण संशोधित लेखांतून, या राजवंशांची एक सजग, ठसठशीत व निर्मळ प्रतिमा इतिहाससंशोधकांच्या पुढे आली आहे.

ऐतिहासिक सत्य म्हणजे कल्पित बखर नव्हे, कांदबरी नव्हे, दंतकथांचे नंदनवन नव्हे ! इतिहास संशोधकांनी त्या-त्या कालातील सांस्कृतिक व राजकीय इतिहासाचे जिवंत चित्रण करून आपल्या पूर्वजांचे रसरशीत आत्मगौरवपूर्ण अभिमानास्पद दर्शन घडविले पाहिजे. त्यामुळेच समाजाला नवप्रेरणा, चैतन्य लाभून समाज सर्वांगांनी फुलत असतो, विकसित होतो.

मगधाच्या महापद्म-राजकुलाविषयीही एक अभूतपूर्व पूर्णतः नवाच प्रकाश-झोत श्री. रा. आ. कदम यांनी या लेखाच्या रूपाने टाकला आहे. दुर्दैव असे आहे की आजवर-यापूर्वी, महापद्माच्या राजवंशीय विशुद्ध क्षत्रिय कुलीनत्वावर 'हीनकुलोत्पन्न' राजे हा जसा की कायमचाच शिक्का-आंग्ल टांकसालीतला-उठविला/बसविला गेला होता, तोच श्री. कदम यांनी आपल्या व्यासंगपूर्ण अध्ययनातून कायमचा 'उठविला' आहे व काढून फेकून देण्याचे अद्वितीय ऐतिहासिक मोलाचे कार्य केले आहे ! हे आज गण्यमान्य विद्वान, पंडित, संशोधक, अभ्यासक व विचारवंत

ही मान्य करीत असल्याचे प्रत्ययास येत आहे ! याविषयी श्री. कदम निश्चितच धन्यवादास पात्र ठरतात !

वर्णसंकरितास जे वैदिक परंपरानुगत अधिकार, हक्क उपभोगता येत नाहीत, ते तर महापद्माने उपभोगले होते व तो चक्रवर्तीही होता, 'एकराट्' होता, 'एकछत्र'/ 'एकक्षत्र' होता ! आणि विशेष म्हणजे असे भव्य दिव्य देदीप्यमान गौरवाचे वर्णन पुराणांत अन्य कोणत्याही प्राचीन नृपतीचे आले आहे का हे स्थूलदर्शी भिंगातून शोधतच राहावे लागेल ! इतका गौरव ज्या पुराणांनी ज्या महापद्मास अभिषेकवत् अर्पिला, त्यालाच आधुनिक इतिहासकारांनी कुलकलंकित, कुलदूषण असा चित्रित केला, रंगविलाही ! हे खरे तर त्याचे दुर्दैव ठरले तरी आम्हां भारतीयांचेही ते दुर्दैवच आहे, अभद्रपणही आहे.

डॉ. पार्गिटरादि आंग्ल विद्वानांच्या अभ्यासपूर्ण, ग्रंथांतील असली अप्रमाण अनर्थकारी विधाने यापूर्वीच कोणी असिद्ध करण्याचा प्रतिवाद केला नाही, हे ही आम्हां सर्वांचे दुर्दैवच !

महापद्माच्या माथीं मारलेले कुलदूषितत्वाचे नमुने श्री. कदम यांनी जे सर्वांपुढे ठेवले आहेत ते वाचून तर असे वाटते, की भारतीय इतिहासातील (आधुनिक साधनांनी सिद्ध व प्राचीन ग्रंथवर्णित) पहिल्या क्षात्रराजवंशीय कुलवर्ण-वर्णनाची ही शोकांतिका अद्वितीयच आहे ! तिचा यापूर्वी कुणीच प्रतिवाद केलेला आढळत नाही, हे कसे ?

डॉ. पार्गिटर यांच्या, 'पुराण-अभ्यास' ग्रंथात तळटीपांत एखादे निखळ सत्य अस्तित्वात असते, पण तेच कुणीही उचलून त्या आधारें इतिहासलेखनाला न्याय देण्याचे मनावर घेत नाही ! ते कां व कसे हेही उमजत नाही. 'एकक्षत्र', 'सर्वक्षत्रांतरें' हे उल्लेख सूर्यतेजाची किरणे शोभावीत अशी दिसत असतानाही महापद्मावर कुलकलंकाचा ठसा उमटविला जावा याचे वैषम्यही कोणास कसे जाणवले नाही ? असो !

या सर्वांचा अर्थ आहे, पुराणे समजून घेण्याच्या अगत्याचा अभाव येथे प्रबल ठरला व अन्य सर्व प्रामाणिक व सत्य-प्रमाणित संकेत हतबल राहिले !

'महानंदीचा सुत' महापद्म नृप याचे औरस पुत्रत्व, राजवंशपरंपरा व विशुद्ध क्षात्रतेज अबाध असल्याचे व सहाही पुराणांत महापद्माच्या मातेचा, तिच्या कुलवंशवर्णजातमातापितागुण या कशाचेही प्रयोजन नसल्याने, तसा त्याच्या कोणत्याही

मानवीय स्वमातेचा उल्लेखही नाही, हेही श्री. कदम यांनी सुस्पष्टपणें दाखवून दिले आहे. महापद्‌माच्या आधीच्या व महापद्‌माच्या नंतरच्या जर राजांच्या मातांचे उल्लेख पुराणांत नाहीत तर, मग एकट्या महापद्‌माच्याच मातेचा उल्लेख पुराणांत येईलच कसा ? कशासाठी येईल ? असा साधा सरळ प्रश्न यापूर्वीच्या कोणाही अभ्यासकास पडू नये हेही एक अतुलनीलय नवलच मानावे लागते !

जैन-बौद्ध साधनांतून दिसून येणारा अज्ञान-जन्य, अल्पज्ञता-जनित, विपरीतार्थ-उत्पन्न अनर्थकारी पक्षपात, दुष्टावा पुराणांत न आढळल्याने पुराणांची प्रामाणिकता उठून दिसते, व विष्णु./भाग. पुराणांचे द्व्यर्थक कौशल्य स्तिमित करते ! सरलतेचा अभाव ही त्यांची उणीव ! पण त्यांचा द्व्यर्थी भाव (जाणून घेता आला तर, जाणून घेतल्या नंतरच !) त्यांच्या विषयीचा आदर टिकवून ठेवतो ! मात्र महापद्‌माचे निखळ क्षत्रियत्व सांगणारे शब्दबंध विष्णु./ भाग. पुराणे वगळतात; तेव्हा त्यांच्या हेतूंविषयी संशय उत्पन्न होतो. आणि हाच संशय यापूर्वी कोणासच अस्वस्थ करण्याइतपतही निर्माण होऊ नये यातच आमची सत्य इतिहास संशोधनातील अनास्था प्रकर्षाने खंत निर्माण करते !

डॉ. पार्गिटर नंतर श्री. कदम यांनीच पुराणांच्या प्रकाशित/हस्तलिखित (४४+८) उपलब्ध प्रतींतील पाठभेद एकत्र दिले आहेत, ही त्यांची कामगिरी महत्त्वाची आहे. मोलाची आहे !

श्री. कदम यांनी पुराणश्लोकांतून स्वीकारलेले सर्वच्या सर्व अर्थ निरपवाद अत्यंत लक्षणीय आहेत. त्यांनी ते अर्थ विवेचक बुद्धीने महाभारत, बृहदारण्यक उपनिषद, मनुस्मृती यांतील प्रमाणांधारें, पोषक संदर्भांवरून सुस्पष्ट केले आहेत.

शब्दांचे अर्थ कसे घ्यावेत, सामासिक शब्दांचे विग्रह कसे करावेत, त्यांतून कोणत्या समासाला प्राधन्य देऊन तो अर्थ अन्य संदर्भांच्या पार्श्वभूमीवर कसा निर्णित करावा याचा प्रत्यक्ष वस्तुपाठच या लेखात ठायीं ठायीं आढळून येतो !

पुराणेच एकमुखें सांगतात की कलियुगाच्या अंतापर्यंतच नव्हे तर **'यावत्काल'** - पृथ्वीतलावरील राजे शिशुनाकांजसे क्षत्रियच होतील ! हेही श्री. कदम यांनी सर्वांपुढे ठेवले आहे. याचाच अर्थ असा होतो की -

मध्यंतरी जे **''कलावाद्यन्त स्थितिः''** असे काही जे विवाद्य वचन वादाची व्यर्थ वाद्ये वाजवीत होते, आणि त्यातून भलताच अर्थ विवादपटू काढीत होते ते निरर्थक,

निर्मूल होते. या वचनात काय आहे ?-

: ''कलौ+आ+आदि+अन्त स्थिती:।''- यात मानवी सामाजिक 'वर्ण' आलेच कोठे ? आणि जर ते तसे मानायचेच तर या विग्रहात तसा अर्थ आहे का ? की 'पहिला व शेवटचा' वर्णच शेष राहील ? यातून तर हाच अर्थ स्पष्ट आहे की (वर्णांबाबतील घ्यायचाच तर !)

''कलीत आ-आदि-अंत-स्थिती''- राहील ! म्हणजे पाहिला ते अंतिम वर्ण- असे कलीतही राहतील ! हे तर सारे शब्दजालच ! सत्य तथ्य निराळेच ! तेव्हा असल्या निरर्थक वादांतून इतिहाससिद्धीचा ध्यास बाळगणारांनी वेळीच सावधता वरणें सर्वोपरी सर्वांच्या हिताचे ठरते !

वरुण, चंद्र, भार्गव, परशुराम, क्षत्रांतक ही सर्व स्पष्टीकरणे श्री. कदम यांच्याच शब्दांत मूळातून वाचनीय ठरतात ! व त्यांनी दिलेले भान आम्हां सर्वांच्या हिताचे आहे !

भारतीय इतिहासलेखणातील विसंगती प्रामाणिकपणें व अनिवार्यपणें टाळावयाच्या असतील तर, श्री. कदम यांनी जे जे सिद्ध करून आपणां सर्वांच्या पुढे ठेविले आहे, त्याप्रमाणे अभ्यासकांनी विचार व चिंतनपूर्ण विवेकी संशोधकाची भूमिका घेऊन इतिहासलेखनात निश्चित सत्य निष्कर्षच मान्य करणे इष्ट आहे.

श्री. कदम यांनी परिश्रम-कष्टांची पराकाष्ठा करून उपलब्ध प्राचीन ग्रंथांच्या आधारें, ठोस संदर्भ देऊन महापद्मादि नंद-नृपतींचे विशुद्ध औरस क्षत्रियत्व निर्विवाद रीतीने सिद्ध केले आहे; की जे यापूर्वी आजार दुर्लक्षितच राहिले होते. श्री. कदम यांनी गीता व ज्ञानेश्वरीवचन उद्धृत केल्यानुसार शौर्यादि ओज-तेज-बल-दम-दल-दंड (दान, अप्रतिग्रह) व सत्य नि चारित्र्य, विशुद्ध कुलीनत्व या गुणांनी युक्त असे कर्म हा क्षत्रियांचा स्वभावसिद्ध, जन्मजात स्वधर्मच आहे, हे अभ्यासकांनी दृष्टीआड करू नये.

श्री. कदम यांनी गेली काही वर्षे तळमळीने जीवतोड मेहनत करून प्राचीन भारताच्या अभ्यासकांच्या गंजलेल्या बुद्धीत दडून राहिलेले सुवर्णसत्य बाहेर काढण्याचा अथक प्रयत्न केला आहे. ते ग्रंथनिबद्ध होत असलेले धन हिंदी व इंग्रजीतूनही मुद्रित/प्रकाशित होऊन सर्वांपुढे आले पाहिजे; त्यामुळे ते सर्वांसाठी उपयुक्त ठरणार आहे श्री. रा. आ. कदम यांच्या, प्राचीन भारतीय उज्ज्वल इतिहास निर्भेळपणें उजेडात आणण्याच्या एकसमर्थ प्रयत्नांविषयी हार्दिक धन्यवाद आहेत ! माझे त्यांच्या

यशस्वितेसाठी आशीर्वाद आहेत !! ★★

: २७ :

*श्री. द. स. झोडगे, पुणे-३७*

**संपा. 'गांवगाडा.'**

इ. स. पू. ४२२ ते इ. स. पू. ३२२ या अवधीत मगधमध्ये महापद्म नांवाचा राजा राज्य चांगल्या प्रकारें करीत होता. तो नुसताच राजा नव्हे तर तो सम्राट होता. एकराज, एकराज्य, एकराट्, एकछत्र, 'एकक्षत्र' (अद्वितीयक्षत्रिय) असा तो अद्वितीय क्षत्रिय सम्राट होता, असे मत्स्य., वायु., ब्रह्मांड. ही तिन्ही पुराणे एकमुखें साक्ष देतात, पण हे चारही शब्द विष्णु., भाग., भविष्य. या, नंतरच्या पुराणांनी पूर्णतः वगळलेले आढळून येतात. आणि केवळ त्यांच्या बेभरवशावर आधारून महापद्मा-विषयी आधुनिक अभ्यासकांनी अनैतिहासिक निष्कर्ष काढले व इतिहास लेखन केले आणि भारतीय इतिहास-लेखनाला भलतीच गैरदिशा मिळाली. हा सर्व वृत्तान्त श्री. रा. आ. कदम यांनी महापद्माविषयीच्या लेखात सुस्पष्टपणें इतिहासलेखन-संशोधनक्षेत्रात सर्वांसमोर सर्वप्रथम ठेवला आहे. याविषयी विवेकनिष्ठांनी जरूर विचारशील होणे आवश्यक ठरणारे आहे.

महापद्म हा शिशुनाकवंशीय महानंदी या राजाचा पुत्र होता. म्हणजेच तो व त्याचे पुत्र आणि पुढील वंशजही शिशुनाक वंशीयच होते. तरीही त्यांना 'शिशुनाक' मधील **'नाक'** या उत्तरपदाधारें-त्याचा अर्थच 'नंद', 'आनंद' (मोद-प्रमोद) असल्याने 'नंद'-वंशीय ठरविण्यात आले, व तसे संबोधले जाऊ लागले.

शिशुनाकवंशीयच महापद्म हा भारताचा सार्वभौम छत्रपती होता. विशेष म्हणजे त्यास कालज्येष्ठ पुराणांनी 'एकछत्र', 'एकक्षत्र' म्हटलेले आहे. अर्थात 'छत्रपति' म्हणजेच 'क्षत्रपती' व 'क्षत्रपती' म्हणजेच 'छत्रपती' होय. हा विषय इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांनी एका लेखात समर्पकपणें विशद केला आहे. शिशुनाकवंशीय राजेही क्षत्रियच होते, 'क्षत्रबंधवः' ! अशी नोंद कालज्येष्ठ तिन्ही पुराणांतही आहे. अर्थात महापद्म, त्याचे आठही पुत्र व पुढील सर्व वंशजही विशुद्ध क्षत्रियच होते. ना त्यांचा कुणी नाश केला, ना ते संपले. तसेच महापद्मानेही 'सर्व क्षत्रियां'चा नाश केला वगैरे भ्रम जे इतिहासात प्रसृत झाले आहेत, याविषयीचे सप्रमाण विश्लेषण श्री. कदम यांनी या लेखात सर्वांसमोर ठेवून, महापद्म हा **'सर्वक्षत्रान्तरे'**-म्हणजे सर्व क्षत्रियांपैकीच एक जन्मला होता व तो स्वतःच **'सर्वक्षत्रान्तक'**- म्हणजे **सर्वक्षत्रियांचा**

**अंत करणारा नव्हे, तर 'सर्वक्षत्रियरूप काल' (यम, धर्म, दंडधर) देवता** (स्वरूप) होता हेही स्पष्ट केले आहे.

अर्थातच यातून दुसरी एक फोल संकल्पना समोर येते व तिची व्यर्थता पटून जाते. ''नंदान्तं क्षत्रियकुलम् !'' हीच ती भोळी-भाबडी संकल्पना ! 'नंदान्तं' नव्हे तर 'नंदन्तः' क्षत्रियकुलम् ! असे आहे ! आणि 'नंदन्तः' चा अर्थ आहे 'राजपुत्र', 'राजा' ! याचाच अर्थ असा होतो की ''नंदन्तं क्षत्रियकुलम्'' ही पारंपरिक संकल्पनाच उचित ठरते ! राजा व राजपुत्र हे क्षत्रिय कुलीनच होत !

धर्म, नीतिनियम, वांशिक परंपरा पाळणारे वंश कुलीन समजले जात. तसा महापद्मही होता. त्यास 'राज्याभिषेक' झाला होता. राज्याभिषेकापूर्वी 'यज्ञ' करावा लागत असे, आणि यज्ञासाठी वैदिक परंपरेचे अवलंबनही आले. 'राजसूय', 'अश्वमेध' हे यज्ञ क्षत्रिय राजांनीच करावयाचे असत. हा सर्व भाग श्री. कदम यांनी आपल्या कदंब-सातवाहन-वाकाटक या तिन्ही लेखांत सुस्पष्टपणें विशद केलेला आहे. तसेच त्यांची वेद, उपनिषदे, पुराणे, स्मृती यांमधील यथोचित दाखले देऊन आपले संशोधन उत्तम प्रकारें सिद्ध केले आहे. ते करीत असताना त्यांनी विरोधी मतप्रवाहांचा व दाखल्यांचाही उचित समाचार घेऊन त्यांतील असंबद्धता व व्यर्थता पटवून दिली आहे. पुराणे ही एक प्रकारची प्राचीन इतिहासच आहेत. मात्र आधुनिकांनी त्याआधारें लिहिलेला इतिहास त्यांच्याशी विसंगत आहे; तो विकृत बनविला गेला आहे. भारतीय इतिहास त्यामुळेच इतःपर नव्याने लिहिला गेलाच पाहिजे. त्याविषयी कुचराईची भावना बाळगणे म्हणजे आपणच आपल्या पूर्वजांच्यांशी आपणांस कृतघ्न सिद्ध करणे आहे, प्रतारणा बाळगल्याजसे होणारे आहे, याचा विचारशीलांनी सर्वांगी जरूर विचार करून तो कृतीत उतरविला पाहिजे: ते करीत असताना भारतीय इतिहासात आजवर जे अप्रामाणिक जमा झालेले आहे ते निपटून काढून दूर केले पाहिजे. किंबहुना त्यांच्या असत्य विधानांच्या भूतकालीन अस्तित्वाचा इथून पुढील काळात उच्चारही अनावश्यक व अप्रस्तुत मानून जे शुद्ध व प्रमाणसिद्ध आहे त्याचीच प्रतिष्ठा इतःपर भारतीय इतिहासाच्या लेखनास शोभनीय ठरणार आहे ! आजवर झाली तीच अशोभा पुष्कळ झाली, आता तिचे नांवही नको ! या भूमिकेचा अवलंब करण्यास 'सत्यास प्रतिष्ठा' देत आलेल्या प्रतिभासंपन्न वारसदार अशा यच्चयावत् भारतीयांना जडभारे वाटावयास नको ! एवढी किमान अपेक्षाही उज्ज्वल भारतीच्या भावी पिढ्या बाळगू शकण्याच्या हक्कदार नाहीत काय ?

तशात तर महापद्माची व त्याच्या वंशजांची उत्पत्ती जी अनुचित प्रकारांची झाल्याचे आधुनिकांनी भासविले आहे, अनेकानेक कपोलकाल्पित विधाने करून महापद्माचे विशुद्ध क्षत्रियत्व वा कुलीनत्व कसे कलंकित केले आहे, त्यांचे मूलस्रोत कोणते हेही श्री. कदम यांनी समग्रपणें व संयमाने दाखवून दिले आहे. ते-ते पुरावेच मूळांतून सर्वांसमोर त्यांनी ठेवले आहेत. हे फार मोठे योगदान त्यांच्यामुळे भारतीय इतिहासाच्या विशुद्ध संशोधन व लेखनांस लाभले आहे ! हे नाकारता येते काय याचाही विवेकाने विचार व्हावा.

वर्ग-वर्णश्रेष्ठवादी इतिहासलेखनाची बाळगुटी आंग्लादि विद्वानांनी प्रारंभापासूनच येथे उगाळवीत ठेविली, तिचे हे सर्व परिमाण आहेत: की क्षत्रिय राजकुलांचे क्षत्रियत्वच नाकारावयाचे व सर्वांना नामोहरम करावयाचे, हतवीर्य भासवावयाचे ! आणि हीच भारतीय इतिहासलेखनात आधुनिकांनी भयाण शोकांतिका निर्माण करून ठेविली आहे.

कालज्येष्ठ व कालकनिष्ठ पुराणांविषयीची श्री. कदम यांनी नमूद केलेली विद्वानांची मते पूर्णत: बोलकी आहेत. ती प्रत्येक अभ्यासकाने ध्रुवताऱ्याप्रमाणे आपल्या नजरेसमोर सातत्याने राहतील याची काळजी घेतलीच पाहिजे. त्याचबरोबर कालकनिष्ठ पुराणे ही "द्व्यर्थी" आहेत हे जे श्री. रा. आ. कदम आम्हां सर्वांना सर्वप्रथमच सांगत आहेत, पुराव्यांनिशी पटवून देत आहेत, त्या दिशेनेही विचार होणे आवश्यक आहे. ऊठसूट पुराणांना झोडपत राहण्यापेक्षा त्यांतील गम्य कोणते, मतितार्थ कोणता, श्लेष कोणता, रूपक कोणते, प्रतीकात्मक अर्थ कोणता, हे त्या कालास साक्षी ठेवून समजून घेतले पाहिजे. आजच्या धारणांचे कलम प्राचीन कालीन धारणांवर करण्याच्या मोहाच्या वाटेला आपण जाता कामा नये !

श्री. कदम यांनी या लेखात प्रत्येक विधान साधार सिद्ध केले आहे; व पूर्वीची प्रत्येक चुकीची धारणाही साधारच खोडून काढली आहे; त्याचबरोबर ती धारणा कोठून उद्भवली हे ही प्रमाणांसह दाखवून दिले आहे.

बृहदारण्यक उपनिषद, शतपथ ब्राह्मण, तैतिरीय संहिता व ब्राह्मण, ऐतरेय ब्राह्मण या ग्रंथातून जो आमचा इतिकास निहित आहे, त्याचे चिंतन प्राचीन भारतीय इतिहासलेखनासाठी अत्यावश्यक ठरणारे आहे; कारण त्याशिवाय दुसरी प्रामाणिक साधने उपलब्ध नाहीत. आमची सहा-सात पुराणे जी भारतीय राजवंशांची माहिती देतात) तीही उपरोक्त वैदिक साहित्यावर आधारित आहेत. आणि म्हणूनच त्या

ग्रंथांतील देवतावर्णने व समाजवर्णने यांचेच एकत्रित प्रतिबिंब पुराणवर्णित इतिहासावर पडणे संभवनीय राहते, याचा विचार दुर्लक्षिता उपयोगी नाही.

पृथ्वी ही 'शूद्रा' आहे, पूषण हा 'शूद्र' आहे. पूषण हा सूर्यही आहे, आदित्य आहे ! म्हणजे सूर्यही 'शूद्र' आहे. पृथ्वी या अदितीचे पुत्र ते आदित्य ! ते ८-१०-१२ या कोणत्याही संख्येने घेतले तरी ते ही शूद्रच (शूद्रा मातेचे पुत्र व शूद्रतत्त्वाचे आचरण करणारे) ठरतात ! एवढेच काय, पण प्रत्येक मनुष्य व जीवमात्राची माता 'पृथ्वी' हीच शूद्रा आहे; आणि म्हणूनच 'म्हणावयाचे, **"जन्मना जायते शूद्रः !"** हेच कसे आधुनिक इतिहासकारांनी समजून घेतले नाही, व त्यामुळे महापद्म-वंश कसा भलता-सलता ठरविला गेला हे श्री. कदम यांनीच फार उत्तम प्रकारें सर्वप्रथम आपणां समोर ठेवले आहे ! आम्ही सर्वांनी इत:परच्या इतिहासलेखनात हे भान सांभाळणे गरजेचे आहे ! असो ! एकंदरीत काय ? तर-

महापद्माविषयी व पुढील राजवंशांविषयी आपली ६-७ पुराणे जे काय सांगत आहेत, त्यांचा कालक्रमाने बदलता चेहरा ध्यानात घेऊन, विष्णु./भाग. पुराणांचा द्व्यर्थी भाव उमजून घेतला पाहिजे. आणि तेणें करून ही जी सर्व पुराणे एकमुखाने सांगतात ते दुर्लक्षिता कामा नये. महापद्माचे अनैतिहासिक निमित्त पुन्हा पुन: मंडित करून सर्व भारताचा दिव्य-भव्य इतिहास व तदनुषंगाने तत्कालीन व सद्यकालीन सामाजिक जडण-घडणीचा इतिहास जो हीन-दीन, विकृत व कलंकित करून ठेवला गेला आहे, याचा समग्र विचार विद्यमान कालातच होऊन, भावी कालासाठी स्वच्छ व सत्य---निर्भेळ सत्य स्वरूपातील इतिहास देण्याचे कार्य आजच्या अभ्यासकांनी-संशोधकांनी व इतिहासकारांनी पार पाडले तर आम्हां भारतीयांचा भविष्यकाळ त्यांच्याविषयी जरूर ऋणी राहीलच राहील !"

★★

: २८ :

***डॉ. म. श्री. माटे : पुणे-३०***

M. A. Ph. D.

: [महाराष्ट्राचे आद्य सम्राट म्हणजे सातवाहन राजे. या राजवंशाचे मूल स्थान, त्यांचा राज्यकाल, त्यांची एकूण संख्या, त्या राजांची नांवे, त्यांचा वर्ण व जाती या प्रत्येक गोष्टीविषयी आंग्ल तथा भारतीय संशोधकांत मतभेद आहेत. त्यांचा त्रोटक उल्लेख या लेखात आहे. सातवाहन-कुल कोणत्या जाती-वर्णाचे होते, याचा

साकल्याने व त्यांच्याच कोरीव लेखांधारें विचार व निर्णय केलेला आहे.

आंग्ल संशोधक स्टीव्हन्सन व ब्रेस्ट यांनी-सातवाहन हे ब्राह्मण होते, असे मत मांडले.

:(J. B. B. R. A. S. Bombay:Vol.5, P. 41./1853 A. D.)

पुढील काळात इतर काही अभ्यासकांप्रमाणेच डॉ. वा. वि. मिराशी, डॉ. श्री. त्र्यं. केतकर, श्री. स. आ. जोगळेकर, डॉ. रा. श्री. मोरवंचीकर (स.१९९३), या अभ्यासकांनीही हे मत अनुसरले. मात्र डॉ. रा. गो. भांडारकर, डॉ. पु. ग. सहस्रबुद्धे, डॉ. (कु.) भ्रमरघोष, ना. य. मिरीकर, भगवानलाल इंद्रजी हे, सातवाहनांस क्षत्रिय कुलवंशवर्णाचे मानतात. तर चिं. वि. वैद्य,डॉ श्री. व्यं. केतकर त्यांना 'शूद्र' मानतात, आणि वि. का. राजवाडे त्यांना 'वैश्य' (भाताचे व्यापारी) मानतात. अशा या विविधांगी मतांचा परामर्श या लेखात घेतला आहे.

: सातवाहनांना ब्राह्मण मानणाऱ्यांनी, सातवाहनांच्या कोरीव लेखातील (नाशिक लेणे क्र. १६) गौतमीपुत्राविषयी आलेला 'एकबम्हणस' हा शब्द ब्राह्मण या अर्थी स्वीकारला. तसेच इतर काहींनी त्या लेखातीलच 'राम' म्हणजे परशुराम, 'खतियदपमानमदनस' म्हणजे क्षत्रियांच्या दर्प व मान यांचे दमन करणारा असे; असंगतांना सुसंगत बनविण्याच्या प्रयत्नांतून सातवाहन हे ब्राह्मण (वर्णाचे) होते असे सिद्ध करण्याचे प्रयत्न केले आहेत. सातवाहन, सातकर्णी, शालिवाहन या शब्दांच्या व्युत्पत्ती व अर्थ यापूर्वी अनेक जणांनी अनेक प्रकारें दिले आहेत. या सर्वांतील व्यर्थता निदर्शनास आणून देऊन सातवाहनांचा वर्ण क्षत्रिय हाच होता व सातवाह-शालिवाह-सातकर्णि या शब्दांत 'सात्' हा अंक नव्हे, तर त्याचा अर्थ 'ईश्वर-परमात्मा-ब्रह्म' असा आहे; 'शल'चा अर्थही तोच आहे; व 'वाह' म्हणजे बाहू, भुजा, दंड या आधारें या तिन्ही शब्दांचा अर्थ ''क्षत्रिय'' असाच आहे हे समर्पकपणें या लेखात श्री. कदम यांनी दाखवून दिले आहे. अर्थात सातवाहन हे यज्ञकर्ते(अश्वमेध, राजसूय, वाजपेय, आप्तोयामभ इ. अनेक यज्ञ) होते, वैदिक सनातनधर्मीय होते दर्प व मान संपन्न मदनच असा क्षत्रिय गौतमीपुत्र सातकर्णी सम्राट होता हे सिद्ध होत. 'गौतमीपुत्र' हे त्याचे 'मातृगोत्रनाम' (दक्षिणीपरंपरा) नसून ते, गोदावरी तीच गौतमी या नांवावरून घेतलेले नामबिरुद होते, हे श्री कदम यांनी येथे दाखवून दिले आहे.]

सातवाहन-लेखासाठी हा असा 'लीड' सूचित करून डॉ. म. श्री. माटे यांनी

म्हटले आहे:-

-''श्री. रा. आ. कदम यांचा 'सातवाहन'-कुलाविषयीचा लेख मी वाचला. त्यांनी कदंब कुलाच्या क्षत्रियत्वाविषयीही लेख सिद्ध केला आहे, त्याच पद्धतीने; सातवाहन-राजकुलाच्या वर्ण-जातीविषयी यापूर्वीच्या निरनिराळ्या अभ्यासकांनी व्यक्त केलेल्या मतांचा परामर्श घेऊन, 'सातवाहन' या नामाची एक निराळीच उत्पत्ती स्पष्ट करून, सातवाहन हे 'ब्राह्मण'-कुलवर्ण वंश जातीचे नसून ते क्षत्रिय होते, हे दाखवून दिले आहे.''

★★

: २९ :

***डॉ. ना. बा. मराठे, पुणे-२९.***

M. A., Ph. D., Dip. Lib. Sc.



: श्री. रा. आ. कदम यांचा, **'शककर्ता सम्राट सातवाहन'** हा संशोधनपूर्ण लेख वाचला. श्री. कदम यांच्या, या अशा संशोधनपर कष्टांचे अभिनंदन करून, त्यांनी सत्यसंशोधनासाठी अधिक परिश्रम करावेत असे सुचवावे वाटते.

: सातवाहन हा शककर्ता होता असा एक समज आहे. याविषयीही काही मतमतांतरे आहेत.

: आंध्र, कर्नाटक व महाराष्ट्रामध्ये **'शक'** म्हणून ओळखला जातो, तो 'शालिवाहन' म्हणून. पण त्याबद्दलच इतिहासकारांमध्ये एकवाक्यता नाही. त्यामुळे शालिवाहन हा परंपरेने मानलेला शककर्ता आहे, आपण एवढेच म्हणू शकतो.

"The earliest शक king known to have ruled in India was MAVES (c. 80 B.C.)"
:(Bashon : The wonder that was India : p. 60)

: कदंब आणि सातवाहन राजे हे ब्राह्मण नसून क्षत्रिय आहेत, हे प्राय: मान्य होण्यासारखे आहे.

: आपल्याला गवसलेल्या सत्याचा आपण वेध घेत राहणे एवढाच सत्यांश संशोधकाच्या हातीं असतो; व तो मांडीत राहणे एवढेच आपण कर्तव्यबुद्धीने करीत राहावयाचे.

: श्री. कदम, या कर्तव्यबुद्धीने अथक परिश्रम घेत आहेत. ★★

: ३० :

*मा. द. स. झोडगे, पुणे-३७.*

**संपादक : 'गांवगाडा'**

"**वाकाटक राजवंश**" आजपर्यंत '**ब्राह्मण**'-वंशाचा समजण्यात येत असे. काहींनी त्यांना '**शूद्र**' म्हटले आहे; तर काही इतिहासकार म्हणतात, "**वाकाटक** हे '**यवन**' होते."

अशा तऱ्हेची विविध प्रकारची '**विपर्यस्त**' विधाने मागील पिढीतील इतिहासकारांनी लिहिलेल्या, '**हिंदुस्थानच्या प्राचीन/मध्ययुगीन व अर्वाचीन**' इतिहास-कारांच्या ग्रंथांतही आढळून येतात.

'**आर्य**' आधि '**अनार्य**' असे दोन भिन्न लोक या आमच्या हिंदुस्थानात होते, हे गृहीत धरल्यानेच, त्यांचे इतिहास-लेखन मूळातच चुकीचे झाले आहे असे म्हणता येते. 'राक्षस' आणि '**आर्य**' यांची तुलना त्यांनी जी केली, ती वास्तवतेला धरून नाही.



महाराष्ट्राचा इतिहास प्रारंभीं '**चंद्रगुप्त मौर्य**' व '**अशोक**' या सम्राटांच्या साम्राज्य-विस्ताराशी संबद्ध आहे. इतिहासकार म्हणतात, अस्सल मराठी असा पहिला राजवंश 'शातवाहन' किंवा 'शालिवाहन' हा होय.

'भोज', 'रट्ट/रट्ठ/रट्ठे', 'राष्ट्रिक'/'राष्ट्रकूट', व 'महारट्ठे' इ. जाती/जमातींचे जन-गण (लोकसमूह) स्वत:स अस्सल 'क्षत्रिय' म्हणवून घेत. ते महाराष्ट्रभर पसरले होते. '**हाल**' हा एक 'शालिवाहन' राजा होता. त्याने 'गाथा सप्तशती' ('गाथा सत्तसई') हा ग्रंथ लिहविला; याचा अर्थ त्याने तो स्वत: लिहिला नाही; 'सातवाहन' हे 'शूद्र' होते असेही काही विद्वानांनी म्हटलेही आहे. त्यांचे सर्व कोरीव शिलालेख संस्कृतप्रचुर महाराष्ट्री प्राकृतात आहेत. या उलट डॉ. श्री. व्यं. केतकर, डॉ. वा. वि. मिराशी, स. आ. जोगळेकर यांच्याजसे विद्वान सातवाहनांना '**ब्राह्मण**' मानतात. अशी मतभिन्नता हीच भारतीय इतिहासाच्या लेखनाची संजीवनी ठरली आहे. परंतु ही इतिहासलेखन-परंपरा विपर्यस्त व काल्पनिक व तर्कनिष्ठेलाही पूर्णत: फारकत घेतलेलीच आजवर असल्याचे दिसून आले आहे.

कोणी म्हणतात/लिहितात, **अश्वमेधादि** यज्ञ-याग जे क्षत्रियांनीच करावयाचे असत, ते उघड-उघड **'कलिवर्ज्य'** म्हणून स्मृतींनी सांगितले आहेत. पण अशी 'पुराणे', अशा 'स्मृती' लिहिणारांना भारतीय क्षत्रिय राज-नृपतींनी हजारोंच्या संख्येने कोरून ठेवलेले शिलालेख, प्रस्तरलेख, शिलास्तंभलेख, ताम्रपट, नाणी यांचा पुसटसाही परिचय नसावा असे खेदाने म्हणावे लागते. वस्तुतः अशा शकडो नृपतींनी केलेल्या शेकडो, राजसूय, अश्वमेधादि यज्ञांची सुस्पष्ट नोंद आपणांस उपलब्ध आहे.

शिवाय, **''नंदांतं क्षत्रियकुलम्''** हा **'बनावट'** पुरावाही 'सिद्धान्त' म्हणून प्रस्थापित करण्याचा कांहींकडून प्रयत्न केला गेला; आणि म्हणून दोनच वर्ण उरले असेही प्रतिपादिले गेले. वास्तवात तो शब्दबंध आहे, ''नंदंतं क्षत्रियकुलम् !'' आणि या 'नंदतः !' चा अर्थ काय आहे हे पाहू जातां आपली दिशाभूल कशी करता येते याचा नमुना स्पष्ट होतो ! :-

'गीर्वाण लघुकोश' व 'आपटे-कृत संस्कृत/इंग्रजी डिक्शनरी' या ग्रंथांत 'नंदंतः !' चे अर्थ असे दिले आहेत :-

★ **'नंदतः !'**=१. पुत्र, a son,
२. मित्र, a Friend,
३. राजपुत्र, a Prince,
(४. राजा, a king.): 'आपटे कोश.'
(स्त्री.)'नंदंती' =कन्या.=a daughter.

★(**अर्थातच**-मैत्रीण, राजपुत्री, राणी हे अर्थ अवास्तव ठरत नाहीत.)

-यातून काय स्पष्ट होते ? **'नंदांतं'** व **'नंदंतं'** या दोन्हींत फरक दाखविण्यासाठी **'दं'** हे **'दां'** बनविले असता वेगळा हेतू साधता आलेला आहे, असे नाही का म्हणता येत ? **'राजपुत्र/राजा'** व **'क्षत्रियकुल' अभिन्न 'शब्दबंध'** आहेत. यांचा **'विचारही त्याज्य व अस्पर्श'** मानण्याचे प्रयोजन कोणते ? हे आजपर्यंतही धूसर असले तरी ते अभेद्य निश्चितच नाही.

हिंदुस्थानच्या राजवंशांविषयीचा इतिहास निरनिराळ्या असत्य विधानांनी सजवून त्याचा खुसखुशीत चिवडा बनविलेला आहे. तो खुसखुशीत असला तरी पाचक नाही./पचनीय नाही.

वाकटक राजवंशाचीही जी परवड त्यांच्या वर्णाविषयी, इतिहासकारांनी करून

टाकली आहे, ती दूर करण्यासाठी प्रस्तुत लेखात श्री. रा. आ. कदम यांनी फार अपूर्व प्रयत्न केला आहे.

वाकटक हे ब्राह्मण किंवा शूद्र किंवा यवन किंवा कुणी परकीय नव्हते. ते वैदिक सनातन धर्मीय क्षत्रिय होते. हेच या लेखाचे प्रमेय आहे. वाकाटकांचे विवाहसंबंध क्षत्रिय राजघराण्यांशीच होते यात अनुलोम-प्रतिलोम असली गोड गुलाबी स्वप्ने रंगविण्याचे निंद्य प्रयत्न जे केले गेले आहेत, त्यालाही जगाच्या इतिहास तोड नसणार. वाकाटक-वर्ण-निश्चितीचे प्रमेय समर्पकपणे श्री. कदम यांनी या लेखात सोडविले आहे.

श्री. कदम यांनी; वाकाटकांच्या विषयी त्यांच्या एका अमात्याच्या लेणी-शिलालेखात आलेला एकमेव शब्द जो **"द्विज-प्रकाश"**, त्यातील 'द्विज' हा शब्द उचलून व त्याला 'ब्राह्मण' असा अर्थ निश्चित करून पूर्वीच्या परंपरेतच डॉ. वा. वि. मिराशीही सामील होतात व वाकाटकांना ब्राह्मण वंशकुलवर्णजातीचे ठरवितात हे कसे अप्रमाण आहे ते दाखविण्यासाठी-

"राजा प्रभौ नृपे चंद्रे यक्षे क्षत्रिय कक्षयोः ।" असे म्हणून विषयास पूर्तता आणली आहे.

: वस्तुतः 'द्विज' म्हणजे 'चंद्र' ! अत्री ऋषींचा पुत्र, हा एक जन्म व सागर-मंथनातून जन्म हा दुसरा जन्म चंद्राचा ! आणि क्षत्रिय राजा हा 'चंद्र' इ. आदित्यदेवांचा अंशभूत असतो, हे प्राचीन ग्रंथांनी, श्रुती-स्मृतींनीही सविस्तार सांगितलेही आहे.

: याविषयी 'महापद्म नंद' हा राजा 'कलिकांशज' होता, असे मत्स्यपुराणांत म्हटले आहे, व 'कलिका' म्हणजे चंद्राची सोळावी कला होय. तसेच 'गीतेत' श्रीकृष्ण म्हणतात:-

"रसोऽ हमप्सु कौंतेय, 'प्रभास्मि शशि-सूर्ययोः' !"
=("मी चंद्र-सूर्यांमधला प्रकाश आहे.")

: क्षत्रिय राजा हा विष्णूरूप असतो. व विष्णूचा चंद्र-सूर्यांची प्रभा असतो अर्थात क्षत्रिय राजा व चंद्र-सूर्यांची प्रभा-प्रकाश यांची एकात्मता अभिन्न बनते. 'द्विज-प्रकाश' तो हाच ! वाकाटक राजा " रणशक्ती असा, या भुवनीं द्विज प्रकाश होता

!'' येथे 'द्विज' शब्दाने वाकाटकांविषयी ब्राह्मणकुलवर्णवंशजजातीचा आभास संशोधकांस झाला नि भारतीय इतिहासाचे असत्यमंडण चालूच राहिले.

या लेखातच श्री. कदम यांनी 'वाकाटक' शब्दाची यथोचित व्युत्पत्ती/उत्पत्ती सर्वप्रथम दिली आहे. ती सर्वथ: नवीन असून त्याचे विवेचन मोठ्या मार्मिकतेने त्यांनी केले आहे. या व्युत्पत्तीची छाननी केल्यास वाकाटक हा राजवंश क्षत्रिय वर्णवंशाचा होता, हे निश्चित ठरले जाते. या लेखाचा पहिला भाग जितका सुव्यवस्थित आहे, तितकाच दुसरा भागही विचारार्ह आहे. दोन्ही भागांत लेखक श्री. कदम यांची सूक्ष्मदृष्टी, शोधकबुद्धी आणि प्रतिभापूर्ण कल्पकतेचे नवीन स्रोत ह्यांची पूर्ण प्रतीती आल्यावाचून राहत नाही.

श्री. कदम यांच्या या 'वाकाटक'-लेखात इतिहासाचे असामान्य व विशेषत्वपूर्ण स्वरूपाचे दर्शन घडत आहे. अज्ञान व अनास्था यांमुळे झाकून गेलेली ऐतिहासिक सत्ये सूर्यप्रकाशात आणण्यासाठी त्यांनी बजावलेली कामगिरी स्तुत्य आहे. लेखकाने या लेखात केलेली विधाने त्याच्या परिश्रमपूर्ण अभ्यासाने स्थापित झालेली आहेत. त्यांची विवेचन पद्धती व अनेक मुद्दे एकत्र करून त्यापासून सिद्धान्त स्थापित करण्याचे लेखकीय कौशल्य कोणासही नाकारता येणार नाही. त्यांचा ऐतिहासिक चौकसपणा अभिनंदनीय आहे. त्यांच्या या व तत्पूर्वीच्या कदंब, सातवाहन या लेखांनी भारतीय इतिहासाच्या सत्य-दर्शनात अमूल्य भर पडली आहे. त्यासाठी या लेखकाच्या प्रयत्नांचे जेवढे म्हणून **कौतुक करावे**, तेवढे थोडेच होणार आहे.

वर्णाभिमानातून आपले महत्त्व प्रस्थापित करण्याच्या खटपटी भारतीय इतिहासात नमूद आहेत. आणि मग, 'इंग्रजांनी असे इतिहास लेखन केले', असे म्हणण्यास व आपली कर्तव्ये झुगारण्यास कोणासही मोकळे होता येऊ लागले. या पार्श्वभूमीवर श्री. कदम यांचे इतिहास संशोधनपर लेखन सर्वांसाठी अचूक दिशा लाभण्यास उपयुक्त ठरणारे आहे./ठरणार आहे. त्यात लेखकाचे निरीक्षण व्यापक, मुद्देसूद, मार्मिक, व्यवस्थित व प्रमाणाश्रित, असल्याने आढळून येते. संस्कृतवचने, पुराणांतील दाखले, प्राचीन भित्तिचित्रे, शिलालेख, ताम्रपट, नाणी, प्रतीके इ. ऐतिहासिक साधनांचा उपयोग श्री. कदम यांनी वाकाटकादि राजवंशांचे वर्णनिश्चितीच्या संदर्भात जागोजाग केला आहे, व आपले ठाम निष्कर्ष सर्वांपुढे ठेवले आहेत. या आधारें त्यांनी वाकाटकवंशाची सोपपत्तिक व साधार माहिती दिली आहे. यावरून श्री. कदम यांची प्रखर शोधक बुद्धी व चौकसवृत्ती प्रत्ययास येते.

वाकाटक राजवंशीयांचे क्षत्रियत्व सिद्धच राहण्याच्या दृष्टीने हा लेख अतिशय महत्त्वाचा आहे. वाकाटकांना वेगवेगळे वर्ण-जाती-राष्ट्रीयत्व चिकटविणाऱ्यांसाठी हा लेख एक प्रकारचे आवाहन आहे ! श्री. कदम यांनी केलेले विवरण सुंदर, हृदयंगम वठले आहे. त्यातील विचार स्वतंत्र व नवीन असून. त्यांची जुळणी व मांडणी ही देखील मनोवेधक, मनोहारी आहे. यामुळेच हे विषयाविवेचन ऐतिहासिक, तात्त्विक, तथ्थाश्रित असूनही त्यास एकप्रकारचे स्वतंत्र सौंदर्य प्राप्त झाले आहे.

या निरूपणात श्री. कदम यांनी यापूर्वीच्या इतिहासकारांच्या वाकाटक राजवंशासंबंधीच्या काल्पनिक व दंतकथात्मक तथा गैरअर्थकारी विसंगत समजुतींचे साधार खंडन केले आहे. ते करीत असतां त्यांनी आपली संशोधनपर समतोल व प्रमाण-प्रमाणिक दृष्टी जराही मोहवश होऊन ढळू दिलेली नाही. सर्व विवेचन त्यांनी गांभीर्याने व ओजपूर्णभाषेत निर्भीडपणे मांडले आहे, पण कुणाचा अनादर डोकावूही दिलेला नाही. त्यामुळे विचारी, स्वाभिमानी वाचकास थोडा/बहुत विचार करावयास लावण्यास त्यांचे हे संशोधनपूर्ण लेखन समर्थ ठरत आहे. श्री. कदम यांच्या या लेखातूनच सत्य इतिहास व सत्य इतिहासाचे तत्त्वदर्शन, सत्य इतिहास लेखनाचे सूत्ररूप मंत्रदर्शनच घडत राहणार आहे, आणि तेच तर आगळेवेगळे व मौलिक आहे १!

★★

: ३१ :

*प्रा. श्रीधर गणेश दाढे: डोम्बिवली.*

M. A. (पुराभिशास्त्र).

श्री. रा. आ. कदम यांनी 'वाकाटक'-राजवंशा विषयीच्या संशोधनपर लेखात, वाकाटकांच्या वर्णाविषयी सखोल व सप्रमाण चर्चा करून आपले ठोस निष्कर्ष मांडले आहेत. आणि त्यांचे वंशपरंपराप्राप्त क्षत्रियत्व सिद्ध केले आहे. या राजवंशाचे संस्कृत ताम्रपट उपलब्ध आहेत,ते प्रकाशित झाले आहेत. त्यांच्या स्वत:च्या ताम्र-पटांत त्यांच्याविषयी 'ब्राह्मण' असा उल्लेख (वंशवर्णकुलदृष्ट्या) आलेला नाही. दुसरे हेही खरे आहे की, त्यांनी आपणांसाठी 'क्षत्रिय' याशब्दानेही उल्लेख केलेला नाही. याचा अर्थच हा की भारतीय राजवंश हे वंशपरंपरेने, वैदिककुलपरंपरेने क्षत्रियच असत; क्षत्रियेतर कुणी असत नसे. किंबहुना राज/राजा (रा=सूर्य, ज=जन्मणारा) या शब्दातच भारतीय नृपतींचे क्षत्रियत्व स्पष्ट आहे.

याचाच सैलपणाने लाभ उठविण्याचा प्रयत्न आंग्लविद्वानांनी कृतीत आणला आणि भारतीय क्षत्रिय राजवंशांना 'ते क्षत्रिय नव्हतेच' अशी लेबले चिकटविण्याचा उपद्व्याप आधुनिक भारतीय इतिहास लेखनात धुमाकूळ घालित राहिला.

तरीही तदनुषंगिक अन्य अनेकानेक प्रमाणांच्या आधारें समर्पकपणे वाकाटकांचे निर्विवाद क्षत्रियत्व तेजस्वी स्वरूपात आपणांसमोर ठेवण्याचे महत्त्वपूर्ण कार्य श्री. कदम यांनी केले आहे.

वाकाटकांना **'ब्राह्मण'** ठरविण्यासाठी डॉ. मिराशी आदींनी जे एकच प्रमाण पुरस्कारिले ते तर साक्षीला उभेही राहू शकत नाही. अजिंठा लेणे क्र.१६ मधील एक शिलालेख वाकाटकांच्या अमात्याने कोरला आहे. त्यात विंध्यशक्ती या वाकाटक नृपतीला 'द्विजप्रकाश' म्हटले आहे ! झाले ! हाच म्हणे वाकाटकांच्या ब्राह्मणवर्णाचा सज्जड पुरावा ! असा पक्ष घेणाऱ्यांच्याविषयी सहानुभूत राहून जे म्हणता येईल तेही श्री. कदम यांनी न म्हणता त्या प्रमाणातील फोलपणा सर्वांच्या निदर्शनास आणून दिला आहे. एक तर, 'द्विज' म्हणजे केवळ ब्राह्मणच असा अर्थ नाही, आणि तो कधीच नव्हताही ! 'द्विज' म्हणजे तिन्ही वर्णां पैकी कोणताही वर्ण असू शकतो ! अर्थात राजाविषयी 'द्विज' शब्द आल्याने तो क्षत्रियच ठरतो, ब्राह्मणही नाही व वैश्यही नाही ! कारण क्षत्रियेतरांना राजा होण्याचा, राज्याभिषिक्त होऊन राज्य करण्याचा वैदिक परंपरेने अधिकार नाही.

दुसरे म्हणजे 'द्विज'चा अर्थ विद्यासंपन्न, वेदविद्याविद ! अर्थात क्षत्रिय राजे विद्यासंपन्न असत, वेदविद्याविद असत, म्हणूनच ते द्विज असत त्याच अर्थाचे 'क्षत्रिय' वाकाटक हे 'द्विज'ही होते.

तिसरे म्हणजे 'द्विज'चा अर्थ 'चंद्र' हा आहे; हेच कुणाही अभ्यासकाने ध्यानीं घेण्याची तसदी घेतलेली नाही. क्षत्रिय राजा व चंद्र (चंद्रप्रकाश/चंद्रवृत्ती/चंद्रव्रत) यांचा अभिन्न संबंध वेदकाळापासून अस्तित्वात असल्याची शेकडो प्रमाणे वेदादि वाङ्मय, व पुराणे यांतून उपलब्ध आहेत. तेव्हा **'द्विज-प्रकाश'** म्हणजे कोणताही विशिष्ट वर्ण नव्हे तर चंद्रव्रती क्षत्रिय राजा, चंद्रवृत्ती क्षत्रिय राजा, चंद्रअंशभूत क्षत्रिय राजा, चंद्रवंशीय क्षत्रिय राजा इ. संदर्भ ध्यानात घेतले गेले नसल्याने यापूर्वीच्या संशोधकांनी सर्वांस अंधारात ठेवले ! चंद्रच लपवून ठेवला, तर सर्वांसाठी प्रकाश-ज्ञानप्रकाश-सत्यप्रकाश कसा लाभणार !

हीच चंद्राची लपवालपवी श्री. कदम यांनी या लेखात प्रथमच उघडकीस आणली

आहे ! याचे फार मोठे व आगळेवेगळे श्रेय श्री. कदम यांना द्यावेच लागेल !

वाकाटकांचे विवाहसंबंध क्षत्रियांशीच झाले आहेत, म्हणून तेही क्षत्रियच होते; हे मानण्यावाचून दुसरा पर्याय नाही. क्षत्रिय राजे वर्णव्यवस्थेचे नियंते होते. वर्णसंकार होऊ न देणे हे त्यांचे राजकर्तव्य होते. ते बंधन त्यांच्यावरही होते. ''त्यांना अनुलोभ विवाह मान्य होता हो ! '' असली एक लोणकढी थाप आजचेही अभ्यासक पुढे करीत असलेले पाहून त्यांची कीव करावी तेवढी थोडीच ठरते ! 'अनुलोमविवाहमान्यता' ही काय ''वर्णसंकरित जातींची'' संख्या वाढविण्यासाठी होती की काय ? याचे उत्तर कुणा अभ्यासकाने दिल्याचे कुणाचे वाचनात आले आहे काय ? कोणाही वर्णसंकरितास राज्याधिकार, राज्यभिषेकाधिकार, यज्ञाधिकार, वेदाधिकार नाही ! आणि येथे तर पित्यांनंतर पुत्रच सत्तेवर आलेला आहेत. म्हणजेच वाकाटवंशीय नृपती हे विशुद्ध आर्य क्षत्रियच होते. वर्णसंकरित नव्हे, व अनुलोभविवाहजन्यही नव्हेच नव्हे !

वाकाटक स्वतःस हारीतीपुत्र म्हणवीत; चालुक्य, कदंबही तसेच म्हणवीत, चुटुकुलानंद सातकर्णीही तेच म्हणवीत आणि ही सर्व राजकुले 'क्षत्रिय' होती, अर्थात वाकाटकही क्षत्रिय होते. कोणते प्राचीन ब्राह्मण-कुल स्वतःस हारीतीपुत्र म्हणवीत असे ? याविषयी कसलाही उच्चार आजवर कोणीही केलेला नाही !

वृष्णिवृद्ध गोत्र आणि विष्णुवृद्ध गोत्र याविषयीचे विवेचन श्री. कदम यांच्याच शब्दात वाचनीय आहे.

आपल्या विधानांना बळकटी येण्याकरिता श्री. कदम यांनी अभ्यासपूर्वक सिद्ध केलेल्या व्युत्पत्ती अत्यंत समर्पक, सार्थ, व स्तिमित करणाऱ्या आहेत; अभ्यासकांनी व संशोधकांनी हे सर्व विस्तार मूळांतूनच वाचायला पाहिजेत. तरीही त्यांचा थोडक्यात निर्देश करण्याचा मलाही मोह आवरत नाही. ही उदाहरणेच पाहा - ''रणशक्तिः द्विज-प्रकाशो भुवि विंध्यशक्तिः ।''-या विषयी वरती चर्चा केलीच आहे. तरीही येथे 'द्विज' म्हणजे 'ब्राह्मण' असा एकदेशी अर्थ घेणे बुद्धिदौर्बल्याचेच लक्षण होईल.

:''राज्यं समासाद्य यथा नरेंद्रः । तथा प्रकाशे विरराज चंद्र : । '' (वा. रा.)
- हा अर्थ 'द्विज' मधून प्रतीत होतो, तो महत्त्वाचा व निर्णायाक आहे.
२. ''राजा= वृष= इंद्र''; ३. ''वृषा वै राजन्यः ॥'' (तां. ब्रा.)
३. वाकाटक राजे 'युधिष्ठिरवृत्ती' होते, म्हणजेच-
''युधिष्ठिरे राजगुणाः (क्षत्रियगुणाः) समस्ताः ॥'': (म. भा. उद्योगपर्व)
-तसेच वृत्ती = आचारपद्धती = धुरंधर वत्सल क्षात्रवृत्ती !

४. वाकाटक वाक्=वाणी, वाकाट्ट= वाणीरूप शस्त्र ! मानवलोकीचे.

: ऋग्वेदात सरस्वती ही युद्धदेवता स्वरूपात आराधिली आहे.

:'वाकाटक' हा शब्दच 'वाकाटक' राजवंशाचे क्षत्रियत्व स्वयंभू असल्याचा द्योतक आहे.

तेव्हा कसल्यातरी अर्धवट पुराव्यावरून वाकाटकांचे क्षत्रियत्व नाकारून त्यांना 'ब्राह्मण' समजण्याचा, भासविण्याचा, संबोधण्याचा हा अव्यापारेषु व्यापार 'ब्राह्मणत्व' समर्थकांना पचण्यासारखा कां वाटला हे समजून घेण्यास मार्ग नाही. श्री. रा. आ. कदम हे सत्याविषयीच्या आग्रहाने तीव्रतेने म्हणतात, त्याप्रमाणे विद्वानांनी ह्या इतिहासविपर्यासाची दखल घेऊन सत्यार्थ पुरस्कृत करून तो प्रकाशित करण्यास कृतिशील व्हावे असे, मला एका पुराविद्यांच्या अभ्यासकाला मनापासून वाटते.

प्रस्तुत प्रबंधाचे लेखन श्री. कदम यांनी मुद्देसूद व अत्यंत विचाराने केलेले आहे. पूर्वसूरींच्या ग्रंथांचा व मतांचा योग्य मान राखून, त्यांच्या उणिवा परखडपणाने श्री. कदम यांनी सर्वांच्या नजरेस आणून दिल्या आहेत. यथोचित संदर्भ देऊन त्यांनी आपले विवेचन परिपुष्ट केले आहे. यापूर्वी संशोधकांनी जे निष्कर्ष काढले त्यांचे वैय्यर्थ, उणिवा दाखवून योग्य त्या तपशिलाचा साजरा उपयोग त्यांनी करून घेतला आहे. हे करताना लेखाच्या दुसऱ्या भागात स्वतःचे आकलनही त्यांनी साक्षेपाने, विस्ताराने व मुद्देसूद मांडले आहे; विद्वानांची विपर्यस्त मते नेटकेपणाने दुरुस्त केली आहेत. वाकाटकांनी केलेल्या यज्ञांतूनही त्यांचे सम्राटपद व क्षत्रियत्व उजळून निघते. यासाठी श्री. कदम यांनी यज्ञसंस्थेचा जो तपशील सर्वांपुढे ठेवलेला आहे, तो अभ्यास पंडिताला साजेसाच आहे. यातून वाकाटक राजे हे क्षत्रिय सातवाहन तथा क्षत्रिय गुप्त राजे यांच्यापेक्षा क्षत्रियत्वात कोणत्याही दृष्टीने उणे नव्हते, हे ही सिद्ध होते.

प्रदीर्घ अभ्यास, उपलब्ध विविधतापूर्ण व विषयोचित ग्रंथादि साधनांचा पूर्णार्थाने यथोचित मागोवा घेऊन श्री. कदम यांनी जे अथक परिश्रमांती निष्कर्ष सर्वांसमोर ठेवले आहेत. त्यांचा विवेकानिष्ठ विचार अभ्यासकांकडून व्हायला पाहिजे. डॉ. वि. भि. कोलते यांच्यासारख्या संशोधन क्षेत्रातील अग्रगण्य अध्वर्यूंनाही श्री. रा. आ. कदम यांचे हे संशोधनकार्य लक्षणीय व सत्यप्रेरक वाटते, हे ही नितान्त प्रशंसनीय आहे.

श्री. कदम यांनी यापुढे ही इतर प्राचीन राजवंशांचे इतिहासाचे पुनरावलोकन करून हे सत्यसंशोधनाचे व्रत चालूच ठेवावे, अशी माझी त्यांना आग्रहाची विनंती आहे ! त्यांच्या संशोधकवृत्तीचे कौतुक करून त्यांचा सुयश चिंततो.

★★

# परिशिष्ट : ५ वे (पृ. १४७-१४८ वरील प्राकृत लेख)

## : सातवाहन कोरीव लेख :

**अर्थ :** स्वयंसिद्ध सत्य तेचि परमतत्त्वस्वरूप अनाद्यनंत सूर्यदेव त्या सिद्धदेवांस वंदन असो- (राजा वासिष्ठीपुत्र श्रीपुळुमावीच्या राज्यकालाच्या १९ वे संवत्सरीं ग्रीष्माच्या द्वितीय पक्षाच्या १३ वे दिनीं राजराणा गौतमीपुत्र श्रीसातकर्णी जो हिमालय-मेरू-मंदरांसम समर्थ होता; जो ऋषीक-अश्मक-मूलक-सुराष्ट्र-कुकुर-अपरान्त-अनूप-विदर्भ-आकरावंती या देशांचा राजा होता; जो विंध्य ऋक्षवत्-पारियात्र-सह्य-कृष्णगिरी-मंच-श्रीस्तन-मलय-महेंद्र-श्वेतगिरी-चकोर या पर्वतांचा स्वामी होता; ज्याच्या आज्ञा सर्व राजमंडलाधिपती पाळीत: ज्यांचे वंदन सूर्यकिरणांनी उमललेल्या कमलासम विमल होते; ज्याच्या अश्वांनी गजाश्वादि वाहनांनी त्रिसिंधुजल प्राशिले; ज्याचे मुख पूर्ण चंद्रमंडला जसे सुंदर, आनंदप्रद होते; ज्याचा चालण्याचा डौल उत्कृष्ट गजगतिजसा होता; ज्याचे बाहू शेषतनूजसे पीळदार पुष्ट, लांब, सुंदर होते; ज्याचा निर्भय हात सर्वांना अभयाचे उदकदान करण्याने सदा ओलाच असे; जो आपल्या सुखी मातेची शुश्रूषा करी की जी माता आपल्या आचरणात धर्मार्थकाम या तिन्ही पुरुषार्थांच्या देशकालांचे उत्तम विभाग करी व जो निज पौरजनांच्या सुखदु:खांत सहभागी होई; जो दर्प व मानसंपन्न क्षात्रधर्मी सर्वजयी धनुर्धर मदनरूप असा क्षत्रिय होता; क्षत्रियांचा नाशकर्ता नव्हे तर जो सकल प्रजाजनस्वरूप पल्लवांना पूर्णत्वाने प्रिय होता; जो न्यायलब्ध करांचा सुयोग्य खर्च करी, ज्याला अपराधी शत्रूंचेही प्राण हरण करणे आवडत नसे; जो वेदविद्याविद (द्विज=वेदज्ञ) सामान्यजनांच्या परिवारांचे पालनपोषण करी; ज्याने क्षहरातवंशीयांना विवाहसंबंधाने पूर्णत: वश, अनुबंधित केले होते; ज्याने स्वत:च्या सातवाहन-कुलास प्रतिष्ठा प्राप्त करून दिली, ज्याच्या चरणांना सर्व राजमंडळे विनम्र अभिवादन करीत; ज्याने चातुर्वर्ण्यसंकर विनियंत्रित ठेवला होता; ज्याची विजयपताका अजिंक्य राहिली; राजधानी अजिंक्य होती; ज्याची थोर राजपदवी प्राचीनतम पूर्वापार पूर्वजांपासून परंपरेने प्राप्त झालेली अशीच होती; जो वेदादि तत्त्वज्ञानशास्त्रांचा पूर्ण ज्ञाता, निवासस्थानच होता; जो सत्पुरुषांचे आश्रयस्थान होता; जो राज्यलक्ष्मीचे अधिष्ठान होता; जो शिष्टाचारांचे उगमस्थान होता; जो असामान्य नियंता, अप्रतिम धनुर्धर, अद्वितीय शूर योद्धा व अनुपम वेदविद्याविद व अनेकयज्ञदीक्षित म्हणून 'ब्रह्मन' संज्ञाप्राप्त व पात्र प्रजाप्रतिपालक (ब्रह्मन्) होता. (वंशकुलवर्णजातीचा असा जो ब्राह्मण अशा अर्थाने नव्हे) ज्याचा पराक्रम बलराम

व केशव आणि अर्जुन व भीमसेन यांच्या तुल्य होता; जो धनुष्योत्सव,समाजकार्ये, जनसमारंभात सहभागी होई; ज्याचे तेज नाभाग-नहुष-जनमेजय-सगर-ययाती-श्रीराम-अंबरीष या थोर व महान क्षत्रिय राजपरंपरेतील क्षत्रिय राजांसम तेज (अर्थात सूर्यतेजोत्पन्न क्षत्रिय कुलवंशशुद्ध बलसामर्थ्य) होते. जो पवन-गरुड-सिद्ध-यक्ष-राक्षस-विद्याधर-भूत-गंधर्व-चारण-चंद्र-सूर्य-नक्षत्रे-ग्रह यांच्या प्रमाणे रणभूमीवर शत्रुसंघावर अपरिमित-अक्षय-अचिंत्य-अद्‌भूत विजय मिळवी; जो उत्कृष्ट गजस्कंधारूढ होऊन सर्व गगनतल स्वतेजाने आक्रमीत असे; ज्याने स्वकुलास अपरंपार राज्यलक्ष्मी प्राप्त करून दिली होती; अशा श्रीसातकर्णीची माता क्षत्रिय राणी महादेवी गौतमी बलश्री जी सत्यवचन-दान-क्षमा आणि अहिंसा यांमध्ये सदैव मग्न असते; जी तपश्चर्या-दम-नियम-उपवास यांच्या अनुष्ठानांत सदैव तत्पर असते; जिने आपली 'राजर्षिवधू' तत्त्वचिंतक वैराग्यवृत्तिसंपन्न आत्मसंयमी व इंद्रियजित क्षत्रिय कुलवंशीय राजाची पत्नी ही पदवी सर्वकाळ पाळली आहे- तिने हे कैलास पर्वताच्या शिखरासमान असणाऱ्या त्रिरश्मी नामक पर्वतशिखरावर उत्कृष्ट स्वर्गीय प्रासादासारखे बहुमोल लेणे आपला धर्मदाय म्हणून कोरविले आहे. हे लेणे सार्वभौम क्षत्रिय राजकुलसंपन्ना अशी महादेवी, महाराजमाता आणि महाराजपितामही भदावनी यांच्या भिक्षुसंधीला (वैदिक धर्मीय भिक्षूंना/ब्राह्मणांना नव्हे,) दान देत आहे !

या लेण्याच्या अलंकरणार्थ आपल्या महादेवी आजींची सेवा करण्याची व त्यांना आवडेल असे कार्य करण्याची इच्छा करणारा त्यांचा दक्षिणापथेश्वर नातू आपल्या पित्याच्या पुण्यप्राप्तीसाठीच्या धर्मसेतूकरिता त्रिरश्मी पर्वताच्या नैऋत्येस स्थित पिशाची-पद्रक हा गांव त्याच्या सर्वप्रकारच्या उपभोगांचा त्याग करून दानस्वरूप देत आहे !

●●

---

(संदर्भः सा. आ. प. क्ष. यांचा इ. आ. को. ले./डॉ. वा. वि. मिराशी (१९७९)/ पृ. ४५-४७/प्रका. म. रा. सा. सं. मं. मुंबई).

## परिशिष्ट ६ वे : सातवाहन-वंशावळी :

[(१) कोरीव लेख व नाणी यांवरून माहीत झालेली नांवे : कंसविरहित.
(२) पुराणांतून आढळणारी नांवे : कंसांत. त्यांच्याविषयी निश्चिती नाही.
(३) नाण्यांवरून आढळलेली नांवे, वंशावलीत त्यांचा क्रम अज्ञात :-
१. कुंभ सातकर्णी, २. कर्ण सातकर्णी, ३. कौशिकीपुत्र सातकर्णी.]

• सातवाहन
- सिमुक
  - सातकर्णी-१ला
    - वेदिश्री
    - शक्तिश्री
- कृष्ण

वेदिश्री
: (पूर्णोत्संग)
: (स्कंदस्तंभी)
: सातकर्णी-२रा
: (लंबोदर)
: आपीलक
: मेघस्वाती
: (स्वाति)
: (स्कंदस्वाती)
: (मृगेंद्र)
: (कुंतल)
: (स्वाति वर्ण)
: (पुलोमावी-१ला)
: (अरिष्ट कर्ण)
: हाल
: (मंटलक)
: (पुरींद्रसेन)
: (सुंदर सातकर्णी)
: (चकोर)
: (शिवस्वाती)
: गौतमीपुत्र सातकर्णी

गौतमीपुत्र सातकर्णी
- वासिष्ठी पुत्र-२रा पुळुमावी
- वासिष्ठीपुत्र स्कंद सातकर्णी
  : गौतमी पुत्र यज्ञ सातकर्णी
  : माठरीपुत्र शकसेन
  : गौतमीपुत्र विजय सातकर्णी
  : वासिष्ठपुत्र चंडस्वाती
  : पुळुमावी ३ रा
- वासिष्ठीपुत्र सातकर्णी

संदर्भ : (सा. आणि प. क्ष. यांचा इ. आणि को.ले./मिराशी, पृ. [४८], [४९]) :

# परिशिष्ट : ७ वे : सातवाहन सत्ता : मानचित्र



## परिशिष्ट : ८ वे : वाकाटक : नृपती व त्यांचा राज्यकाल :

- विंध्यशक्ति-१ला : (स. २५०-२७०)
  - प्रवरसेन-१ला : (स. २७०-३३०)
    - (ज्येष्ठशाखा)
      - गौतमीपुत्र
        - रुद्रसेन-१ला : (३३०-३५०स.)
          - पृथिवीषेण-१ला:(स.३५०-४००)
            - रुद्रसेन- २ रा : (४००-४०५)
              - दिवाकर सेन : (४०५-४२०)
              - दामोदरसेन (प्रवरसेन-२ रा) (स.४२०-४५०)
                - नरेंद्रसेन : (४५०-४७०)
                  - पृथिवीषेण-२ रा :
    - (वत्सगुल्म शाखा):
      - सर्वसेन : (३३०-३५५स)
        - विंध्यशक्ति-२ रा : (३५५-४००)
          - प्रवरसेन-२ रा : (४००-४१०)
            - (अज्ञात नाम) पुत्र (४१० ते ४५०)
              - देवसेन : (४५०-४७५)
                - हरिषेण : (४७५-५००)
                  - (अज्ञातनाम) पुत्र (५००-५१०)

## परिशिष्ट : १० वे : मयूरवर्मन कदंब साम्राज्य : मानचित्र



# परिशिष्ट : ११ वे : रविवर्मन कदंब साम्राज्य : मानचित्र

• रविवर्मन् कदंब-साम्राज्य •
: इ.स. ४५७-५३७ सुमारे :

① सेंद्रक विषय (राज्य)
② दक्षिणापथ

बदामी
हलसी
उच्छंगी
वैजयंती
कोलार
कांची
गंग
कीर्तिपुर
कावेरी नदी
पांड्य

**परिशिष्ट : १२ वे : कदंब राजसत्ता इ.स. ११ वे शतक : मानचित्र**



**परिशिष्ट : १३ वे : जयकेशी कदंब -२ रा (गोवे)**

**राजसत्ता : मानचित्र**



## : विषय सूची :

[ ग्रं.=ग्रंथनाम; ग्रा = ग्रामनाम;=स्थलनाम;
जै.=जैन; खं.=खंड; हिं.=हिंदी; व.=वर्षे; नियत.=नियतकालिके ]

●●